ओंकार ट्रस्ट

# कल्याणी २०००



## श्री स्वामी स्वरुपानंद (पावस) विशेषांक





ॐ रामकृष्ण हरी ॐ रामकृष्ण हरी ॐ रामकृष्ण हरी ॐ रामकृष्ण हरी



## उज्वल भवितव्यासाठी

# ओंकार ट्रस्ट

स्थापना २६ जुलै १९९१


'विसावा' अनिकेत सोसायटी नं. १,
बिबवेवाडी, पुणे - ४११ ०३७.
दूरध्वनी क्रमांक : २४२१ ००४७




॥ श्रीराम ॥

सप्रेम नमस्कार

श्री समर्थ रामदास स्वामी व स्वामी विवेकानंद आदि थोर सत्पुरुषांच्या शिकवणी व तत्वज्ञानापासून प्रेरित होऊन 'ओंकार ट्रस्ट' या संस्थेची स्थापना गुरुपौर्णिमा या शुभदिनी - दिनांक २६ जुलै १९९१ रोजी करण्यात आली. (रजि. क्र. इ. १५०५, दि. १०-१०-१९९१)

देणगीदारांना ८० ग अन्वये प्राप्तीकरांत सूट मिळते.

आमच्या न्यासाच्या उद्दिष्टाप्रमाणे - सामाजिक बांधिलकीस्तव विविध उपक्रम ''विनामूल्य'' राबविले जातात, त्यापैकी महत्वाचे काही उपक्रम पुढील प्रमाणे -

१) गुजरवाडी - निंबाळकरवाडी (कात्रजपासून पुढे ५ कि.मी. अंतरावर ग्रामीण भागात) येथे न्यासातर्फे मुले-मुलींसाठी संस्कार वर्ग घेण्यात येतो.

२)मांगडेवाडी ( कात्रजपासून सुमारे ३ कि.मी.) येथे जिल्हा परिषद शाळेतील मुला-मुलींसाठी संस्कार वर्ग आयोजित केला जातो.

३) कर्वे स्त्री शिक्षण संस्था येथील इयत्ता आठवीतील निवासी मुलींसाठी (सुमारे १८० मुली) संस्कार वर्ग घेतला जातो.

४) डॉ. पारस शहा यांचे नेतृत्वाखाली आतापर्यंत निरनिराळ्या वर्षी आठ नेत्र चिकित्सा शिबिरे गरीब व गरजू व्यक्तींसाठी घेण्यात येवून गरजूंना औषधे व चष्मे मोफत देण्यात आली.

५) तसेच न्यासाने कॅन्सर चिकित्सा शिबीर - मांगडेवाडी येथे, मधुमेह चिकित्सा शिबीर - बिबवेवाडी पुणे येथे व सर्वसाधारण रोगनिदान शिबीर - गुजरवाडी-निंबाळकरवाडी येथे आयोजित केली आहेत.

६) उत्कृष्ट सामाजिक कार्य करणाऱ्या व्यक्तिला अथवा संस्थेला ''वसुंधरा कृतज्ञता'' (न्यासाच्या संस्थापिकेच्या नांवाने) पुरस्कार गेली १२ वर्षे देण्यात येत आहे. या पुरस्काराचे स्वरुप मानपत्र, स्मृतिचिन्ह व रोख रक्कम रु.५०००/- असे आहे. पुरस्कार देण्यात आलेल्या व्यक्ति-संस्था - १) डॉ. स्वर्णलता भिशीकर-सोलापूर २) प्रा. डॉ. अशोक कामत-पुणे ३) समर्थ भक्त सुनीलजी चिंचोलकर-पुणे ४) द्वा. वा. केळकर - पुणे ५) डॉ. सुनीलकुमार लवटे - कोल्हापूर ६) सौ. सिंधूताई सपकाळ - ता. पुरंधर (जि. पुणे) ७) डॉ. पारस शहा - पुणे ८) श्री. श्रीकांत मुंदडा - पुणे ९) श्री. गिरीष यशवंत प्रभुणे - चिंचवड १०) मानव्य संस्था - (संस्थापिका - कै. विजयाताई लवाटे) पुणे ११) डॉ. राजा व सौ. रेणूताई दांडेकर - ता. दापोली (जि. रत्नागिरी) १२) आपल घर (संस्थापक - श्री. विजयजी व सौ. साधनाताई फळणिकर)

७) न्यासाने मराठी व इंग्रजी हस्ताक्षर सुधार प्रकल्प श्री. नानासाहेब लाभे, नागपूर यांचे मार्गदर्शनाखाली ६ वर्षांच्या कालावधीत सुमारे ३५ शाळांमधून

घेतला व त्याचा फायदा सुमारे १०,००० पेक्षा जास्त विद्यार्थ्यांना झाला.

८) न्यास वेळोवेळी आध्यात्म, संतविचार इ. करिता थोरामोठ्यांची प्रवचने / व्याख्याने आयोजित करते. समर्थ भक्त श्री. सुनीलजी चिंचोलकर यांची श्री. एकनाथ महाराज यांचे चिरंजीव काव्य या विषयावर ३ प्रवचने आयोजित करण्यात आली होती.

तसेच यावर्षी ''यांनी घडविला महाराष्ट्र'' या विषयांवर अधिकारी व्यक्तिंची व्याख्याने आयोजित केली होती.

क्रांतीकारक – श्री. निनाद बेडेकर

समाजसुधारक – डॉ. सदानंद मोरे

संतांचे कार्य – डॉ. यशवंत पाठक

याशिवाय डॉ. यशवंत पाठक, प्रमुख – ज्ञानदेव अध्यासन, पुणे विद्यापीठ, पुणे यांनी १) येणे वाग्यज्ञे तोषावे – श्री ज्ञानेश्वर महाराज २) एका जनार्दनी शरण – श्री एकनाथ महाराज ३) उत्कट भव्य तेचि घ्यावे – श्री समर्थ रामदास स्वामी या विषयांवर ३ दिवसांची प्रवचन माला गुंफली.

९) न्यास दरवर्षी खालील शिष्यवृत्या -पारितोषिके देत आहे –

१) हुशार व गरीब विद्यार्थीनीला उच्च शिक्षणासाठी रु. ५०००/– ची शिष्यवृत्ती कै. नलिनी विष्णू जोगळेकर यांचे नावाने, त्यांचे बंधु श्री. गजानन विष्णू जोगळेकर यांनी दिलेल्या देणगीतून देण्यांत येते.

२) श्रीमती मृणालिनी अशोक जोगळेकर यांनी त्यांचे पती कै. श्री. अशोक विष्णू जोगळेकर यांचे स्मरणार्थ दिलेल्या देणगीतून गुजरवाडी – निंबाळकरवाडी येथील एक विद्यार्थी व एक विद्यार्थीनीस प्रत्येकी रु. ७००/– ची शिष्यवृत्ती देण्यांत येते.

३) श्री. विष्णू काशिनाथ आठल्ये यांनी दिलेल्या देणगीतून शालांत परिक्षा, पुणे विभागांत संस्कृत व मराठी विषयांत प्रथम येणाऱ्या विद्यार्थ्यांना कै. श्री. काशिनाथ लक्ष्मण आठल्ये व कै. सौ. विजया काशिनाथ आठल्ये या नावांने पारितोषिके देण्यांत येतात.

१०) ओंकार न्यास गेली १० वर्षे गरीब मुले-मुली दत्तक घेत असून त्यांचा पालन-पोषण, शिक्षण इ. खर्च करत आहे. त्यांचे निवासासाठी गुजरवाडी – निंबाळकरवाडी येथे रु. ६,००,०००/– खर्च करून १६०० चौरस फूट इमारत बांधकाम केले आहे. सध्या ६ मुले-मुली दत्तक घेतली आहेत. त्यांच्या व वाडीतील मुलांच्या विकासासाठी खालील कार्यक्रम राबविले जातात.

दररोज २ तास इंग्रजी व हिंदीचा वर्ग घेतला जातो व त्यालाही मुलांची उपस्थिती चांगली असते आणि त्यांना त्याचा छान उपयोग होत आहे.

संस्कार वर्गात नेहमीच्या उपक्रमाशिवाय गीतापाठ चालू केला आहे. गीता शिकविण्यास कसबा पेठ, पुणे येथून श्री. किशोर वैद्य सर विना मानधन नियमीत येतात. त्यांनी स्वत: मुलांसाठी पुस्तके, सीडी इ. सर्व साहित्य आणले आहे. त्यांच्या सुलभ रीतीने शिकविण्याच्या पद्धतीमुळे मुलांना सुद्धा गीतापाठाची गोडी लागली आहे.

याशिवाय विश्वस्त श्रीमती मालती निमोणकर यांनी यावर्षी नवीन उपक्रम चालू केला आहे. वाडीतील इयत्ता १०वी मध्ये असणाऱ्या काही मुलींना घरी अडचणी असतात, अभ्यासाचे वातावरण नसते, मार्गदर्शन करणारे कोणी नसते. श्रीमती निमोणकर अशा मुलींना न्यासाच्या वाडीतील जागेत अभ्यासाला बोलावून त्यांचेकडून योग्य रीतीने अभ्यास करुन घेतात, त्यांच्या अडचणी समजावून घेऊन त्यांना आर्थिक व मानसिक आधार देतात. खरेतर मुलींना मनापासून शिकायचे असते परंतु घरातील वातावरण, अडचणी इ. मुळे त्या नापास होतात व नंतर शिक्षण बंद होते ह्यावर मात करण्याच्या दृष्टीने श्रीमती निमोणकर हा प्रयत्न करत आहेत.

१२) ओंकार न्यास दरवर्षी कल्याणी विशेषांक वेगवेगळ्या संतांवर प्रकाशित करत असते. आतापावेतो न्यासाने एकूण १७ अंक प्रकाशित केले आहेत. त्यातील काही संतांची नांवे अशी – श्री ज्ञानेश्वर महाराज, श्री गुरुदेव रानडे, श्री टेंबे स्वामी, श्री स्वरुपानंद, पावस, श्री स्वामी चिन्मयानंद, श्री गोंदवलेकर महाराज, श्री समर्थ रामदास स्वामी इ. यापैकी कल्याणींच्या २००० साली प्रकाशित झालेल्या स्वामी श्री स्वरुपानंद विशेषांकास मराठी वृत्तपत्र लेखक संघाचा उत्कृष्ट आध्यात्मिक अंक म्हणून पांडुरंग भाटकर स्मृति पुरस्कार मिळाला आहे.

न्यासाने प्रकाशित केलेल्या सर्व कल्याणी विशेषांकास साधक / वाचक यांचेकडून फारच उत्तम प्रतिसाद मिळाला आहे. मागील कल्याणी विशेषांक एप्रिल २००८ मध्ये समर्थ रामदास स्वामी यांचेवर श्री. चंद्रशेखर महाराज आठवले (पंढरपूर) यांचे शुभहस्ते प्रकाशित करण्यांत आला असून पुढील कल्याणी विशेषांक आद्य श्री शंकराचार्य यांचेवर एप्रिल २००९ मध्ये प्रकाशित करण्यात येत आहे. तसेच समाजासाठी अतुलनीय कार्य केल्याबद्दल वसुंधरा पुरस्कार देण्यांत येणार आहे.

सुसंस्कृत समाज बनण्यासाठी बालांचे मन सुसंस्कृत होणे आवश्यक आहे. ट्रस्टच्या या कार्यात समाजातील विविध स्तरांतून सक्रिय पाठिंबा व सहभाग मिळत आहे.

आपण आमच्या कार्यास

१) देणगी रुपाने २) वस्तु रुपाने

३) न्यासात कार्यरुपाने भाग घेऊन

मदत करु शकता.

# ओंकार ट्रस्टचे उपक्रम

श्रीसमर्थरामदास स्वामी व स्वामी विवेकानंद आदि थोर सत्पुरुषांच्या शिकवणी व तत्वज्ञानापासून प्रेरित होऊन 'ओंकार ट्रस्ट' या संस्थेची स्थापना गुरुपौर्णिमा दि. २६.७.१९९१ रोजी करण्यात आली. स्थापनेपासून आजतागायत गेले नऊ वर्षे विविध उपक्रम ओंकार ट्रस्ट करीत आहे.

## ट्रस्टचे काही उपक्रम

- दवाखाना व प्रसूति गृह,
- नेत्रचिकित्सा शिबिर
- कॅन्सर डिटेक्शन, आरोग्य तपासणी शिबिरे.
- संस्कार वर्ग वाचनालय,
- चित्रकला, निबंध, वक्तृत्व, खेळ इ. स्पर्धा,
- मराठी, इंग्रजी हस्ताक्षर सुधार प्रकल्प
- ग्रामीण विभागातील महिलांसाठी दासबोध वर्ग.
- विविध विषयांवर प्रवचने, कीर्तने, व्याख्याने.



ओंकार ट्रस्ट संचलित दवाखान्याची इमारत

- सामाजिक कार्य करणाऱ्या व्यक्तिस **वसुंधरा कृतज्ञता पुरस्कार** प्रदान करण्यात येतो.
- प्रति वर्षी संत वाङ्मयीन विषयावर एक विशेषांक या प्रमाणे **'स्वामी स्वरुपानंद'** हा नववा विशेषांक प्रसिद्ध होत आहे.



ओंकार ट्रस्ट संचलित राधाबाई हर्डिकर प्रसूती गृह



ट्रस्टने चालविलेल्या प्रसुतिगृहात जन्मलेले पहिले बालक



हिंगणे स्त्री-शिक्षण संस्थेतील निवासी विद्यार्थीनींसाठी ट्रस्टतर्फे चालविलेला संस्कार वर्ग




श्रीगोंदवलेकर महाराज विशेषांकाचे प्रकाशन समारंभात प्रार्थना म्हणताना कु. अश्विनी जेरे, दिपा पाठारे, राणी पोखर्णा व स्मिता पाठारे. तसेच व्यासपीठावर मा. श्री. ढवळे (अध्यक्ष), श्री. रविन्द्र भट व श्री. सुनीलजी चिंचोलकर



ट्रस्टने विश्वकर्मा विद्यालय येथे आयोजित केलेल्या चित्रला स्पर्धेत चित्र काढण्यात मग्न असलेले विद्यार्थी



चित्रकला स्पर्धेचा बक्षीस समारंभ




श्री गोंदवलेकर महाराज विशेषांकाचे
प्रकाशनासाठी दिंडी सादर करताना
संस्कार वर्गातील विद्यार्थी.
प्रमुख पाहुणे श्री रविंद्र भट आणि
वसुंधरा पुरस्काराचे मानकरी
श्री सुनीलजी चिंचोलकर.



हिंगणे स्त्री-शिक्षण संस्थेतील निवासी विद्यार्थिनींकरिता चालू असलेला संस्कार वर्ग. या
वर्गास कु. क्षितीजा सोमण, सुवर्णा देशपांडे व कु. अश्विनी गुप्ते या मार्गदर्शन करतात.



फडगेट पोलीस चौकी वसाहतीत
कु. शिल्पा पाटील संस्कार वर्ग घेताना



ट्रस्टने चालविलेल्या प्रसूतिगृहात
शस्त्रक्रिया करित असताना
ट्रस्टच्या विश्वस्त
डॉ. सौ. सरयु घोले व सहकारी



सोबतच्या कवितेचे हस्ताक्षर
प. पू. स्वामी स्वरूपानंदजींचे असून
फोटो तरुण वयातील आहे.

जीवा ऊठ सख्या तूं ऊठ । झाली सौख्याची लयलूट ॥ध्रु०॥
स्वानंदाचा सुटला वारा ।
भरला शून्याचा गाभारा ।
सतरावीचा चमके तारा ।
नाच तूंहि बेछूट ॥ जीवा० ॥१॥
नुरले ठाव दिशांचे दाही । ..[३।१।३५]
मोहतमाचें नांवहि नाही । निशेचे
ज्ञान किरण तो देतो ग्वाही ।
जगत् सर्व है झूट ॥ जीवा० ॥२॥
पडली
~~[illegible]~~ किरणे आत्मरवीची । [४।१।३५]
झोंप उडूं दे नयनांवरची ।
ऊठ झटकरी या मायेची ।
उघड झांकली मूठ ॥ जीवा० ॥३॥



परमपूज्य स्वामीजी

॥ ॐ रामकृष्ण हरी ॥

उदारा जगदाधारा देईं मज असा वर ।
स्व-स्वरुपानुसंधानीं रमो चित्त निरंतर ॥
काम-क्रोधादिकां थारा मिळो नच मदंतरीं ।
अखंडित वसो मूर्ति तुझी श्रीहरि साजिरी ॥



संकल्पना, निर्मिती व हस्ताक्षरांकन

**वसंत गोडबोले**

१२४, शनिवार पेठ (नेने घाट), पुणे - ३०.

# नवरत्नहार

जय जय जी जगदात्मया ।। सच्चिदानंद सूर्या
स्वामी समर्था सद्गुरुराया ।। गणेशरूपा ।।१।।
करोनि आत्मत्वे वंदन ।। घातले चरणी लोटांगण
सहजे आले लीनपण ।। कृपा बळे ।।२।।
जी प्रभु आपला म्हणितला ।। तेणे संसार मोक्षमय जाला
देखे उन्मेष उदैजला ।। नित्य नवा ।।३।।
तुटला विषयांचा लाग ।। निमाला जन्ममरणाचा भाग
फिरला जीवदशा पांग ।। सामरस्ये ।।४।।
देही अहंता नुरली ।। वृत्ती स्वरुपी विराली
द्वैताद्वैत गिळोनी ठेली ।। अखंडत्वे ।।५।।
सरली कर्माकर्म विवंचना ।। की आपैसी साध्यसाधना
उरे करोनी अकर्तेपणा । ठाईचा त्रि ।। ६।।
बोली अबोलता झालो ।। सहजसुखे सुखावलो
धन्य धन्य देवा पावलो ।। परमसिद्धी ।।७।।
स्वरुपी विश्वरूप देखिले ।। विश्वरुपी स्वरूप सामावले
स्वरुपा विश्वरुपा आगळे ।। नित्यतत्त्व ।।८।।
स्वामीचा सेवकु जहालो ।। तै येतुले भाग्य लाधलो
अभयपदीं लागावलो ।। ह्याच लागीं ।।९।।
नववोविया नवरत्नहार ।। स्वामींस अर्पिला सादर
तेणे संतोषोनि अभयकर ।। ठेविला माथां ।।१०।।

**(स्वामी स्वरुपानंदांनी केलेली त्यांच्या पू. गुरुंवर कविता)**

# ।। श्री पूजनीय स्वामी स्वरुपानंद महाराज की जय हो ।।

**श्री** गुरु स्वामी स्वरुपानंदास करीतो प्रेमे वंदन ।
**पू** जनीय जगी तुम्ही पसरे ज्ञानाचा गंध चंदन ।।
**ज** न्मा येवुनी नाथ संप्रदाय जो केला जिथे उन्नत ।
**नी** र - क्षीर न्यायाने सोऽहम् साधना केली प्रस्थापित ।।
**य** ले श्री हरिनाम घेवुनीया सदा ध्येया संपादित ।
**स्वा** नंद आत्मसुखात असे हा नंदादीप अखंडित ।।
**मी** माझे ही माया नष्ट होता रमले नामी वासुदेव ।
**स्व** रुप पाहता 'ओम् तत्सत्' संपली जीवाची भव ।।
**रु** प पाहता चित्-सुखी होत तसे साधक जीवन ।
**पा** वस ग्रामी अध्यात्माचा वाहतसे निर्झर पावन ।।
**नं** दादीपाच्या कांती प्रभे मध्ये होतसे मन उन्मन ।
**द** त्ताचा हा प्रसाद जणू अवतरे स्वरुपात मग्न ।।
**म** मता - अहंता जावुनी लीन होवु गुरु वरा थोर ।
**हा** ती मजका देई 'संजीवन गाथा' असे भानु वर ।।
**रा** मचंद्र होई 'स्वरुपानंद' जगी गोड बोले नित्य ।
**ज** न्मा येवुनी माता-पिता उद्धरिले आदरे उभय ।।
**की** न् तू ना कसला मनात उरतो आपण महात्मा ।
**ज** री आपण नसला सगुण विलसतो तेजोत्मा ।।
**य** लेवीण न लाभे साधका काही संत सौख्य सोहळी ।
**हो** वुनी मानव जीवनी सफलता ब्रह्मानंद टाळी ।।

**प्रा. अजित कुलकर्णी**





उज्वल भवितव्यासाठी

# ओंकार ट्रस्ट

(स्थापना २६ जुलै १९९१)

'विसावा' अनिकेत सोसायटी नं. १, बिबवेवाडी,
पुणे ४११ ०३७.
टेलिफोन क्रमांक : ४२१००४७

मुंबई सार्वजनिक विश्वस्त कायदा १९५० अन्वये
नोंदणीकृत संस्था नोंदणी क्रमांक -
ई १५०५ दिनांक १० ऑक्टोबर १९९१
कलम ८०ग खाली आयकर सवलत क्रमांक :
पी एन् टी/ ८० जी / ०२० / ९९ दिनांक ६-४-९९
दिनांक १-४-१९९९ ते ३१-३-२००२





ओंकार ट्रस्ट २००० च्या **"स्वामी स्वरुपानंद (पावस)"** विशेषांक, संपादक सौ. रजनी गोपाळ काळे, ट्रस्टी यांनी प्रतिमा ऑफसेट, पुणे ४. येथे छापून, श्री. भालचंद्र वा. सातवळेकर, ट्रस्टी, यांनी 'विसावा' अनिकेत सोसायटी क्र. १, बिबवेवाडी, पुणे ४११ ०३७ येथे प्रकाशित केला.

टीप : (१) सदरचा विशेषांक **फक्त खाजगी वितरणासाठी** आहे.
(२) या अंकात प्रसिद्ध झालेल्या लेखनाशी संपादक सहमत असतीलच असे नाही.

**मुखपृष्ठ संकल्पना**
श्री. अभय पुरंदरे

**व्यवस्थापकीय सहकार्य**
श्री. शाम देऊळकर
अनंत सर्व्हीसेस, पुणे ३८. फोन : ५४४७८०८

**अक्षरजुळणी**
प्रतिमा ऑफसेट, पुणे ४.

**छपाई**
प्रतिमा ऑफसेट, पुणे ४. फोन : ५४६०२१६

**प्रोसेसिंग**
**पिक्सेल ग्राफिक्स प्रा. लिमिटेड,** शनिवार पेठ, पुणे - यांच्या सौजन्याने.

॥ श्रीराम ॥



## संपादकीय

संत परंपरा हे भारतीय संस्कृतीचे वैभव आहे. गीतेतील वचनांप्रमाणे जेव्हा धर्माला ग्लानी येते, तेव्हा दुष्टांचे निर्दालन करून धर्म रक्षणाचे कार्य करण्यासाठी प्रत्यक्ष भगवान अवतार घेतात. त्याचप्रमाणे जेव्हा समाज धुरिणांच्याकडूनच नीती नियमांची पायमल्ली होते व समाजामध्ये अनाचार बोकाळतो तेव्हा दिशाहीन झालेल्या सामान्य जनाला जागे करण्याचे कार्य संत परंपरेतील सत्पुरुष करीत असतात. चांगल्या-वाईटाचा निवाडा जेव्हा सामान्य जनता करू शकत नाही, तेव्हा त्यांना अशा अवतारी सत्पुरुषांकडूनच योग्य ते मार्गदर्शन केले जाते. संत नुसतेच समाज प्रबोधन करतात असे नाही, तर नरदेहाचे महत्त्व पटवून देऊन मानवी देह हा जीवाची पारमार्थिक उन्नती करून घेणेसाठी भगवंताने दिलेले एक महान साधन आहे, याची जाणीव करून देतात. नरदेहाचे सार्थक सद्‌गतीप्राप्ती मधे आहे व ती मिळवण्यासाठी परमार्थाच्या वाटेने वाटचाल झाली पाहिजे. हे ज्ञान सत्गुरुंच्या शिवाय दुसरे कोणीही करून देऊ शकत नाही. म्हणूनच देवापेक्षासुद्धा सद्‌गुरुला श्रेष्ठ मानले आहे.

अशाच थोर संतपरंपरेतील नाथसंप्रदायी अलौकीक व्यक्तिमत्त्व म्हणजे पावसचे प. पू. स्वामी स्वरुपानंद हे होत. स्वामींचा जीवनकाल १९०३ ते १९७४ असा आहे. यातील स्वातंत्र्यपूर्वीच्या काळातील स्वामीजी म्हणजे तेजस्वी क्रांतिकारी व्यक्तिमत्त्व होते. याच काळात त्यांनी 'स्वावलंबनाश्रम' म्हणून ओळखली जाणारी आश्रमशाळा काढली. ब्रिटिशांच्या दृष्टीने त्यांचे स्वातंत्र्यलढ्यातील कार्य हा देशद्रोह ठरल्यामुळे त्यांना कारावास पण भोगावा लागला. मूळ वृत्ती अध्यात्मिक असूनसुद्धा तत्कालीक सामाजिक कर्तव्याची गरज ओळखून स्वामीजींनी केलेले कार्य म्हणजे ''मऊ मेणाहुनी आम्ही विष्णूदास । कठीण वज्रास भेदू ऐसे ।' या उक्तींची आठवण करून देतात. १९३४ सालानंतरचे त्यांचे सारे जीवन मात्र सिद्ध पुरुषाचेच आहे.

सोऽहं साधनेचे अध्वर्यू व सतत सोऽहं भावातच रमणाऱ्या प. पू. स्वामी स्वरुपानंदांच्या चरणी 'कल्याणी' चे हे साहित्य पुष्प श्रद्धेने व विनम्र भावाने समर्पित करताना अतिशय आनंद होत आहे.

संत शिरोमणी श्रीज्ञानेश्वर महाराजांचे पारमार्थिक वारसदार आणि ज्ञानेश्वर महाराजांच्या प्रस्थान त्रयीतील साहित्याचे समर्थ भाष्यकार असलेल्या स्वामी स्वरुपानंदांनी आपली जीवन ज्योत तेवती ठेवून विसाव्या शतकातील आपल्या भक्तांचे अंतरंग उजळून टाकले आहे.

*सोऽहं हंसारुढ सद्‌गुरु स्वामी स्वरुपानंद ।*
*चरित्र गाथा, पावन गाता लाभे परमानंद ॥*

परमानंद देणाऱ्या अशा या थोर स्वामी स्वरुपानंदाच्या चरणी श्रद्धायुक्त अंतःकरणाने नमस्कार.

या वर्षीचा कल्याणीचा अंक अगदी आधुनिक काळातील म्हणजेच आमच्या वाचकांपैकी बऱ्याचजणांनी ज्यांचे प्रत्यक्ष दर्शन घेतले असेल व ज्यांच्याकडून प्रत्यक्ष अनुग्रह पण घेतलेला असेल. अशा स्वामी स्वरुपानंदांच्या जीवन गाथेवर असल्यामुळे तो सर्वांना निश्चितच आवडेल, याबद्दल आम्हाला संदेह नाही. विचारवंत लेखक हे आमच्या अंकाच्या यशाचे मुख्य मानकरी आहेत. त्यांचे बहुमोल लिखाण ते आम्हाला देतात त्यामुळे सर्वांना आवडणारा असा हा अंक आम्ही काढू शकतो. याची आम्हाला जाणीव आहे. त्यांचे हे ऋण आम्ही फेडू शकत नाही व फेडू शकणार पण नाही. हे पण आम्ही जाणून आहोत तरीसुद्धा एक औपचारिक शिष्टाचार म्हणून आम्ही त्यांचे आभार मानीत आहोत.

त्याचप्रमाणे ज्यांच्या सहकार्याने हा अंक निघू शकतो अशा सर्व जाहिरातदारांचे पण आम्ही आभारी आहोत. लेखक, जाहिरातदार आणि अंक काढणेसाठी हस्ते-परहस्ते मदत करणाऱ्या सर्व हितचिंतकांचे परत परत आभार मानल्याशिवाय आम्हाला रहावत नाही. या सर्वांचे आम्ही सदैव ऋणी आहोत.

वाचकांचा प्रतिसाद, हितचिंतकांच्या सदिच्छा या बळावर 'ओंकार' न्यासाची वाटचाल प्रगतीपथाच्या दिशेने चालू आहे.

॥ जय जय रघुवीर समर्थ ॥

**— सौ. रजनी काळे**

# अनुक्रमणिका

# परमहंस

पावसचे स्वामी स्वरुपानंद हे ज्ञानेश्वर माउलीच्या परंपरेतले थोर सत्पुरुष दि. ५ नोव्हेंबर १९७० रोजी त्यांच्या पावन दर्शनाचा योग आला. शुद्ध स्फटिकासारखं पारदर्शक असं ते रूप पाहिल्यावर वाटलं...

आज मी परमहंस पाहिला
शांतिसुखाचा सोलिव सुंदर शुभ्र कोंभ कोवळा !

नैराश्याची निशा आटली
प्रसन्नतेची पहाट फुटली
आनंदाचा सूर्य उगवला तापहीन आगळा !

झरे चांदणें या सूर्यातून
फुलली कमळें कणाकणातून
अवती भवती गंध कोंदला, तोच आंत सोहळा !

स्वरुप-रूपी पूर्ण रंगलों
प्रकाश पिउनी प्रकाश झालो
मी तूं सारें द्वैत संपले, जीव शिवा भेटला !

मधुकर कुलकर्णी

रत्नागिरी ।। जयमाताजी ।। पावस
दि. १७।२।७०

चि. प्रियश्री राम गोडबोले यांसी,
हरिस्मरणपूर्वक अनेक आशीर्वाद विशेष. ईशकृपेने इकडील सर्व क्षेम. माझी प्रकृति साधारण बरी आहे. तुमचे दि १४।२।७०चे पत्र पोहोचले.

तुमच्या वडिलांच्या प्रथम वर्ष श्राध्दानिमित्त प्रभुचरणीं प्रार्थना आहे की, प्रभुने त्यांस सद्गति द्यावी. व त्यांचा पुढील प्रवास सुखाचा व्हावा. या निमित्ताने वैकुंठवासी बाकाकाकांचेहि स्मरण करीत आहे. कळावे, तुमचे मातोश्रीस आणि तुम्हा सर्वांस आशीर्वाद.

तुम्हा सर्वांचा
आत्मतृप्त
स्वरुपानंद

# सोऽहम् साधना

## स्वामी विद्यानंद

*एम. ए. नोकरी डिफेन्स अकाऊंटस् - जबलपूर, पुणे १९८३ मध्ये स्वेच्छा निवृत्ती. आजीकडून अध्यात्माचा वारसा - लहानपणापासून विविध उपासना-साधना-विशेष दर्शने व अनुभव. १९६८ स्वामी स्वरूपानंदांचा अनुग्रह व सोऽहम् साधनेस ध्यासासह सुरुवात. १९७१ मध्ये 'स्वामी विद्यानंद' ही मुद्रा स्वामी अमलानंदांकडून मिळाली. भारतात व बाहेरही बराच शिष्यवर्ग. अध्यात्मिक उपासनेत व प्रपंचात मार्गदर्शनपर २४ ग्रंथ प्रकाशित.*

सध्याच्या समाजात सोऽहम् या तत्त्वज्ञानाविषयी तसेच सोऽहम् साधनेविषयी बरेचसे गैरसमज आहेत, अपसमज देखील आहेत. कित्येकदा असे म्हटले जाते की, सोऽहम् हा ज्ञानमार्ग आहे. भक्तिमार्गीयांना तो पेलण्यासारखा नाही. कित्येकदा असेही म्हणण्यात येते की, देवाची मूर्ती समोर असली की बरे वाटते. मूर्ती नसेल तर समाधान कसे मिळवता येईल ? काहींना सोहऽम् हे गूढ वाटते व ती साधनाच होऊ शकत नाही, असेही म्हणण्यात येते. काहींना ती क्लिष्ट वाटते, काहींना अनोळखी वाटते, काहींना असे वाटते की, या साधनेला ज्ञानेश्वर-तुकारामांनीच विरोध केला. आधुनिक संतांनीही विरोध केला. तथापि हे आक्षेप म्हणजे शुद्ध भ्रम आहे, असे सांगावेसे वाटते. कुठलीही गोष्ट आपल्या पूर्व संस्कारातून आपण घेतो. सहज एखाद्याने म्हटले, 'बागेत जाऊ या' बाग मी पाहिलेली नसते, परंतु कुठल्यातरी बागेत मी पूर्वी कधी तरी गेलेलो असतो व त्यानुसार मी आता जायचे असलेल्या बागेची कल्पना करतो. बागेत गेल्यावर माझ्या कल्पनेला तडा जातो. मला ती अद्‌भूत, रम्य व आकर्षक वाटते. तोपर्यंत मात्र माझे मनावर पूर्वीचाच भ्रम / संस्कार उमटलेला असतो. बहुतांशी आपले जीवन अशाच भ्रम संस्काराने व्यापलेले असते. यालाच जे. कृष्णमूर्ती 'Prejudiced Mind' असे म्हणतात. ज्या प्रमाणे पाटीवर आधीच कोणीतरी रेघोट्या काढलेल्या असल्या तर नवीन अक्षरे स्पष्ट उमटत (दिसत) नाहीत, त्याप्रमाणे प्रत्येक बाबतीत कुठले तरी संस्कार मनावर दाटलेले असल्याने नवीन गोष्ट मुक्त मनाने पाहणे शक्य होत नाही. आध्यात्मिक स्तरावरून बोलायचे तर सध्या समाज-मनावर भक्तीचा पगडा जास्त आहे. मात्र भक्तीविषयी एक विशिष्ट ग्रह निर्माण झाला असून भक्तीचे स्वरूप नीटसे उमगलेले नसते. त्यामुळे आपल्या कल्पनेतल्या भक्ती व्यतिरिक्त इतर काही समोर आले तर ते समजणे अवघड जाते. म्हणून तिकडे वळणेच नको अशी मनाची धारणा निर्माण होते. अशी काहीशी अवस्था सोहऽम साधनेच्याबाबत झाली आहे. त्यामुळेच समाजमानसात गैरसमज वा अपसमज पसरलेले दिसून येतात.

अगदी एका वाक्यात सांगायचे तर सोऽहम साधना ही अत्यंत साधी, सरळ, निरूपाधिक, आबालवृद्धांना तथा स्त्री-पुरुषांना सुलभ व सहजपणे समजणारी अशी आहे. संत कबीरांनी म्हटल्याप्रमाणे, 'ना मुँह हिले, ना कंठ हिले, राम हमारा जप करता है हम बैठे आराम ।' असे त्याचे स्वरूप आहे. अर्थात हे नीटपणे समजून घेण्याकरता आणि या साधनेचा सोपेपणा आचरणात आणण्याकरता एकूणच अध्यात्माची विचारधारा व त्याचे तात्त्विक अधिष्टान समजून घ्यायला हवे.

### अध्यात्माची बैठक

विश्वनिर्मितीच्या प्रक्रियेत मनुष्यप्राणी श्रेष्ठ मानला जातो. भाव-भावना, आवड-नावड-निवड, आसक्ती-निरासक्ती, प्रेम-आकर्षण-तिरस्कार, प्रेम-द्वेष इ. गोष्टी पशु-पक्षादी सर्व प्राण्यात आढळतात. प्रेम तिरस्कारादी सर्व भावनांचे उद्रेक पशुपक्ष्यादीतून विवेक शून्यतेने होतात. म्हणजेच हे करणे उचित आहे की अनुचित याचा विचार न करता होतात. या उलट मनुष्याचे असते. मनुष्य बुद्धिप्रधान आहे. त्याचे ठिकाणी विचाराची क्षमता आहे. विचारामुळेच तो योग्य-अयोग्य ठरवू शकतो. विषय व वासना यांनी जरी मनुष्य पछाडला गेलेला असला व वासनांचे कल्लोळ त्याचे मनात निरंतर उठत असले तरी त्या बाबतीत तो सम्यक् विचार करू शकतो. पुष्कळदा पशु-पक्ष्यांप्रमाणे तो वासनांच्या आहारीही जातो. त्यावेळी त्याचा विवेक सुटतो. परंतु पुन्हा केव्हा तरी झालेल्या कृतीचा पश्चात्ताप होऊन विवेकाने वागू लागतो. घड्याळाचा लंबक उजव्या किंवा डाव्या बाजूस सातत्याने झोका घेत असला तरीही लंबकाची मूळ प्रवृत्ती मध्यभागी येण्याची असते. त्या प्रमाणे बुद्धी व विचार यांचे कार्य मानवी जीवनात स्थायी भावाने विद्यमान असते. कारण बुद्धी नावाची एक महान संस्था माणसात कार्यरत असते. या बुद्धीच्या द्वारेच विश्वातील सर्व संशोधने आज प्रगत अवस्थेला आलेली दिसून येतात. आकाशातील भरारी असो, समुद्राचा तळ गाठणे असो, विज्ञानक्षेत्रातून नवीनतम मानवी सुखाची साधने निर्माण करण्याची असो, किंवा मानवी संहार करणारी शस्त्रास्त्रे असोत, या सर्वांचे कार्य चालू असते. आज तर आपण या बाबतीत जवळ जवळ शिगेला आलो आहोत, असे म्हणावेसे वाटते. तथापी एक बुद्धीजन्य विचार मांडावासा वाटतो की बुद्धीने बाह्य-विश्वाचा शोध घेतला, परंतु बुद्धीचा बुद्धीने कधी शोध घेतला का ? मन, मनाचे कार्य, बुद्धीची सखोलता, बुद्धीचा व्याप, चित्ताची एकाग्रता, चित्ताची विशालता इ. अंतःकरण चतुष्टयातील मन, बुद्धी, चित्त व अहंकार या सर्वांचा शोध घेण्याचे कार्य विश्वातील काही बुद्धीमान वैज्ञानिक करीत आहेत; हे खरे परंतु तो सुद्धा बाहेर बाहेरचा (वरवरचा) दुसऱ्याचे विचारांचा मी शोध घेतो. त्यावरून काही निष्कर्श काढतो, पण माझ्याच मनबुद्धीचा शोध मला घेता येत नाही. ज्या प्रमाणे मी माझ्या डोळ्याला पाहू शकत नाही, दुसऱ्याचा डोळा पाहतो, त्या प्रमाणे मी माझ्या मन/बुद्धीत शिरू शकत

नाही. दुसऱ्याचे मनाचे कार्यावरून वा बुद्धीचे कार्यावरून शोध घेतो व काही सिद्धांत प्रस्थापित करतो. माझा अनुभव मला त्यास सहाय्यकारी होतो. पण त्यामुळे मला माझे मन कळले असे मात्र होत नाही. कारण सर्व शास्त्रे, कला, विद्या या बहिर्मुख आहेत. बाहेरचे बघणाऱ्या आहेत. या उलट कार्य करणारे जे ते अंतर्मुख असते. म्हणजेच आतले बघणारे असते. मी व माझ्यातले बघणारे असते. दृष्टी उफराटी करून बघणारे असते. त्यालाच अंतर्मुख असे म्हणतात, अंतर्मुखतेची प्रक्रिया ज्यातून साधली जाते त्याला 'अध्यात्म' म्हणतात.

## अंतर्मुखतेतून आत्मदर्शन

मनुष्याच्या शरीराची रचना मोठी विलक्षण आहे तशीच ती कौतुकास्पद आहे. जेवढे आपण शरीराच्या एकेका भागाचा विचार करू तेवढे त्या भागाची रचना, त्यातील बारकावे, एका अवयवाचे दुसऱ्या अवयवाशी संबंध आणि संपूर्ण शरीरातील एकसंधता; हे सर्व पाहिले की मनुष्य स्तिमीत होतो. विश्वातील कुठल्याही मानव निर्मित यंत्रापेक्षा आपल्या देहातील प्रत्येक अवयवाची रचना त्याचप्रमाणे संपूर्ण देहाची रचना अतुलनीय आहे. बहिर्मुख वृत्तीने जेव्हा आपण या यंत्राकडे पाहतो तेव्हा त्याबद्दल कौतुक अवश्य वाटते. परंतु या देहरूपी यंत्राची केवळ कार्यपद्धतीच आपण बघत राहतो. त्याची निर्मिती, रचना, त्यात निर्माण होणाऱ्या विकृती आणि आपापतः विकृतींचा होणारा नाश या विषयी सुनिश्चित अशी धारणा निर्माण होत नाही. ती फक्त अंतर्मुख-वृत्तीनेच होते. अंतर्मुख-वृत्ती म्हणजे बाहेरचे अजिबात बघायचे नाही असे नव्हे तर बाहेरच्याचे दर्शन घडविणारी जी आपली आंतरीक रचना असते, तिचे संशोधन करणे व तिचा अभ्यास करणे. एक साधी गोष्ट घ्या, आपल्या शरीराचा विचार करू लागलो तर त्यात पंचमहाभूतांचा विचार येतो. पंचमहाभूते म्हणजे पृथ्वी, आप, तेज, वायू व आकाश. पृथ्वी ही जड वस्तू आहे. तर जड वस्तुतून अनुक्रमे जड व सूक्ष्म यांच्या मिश्रणातून पूर्ण सूक्ष्म अशा आकाशापर्यंत आपण जाऊन पोहोचतो. हे सर्व बाहेरचे आहे. या सर्वांचे देहावर आवरण आहे. परंतु यातून देहाची निर्मिती झाली आहे. सर्व पाचही घटक एका विशिष्ट पद्धतीने आणि प्रमाणबद्ध रितीने एकत्र केल्यानंतर त्यातून देह तयार होतो. म्हणजे देह रचना ही जड व सूक्ष्म अशा दोन वस्तूंतून निर्माण झालेली एक अद्भूत प्रक्रिया आहे. तिला अद्भूत म्हणावेसे वाटते, कारण मानवी प्रयत्नाने माणसाची अंतर्बाह्य आकृती तयार करता येते. आपल्या देहातल्या नाड्या, धमन्या, मांसलभाग व हाडासह पारदर्शकपणे अगदी प्लॅस्टिकचेसुद्धा तयार करता येईल. परंतु त्यात चलन वलन निर्माण करता येत नाही. यांत्रिक रीतीने हात-पाय हलवण्याइतके चलन वलन जरूर येईल. परंतु जन्म घेते वेळी असलेल्या अत्यंत लहान आकाराचा पुढे बालक होणार, तरुण होणार, प्रौढ होणार व म्हातारा होणार. जीर्ण झाल्यावर देहातील शक्ती उडून जाणार आणि देहातील पंच महाभूतांचे घटक त्या त्या भूतात विलीन होऊन जाणार. हे सर्व अंतर्मुखतेतूनच जाणीवेत उतरते. बर्हिर्मुखतेतून मनुष्य फक्त पाहतो. जाणीवेत उतरत नाही. जाणीव ही देखील मनाच्या अंतर्गत अशी शक्ती असते की ज्या ठिकाणी मनाचे शास्त्रीय कार्य भावनेचा अनुलेप धारण करू शकते आणि त्यातून कुठल्याही कार्याची यथायोग्यता प्रत्ययाला येते. मन, मनाचे कार्य, भाव, भावना त्यांचे कार्य, आणि आंतरिक संवेदना तथा जाणीवा या सर्व अद्भुतरम्य विषयांची आतूनच कुठून तरी कल्पना येते. ती जाणीव थोडक्यात जड व सूक्ष्म यांचे एकत्रिकरण जाणीवेलाच समजू शकते आणि तसे झाले म्हणजे समग्र सृष्टीविषयी, तिच्या रचनेविषयी, तिच्या कार्याविषयी आणि त्यालाच अनुसरून मनुष्य देह, मनुष्याचे विचार, भावना, तर्क, कृती, जाणीवा, शंका, समाधान, शांती, उद्वेग, धैर्य इ. इ. विषयी गूढ स्तरावरून मनुष्य स्वतःत शिरतो आणि मग केवळ स्तिमित, आश्चर्यचकीत होतो. हे सर्व करणारा जो कोणी असेल त्याचे विषयी परम आदराची भावना निर्माण होते. मानवी शक्तीच्या व बुद्धीच्या पलीकडचे हे सर्व आहे याची विशुद्ध जाण येते आणि त्यालाच तो परमेश्वर किंवा देव असे संबोधतो. मनुष्य सूर्य पाहून स्तंभित होत नाही तर सूर्यात अष्टोप्रहर वसत असलेले तेज व त्या तेजाचा निर्माता पाहून तो स्तंभित होतो. लाकडाचा तुकडा परमाणूपर्यंत फोडला तरी मनुष्य स्तंभित होत नाही. पण परमाणूच्या आंतमध्ये सतत खेळणारी ऊर्जा व 'Electron, Protons & Neutrons इत्यादी तिचे घटक पाहून तो स्तंभित होतो. आकाश पाहून मनुष्य स्तंभित होत नाही तर न दिसणाऱ्या धूम्र वलयापर्यंत स्वतःच्या कवेत घेणारे आणि अनेक सूर्य व ग्रहमालिका यांना आपल्या पोटात दडवणारे आकाशाचे विशालत्व पाहून मनुष्य स्तंभित होतो. जेथे जेथे मनुष्य स्तंभित होतो, म्हणजेच त्याच्या निर्मितीविषयी, कार्याविषयी व पौरुषाविषयी त्याची बुद्धी कुंठीत होते, त्यालाच तो ईश्वर म्हणून समजतो. विशालाचे विशालत्व, तेजाचे तेज व सूक्ष्मांचे सूक्ष्मत्व ज्यात विद्यमान असते त्यालाच आपण देव, ईश्वर किंवा परब्रह्म असे समजतो. हे सर्व अंतर्मुखतेतून कळते आणि अंतर्मुखतेतूनच मनुष्य प्रत्येक क्षेत्रात जड तथा सूक्ष्मतेचा आढावा घेत राहतो. आपल्याच देहातील केस तथा नखे यास जड म्हणायचे की सूक्ष्म म्हणायचे ? सूक्ष्म किंवा चेतनशील म्हणावे तर केस वा नखे कापल्यावर दुःख होत नाही आणि जड म्हणावे तर त्याची वाढ असते. चैतन्याशिवाय कुठलीही वाढ संभवत नाही. चैतन्यच वाढीकरिता आवश्यक तो रस पुरविते. केस मुळातच किती बारीक त्याच्याही आंतमध्ये रस वाहिनी असावी आणि एवढे सूक्ष्म कार्य असून ही जड वस्तूप्रमाणे त्याला संवेदना नसावी ही केवढे अद्भुत आहे ? आपल्या देहासह समग्र विश्वाचा वेध माणसाला घेता येतो. आजपर्यंत त्याने घेतला आहे. बहिर्मुखतेतून घेतलेला वेध आपल्याला माहीत आहे. त्यातूनच सध्याची नानाविध सुखसाधने उदयाला आलेली आहेत. सुखसाधने अफाट प्रमाणात वाढली. परंतु त्यातून खरे सुख आपल्याला मिळते का ? याचा विचार मात्र अंतर्मुखतेतूनच करावा लागतो. त्यातून सुख म्हणजे काय ? सुख कुणाला मिळते ? सुखाचा उपभोग कोण घेतो ? इत्यादी विचार प्रवर्तित होतात. सुख मिळते म्हणजे थोडक्यात सांगायचे तर बरे वाटते. बरे मनाला वाटते, परंतु सुख-प्रक्रिया देहावर होते. मऊ गादीवर झोपणे, हिवाळ्यात गरम पदार्थ सेवन करणे,

उन्हाळ्यात शीत पदार्थ सेवन करणे, लोकांकडून स्तुती ऐकणे, सुंदर दृश्य पाहणे, सुरेल संगीताची तान कानावर येणे, रुचीपूर्ण पदार्थ जिभेवर पडणे, इ. गोष्टी माणसाला सुखी करतात. त्यातून मन प्रसन्न होते. तथापी, या मनाला प्रसन्नता देणारी शक्ती कुठून येते ? उन्हाळ्यात प्रसन्नता देणारी शक्ती हिवाळ्यात प्रसन्नता देऊ शकत नाही. म्हणजेच प्रसन्नता येण्याकरिता किंवा प्रसन्नता कायम राखण्याकरिता बदल बाह्य वस्तूत व्हावा लागतो. आतल्या वस्तूत जेथून प्रसन्नता देणारी शक्ती निर्माण होते व मनात उतरते त्यात होत नाही. ती एकच एक असते व स्थिर असते. पण तिच्यामुळे मनाचे कार्य घडते. त्याचबरोबर देहाचेही कार्य घडते. सर्व भाव-भावनांचे, विचारांचे, तर्काचे व बुद्धीचे कार्य घडते. काही थोर व वीर पुरुषांनी, साधु-संतांनी, महात्म्यांनी अंतमुर्ख होऊन या सूक्ष्म शक्तीचा शोध घेतला. त्याला त्यांनी 'आत्मा' असे नाव दिले. देहातील चलन-वलन, राग-द्वेषादी विकार, विषय, वासना, या विषयी अनुराग तथा द्वेष, प्रेमाची, जिव्हाळ्याची, आत्मियतेची जाण, तिरस्कार, शत्रुत्व, स्वार्थ, मत्सर इत्यादी सर्व मानवी देहांत ज्यातून निर्माण होते त्याला सातत्याने शक्तीचा पुरवठा करणारे जे तत्त्व त्याला 'आत्मा' असे मानले. आत्मशक्तीचे वैशिष्ट्य असे आहे की, विजेप्रमाणे यंत्राला जे फक्त पुरवठा करते, यंत्रकार्यात गुंतून रहात नाही. पंख्याचे फिरणे असो, शेगडीचे जळणे असो किंवा दिव्याचे प्रकाश देणे असो, विजेचा पुरवठा असल्याखेरीज त्यांचे कार्य चालणार नाही. परंतु कार्यात मात्र पुरवठा कुठेही गुंतून असणार नाही. श्रीज्ञानेश्वरांनी म्हटले, 'दीपाचेनी प्रकाशे । गृहींचे व्यापार जैसे । देही कर्मजात जैसे । योगयुक्ता॥' योगी सर्व कर्मे करतो. परंतु दिव्याच्या प्रकाशाप्रमाणे तो कशातही गुंतलेला नसतो. हे आत्म्याचे वैशिष्ट जाणून मन आणि बुद्धीच्या द्वारे त्या आत्म्याचा शोध घेणारा व आत्म्याशी तद्रूपता मिळविणारा, तो योगी. अंतर्मुखतेतून अशी योग प्रक्रिया उदयाला येते.

आत्म्याच्या आधारावर मानवी देहात तीन संस्था उदयाला आल्या आहेत : १) जीव, २) शिव, ३) आत्मा. जीव-कार्यात वासना, विषय, इंद्रिये, मन व बुद्धी यांचा समावेश होतो. इंद्रियाचा संबंध पंचमहाभूतांशी येतो. पंच महाभूते व पंचज्ञानेंद्रिये शब्द, स्पर्श, रूप, रस व गंध या पंच-तन्मात्रांमधून आपले संबंध प्रस्थापित करतात. एकूण जीवाचे कार्य हे बहिर्मुखतेचे कार्य आहे. बाहेरच्या विश्वातील व्यवहार करीत असताना अनेक प्रकारचे अनुभव मनाच्या माध्यमातून जीव ग्रहण करतो. अर्थात बाह्य विश्व हे अतिविशाल व विलोभनीय आहे. जीवाला ते आकृष्ट करते. अधिकाधिक हाव वाढवते. हावेतून विवेक सुटतो. मनुष्य भोगाधीन होतो. भोगाच्या आहारी जातो व त्यातून विनाश घडून येतो. भगवत गीतेत सांगितलेली साखळी प्रत्यक्षात उतरते, 'संगात् संजायते कामः कामात क्रोधोभिजायते । क्रोधात् भवति सम्मोहः सम्मोहात् स्मृतिविभ्रमः । स्मृतिविभ्रमात् बुद्धीनाशः । बुद्धीनाशात् प्रण्यशतिः ।' भोगासक्त जीव विनाशाकडेच जातो, असा जागतिक इतिहासाचा दाखला आहे.

दुसरी आत्मानिर्मित संस्था म्हणजे शिव. शिव ही सुस्थिर अशी शक्ती आहे. इंद्रिये-वासनेनुसार व त्याच्या आकर्षणानुसार ती पळत नाही. आपण दिव्याकडे बघतो व पतंग दिव्यावर झेप घेतो. दिव्यावर झेपावल्याने तो जळतो व मरतो. आपले तसे होत नाही. त्याप्रमाणे शिव हा फक्त जीवाच्या वृत्तीकडे बघत असतो. जीव पतंगाप्रमाणे झेपावतो. शिव मात्र शांत व स्थिर असतो. जीव आणि शिव यांची योजना अशी आहे की जीव भोगासक्त झाल्याने दुःखी होतो. क्लेश त्याला असह्य होतात. असहाय्य परिस्थितीत कुणाच्या तरी मदतीची तो याचना करतो. तेव्हा स्वाभाविकपणे तो अंतर्मुख होतो. स्वतः स्वतःकडे आतून बघतो. तेव्हा शांत व स्थिर असलेला शिव त्याला दिसतो. तो जीवाच्या कार्यात मदत करीत नाही; मात्र 'न धरी शस्त्र करी मी । गोष्टी सांगेन युक्तीच्या चार ।' असे श्रीकृष्णाने अर्जुनास सांगितले त्याप्रमाणे तो जीवाला काही उपदेश करतो. जीव उपभोगाची कडू फळे खात असल्याने दुःखी होतो व शिव आत्म्याची गोड फळे खात असल्याने सुखी रहातो. हे तत्त्व तो जीवाला समजाऊन सांगतो व स्वतः प्रमाणे जीवानेही बहिर्मुख वृत्ती टाकून अंतर्मुख वृत्ती धारण करावी म्हणजे त्यालाही आत्मसुखाची गोड फळे खाता येतील व शांत, सुखी व स्थिर जीवन जगता येईल, असा उपदेश करतो.

तिसरी संस्था प्रत्यक्ष आत्म्याची संस्था आहे. तिचे कार्य दोन प्रकारचे असते. नदी ज्या प्रमाणे दोन किनाऱ्यांतून वाहते आणि दोन्ही किनाऱ्यांवर गरजेप्रमाणे कार्य करीत राहते, तसे आत्म्याचे आहे. एका बाजूला शिव व जीवाच्या कार्याला तो रस पुरवितो व दुसऱ्या बाजूने परमात्म्याशी जोडलेला असतो. अनेक आत्मे मिळून परमात्मा तयार होतो. प्रत्येक आत्मा देहापुरता सिमित असतो. परमात्मा विशाल असतो. परमात्म्यासह सर्व विश्वाला चेतना पुरविणारा तो विश्वात्मा. विश्वात्म्याची शक्ती ब्रह्मामुळे कार्यान्वित होते आणि ब्रह्माला तेज परब्रह्माकडून प्राप्त होते. अशी ही आत्म्यापासून परब्रह्मापर्यंत अखंड साखळी तयार होते. म्हणूनच त्याला उपनिषदांनी मर्यादा व सेतू असे म्हटले आहे. जीवाची अंतर्मुख झाल्यानंतर जी अत्युच्च्य दशा येते, ती आत्म्याची. परंतु विश्वात आत्मा हाच सर्वोच्च्य नाही. आत्म्यापर्यंत आल्यावर जीवाला परब्रह्म प्राप्तीकरता एक वेगळे सोपान गवसते. म्हणून त्याला सेतु असे म्हटले आहे. एकूण लक्षात येईल की जीव कुठल्या का कारणाने होईना अंतर्मुख झाला तर तो आत्मा या श्रेष्ठ मर्यादेपर्यंत जाऊन सेतूला प्राप्त करतोच व थेट परब्रम्हापर्यंत जाऊ शकतो.

## वैश्विक धारणा

ज्ञानदेवांनी सोऽहम् तत्त्वज्ञानाविषयी मोठे सुंदर विवेचन केले आहे. ते म्हणतात, "मी वाचून काही । भिन्नाभिन्न आन नाही । सोहऽम् बोधे तयाचे ठायी । अनन्यु होय ॥" आतापर्यंत आपण देह तथा विश्व यांच्या जुळणीतून जीवाकडून जे कार्य घडते त्याचा विचार केला. जीव मर्यादित आहे. पशू असो वा मनुष्य असो, त्यांच्या एका देहापुरता जीवावर (देहावर) आवरण आहे, ते मात्र विराटाचे. त्यामध्ये पंच महाभूते येतात. ग्रह गोल व तारका येतात. त्यानंतर धुम्र वलये येतात आणि आधुनिक विज्ञानाप्रमाणे अनंत सूर्य व ग्रहमालिका येतात. बाहेरचे विराट स्वरूप असो किंवा देहातील तुलनेने जीवाचे अतिशय लहान,

जीवरूप असो; दोन्हींना कार्यप्रवण करणारी, सगर्भ तेज देणारी, पोषण करणारी आणि कार्यावर मर्यादा घालणारी शक्ती मात्र एकच आहे. विश्वातील परब्रह्मशक्ती आत्म्यापर्यंत येते; देहात ती जीवापर्यंत उतरते. परब्रह्माची व्यापक दुसरी शक्ती विश्वात्म्यातून विश्वभर पसरते. झाडामाडात, डोंगरदऱ्यात, सरोवर-सागरात आणि जड पाषाणापासून तो सप्त धातूपर्यंत तीच एकली एक पसरलेली असते. बर्गसॉच्या सिद्धांताप्रमाणे जड वस्तूच्या परमाणूत तीच विद्यमान असते. शक्तीला नावे आपण देतो. मूळ शक्ती मात्र नावातीत आहे. नावातीत शक्ती लहानशा झुडुपातही दिसून येते. वस्तुनिष्ठपणे विचार केला तर झाडाचे बी वाळवून निर्जीव केले जाते. म्हणजे ती जड वस्तू तयार होते. पाणी, माती, खत मुळातच जड. यांच्या संयोगातून मात्र चेतन वस्तू निर्माण होते. बीजाला कोंब फुटतो. पुढे ते बहरते, मोहरते, सुफलीत होते. त्यात रुचिपूर्ण रसाचे भरण होते. घ्राणेंद्रियांना धुंद करणारा सुगंध त्यातूनच बाहेर पडतो. दृष्टीला सुख देणारे सौंदर्य पानोपानी नाचू लागते. हा सर्व चैतन्याचा प्रकट आविष्कारच नव्हे का ? तसेच समुद्रावर पडणाऱ्या सूर्य प्रकाशातून एक तेजस्वी धारणा शक्ती निर्माण होते. त्याचा परिणाम बाष्प रूपाने प्रकट होतो. त्याचे ढग बनतात आणि जणू काही सगळा समुद्र आकाशात तरंगू लागतो. जे पाणी गुरुत्वाकर्षण शक्तीमुळे जड रूप धारण करते व जमिनीवर प्रवाहित होण्याशिवाय त्याला अन्य पर्याय नसतो. तेच पाणी बाष्परूपाने तरंगू लागते. हजारो पर्जन्यधारांनी पुन्हा कोसळू लागते. सूक्ष्मताही घेते व जडताही धारण करते. अनेक प्रकारांनी अशा प्रकारचा खेळ सृष्टीमध्ये अहोरात्र चालू असतो. निसर्ग नियमानुसार या सर्व गोष्टी घडत असतात. तथापि निसर्गाची निर्मिती ज्याच्याकडून झाली ते परब्रह्मच. म्हणजे जीवात काय किंवा त्या जीवावर आच्छादन असलेल्या विराटात काय. एकच एक तत्त्व सर्वत्र भरलेले आहे. त्यालाच आपण परब्रह्म म्हणतो. आपले सर्व देव उदा. राम, कृष्ण, गणपती, शिव, हनुमान, दत्त इ. सर्व त्या परब्रह्माचेच आविष्कार म्हणून मानलेले आहेत. ही सर्व माझीच रूपे आहेत असे श्रीकृष्णाने भगवत् गीतेत प्रतिपादन केले. त्या वेळी तो श्रीकृष्ण देवकीपुत्र म्हणून मर्यादित नव्हता तर परब्रह्म म्हणून अमर्याद होता. या सर्व विशालतेला धरून ज्ञानदेवांनी विधान केले की, 'मी वाचून काही । भिन्नाभिन्न आन नाही ।' मी वाचून म्हणजे परब्रह्मावाचून वेगळे असे काही विश्वात संभवत नाही. म्हणून जीवापासून परब्रह्मापर्यंत एकत्वाने भरलेली शक्ती प्राप्त करून घेण्याचा प्रयत्न करण्यातच मानवी देहाची कृतार्थता आहे. ज्ञानदेवांनी कृतार्थता कशी मिळवावी याचेही मार्गदर्शन केले आहे. त्यासाठी ते म्हणतात की, भगवंताशी अनन्य व्हायला हवे. अनन्य होणे म्हणजे समर्पित होणे. समर्पण करणे वेगळे व समर्पित होणे वेगळे. जसे ईश्वराला आपण नैवेद्य समर्पित करतो. मी तयार केलेले अन्नपदार्थ देवाला अर्पण करतो. म्हणे मी वेगळा देव वेगळा व पदार्थ वेगळा. आध्यात्मिक परिभाषेत यालाच त्रिपूटी म्हणतात. त्रिपूटीतून जो व्यवहार होतो त्याला द्वैत म्हणतात. द्वैतामुळे एकरूपता येत नाही. भाव जरी शुद्ध असला, प्रेमाचा जिव्हाळ्याचा असला, तरी दोन-पणा कायम असतो. देव व भक्त असे द्वैत त्यात असते. हे द्वैत मोडल्याखेरीज जीवाची प्रगती होत नाही. म्हणजेच वर वर्णन केल्याप्रमाणे जीव शिवाकडे जाऊन जीव-शिव ऐक्य प्रस्थापित होत नाही व दोन्ही मिळून एक झाल्याखेरीज आत्म्याचे प्रभावाचे मानवी अस्तित्व उदित होत नाही. ते उदित व्हावे, म्हणून स्वामी स्वरूपानंदांनीदेखील अशी मागणी केली की, 'देव व भक्त असे द्वैत असायला हरकत नाही परंतु ते, 'अद्वयत्व न खंडिता' असे असावे. आत्म्याच्या प्रभावाखाली येणारा जीव हीच अद्वैत दशा पावतो. अद्वैत दशा संपन्न झाल्यावर जेव्हा तो भौतिक जीवनात उतरतो, तेव्हा अद्वैयाचा प्रभाव कायम ठेवून त्याचे व्यवहार द्वैतात घडून येतात. भौतिक व्यवहारात देवाण-घेवाण असते म्हणून त्यात द्वैत येणारच. तथापि आंतरिक जाण अद्वयाची असली म्हणजे आपल्याच दोन हातांनी एकमेकांशी व्यवहार करावेत, त्याप्रमाणे वैश्विक व्यवहार घडून येतात, ते सरळ असतात, प्रेमळ असतात, निष्पाप असतात, म्हणून अद्वयत्व न खंडिता अशी प्रार्थना स्वामी स्वरूपानंदांनी केली. यालाच समर्पित वृत्ती म्हणावे. देवाला नैवेद्य समर्पण केल्यानंतर नैवेद्य मी समर्पण करतो, ही भावना न ठेवता मी व माझे समग्र जीवन देवाला समर्पित आहे, अशी धारणा ठेवली तर ती आत्म्यातून उदित होणाऱ्या वैश्विक धारणेशी संलग्न होते आणि माझ्या रूपाने देवच अन्नपदार्थ निर्माण करून घेतो व स्वतःला समर्पित करून घेतो. देवच कर्ता, देवच करविता, मी फक्त त्याचा समर्पित स्तरावरील पायिक; ही विशुद्ध अनन्यतेची धारणा ज्ञानदेवांनी याच धारणेचे महत्त्व प्रतिपादन केले व ही धारणा कशी निर्माण करावी त्याचेही गुह्य सांगितले. 'सोऽहम् बोधे' असे ते म्हणतात. याचा अर्थ 'सोऽहम्' हे तत्त्वज्ञान आहे. विशाल स्वरूपाचा तो एक विचार प्रवाह आहे. शिवाय ते केवळ तत्त्वज्ञान नसून त्याचे प्राप्तीकरता निर्माण झालेली ती स्वतंत्र आणि स्वयंभू अशी साधना आहे.

## सोऽहम साधना

संत एकनाथ महाराजांनी सोऽहम् साधनेचे विवरण करताना असे म्हटले की, 'प्राणाचेनी गमनागमने । सोऽहम् हंसाचेनि स्मरणे । सावधाने जो करू जाणे । तेणे पाविजे हे स्थान ॥' हे स्थान म्हणजे परमश्रेष्ठ परब्रह्माचे स्थान. 'तेणे पाविजे', असे म्हणत असताना 'त्यालाच' हे स्थान प्राप्त होईल असे एकनाथांना अभिप्रेत आहे. 'त्यालाच' म्हणजे कुणाला तर जो प्राणावर आधारीत साधना करील आणि ही साधना करीत असताना 'सोऽहम्' चे भान ठेवील; किंबहुना मनामध्ये स्थिरवृत्तीने 'सोऽहम्' असा भाव ठेवील त्याला. आतापर्यंतच्या विवेचनावरून एक गोष्ट लक्षात येण्यासारखी आहे की, वैश्विक रचनेत मानवी जीवाला एक श्रेष्ठ वैशिष्ट्यपूर्ण असे स्थान आहे. परब्रह्म आत्म्याचे रूपाने मानवी देहात प्रकट आहे. आत्माच शिवात उतरतो आणि जीवात उतरतो. म्हणजे जीवापासून परब्रह्मापर्यंत अखंड साखळी आहे. ही साखळी हेच मानवी जीवनाचे खरे खुरे अस्तित्व आहे. जेव्हा आपण 'मी' म्हणून स्वतःकडे बोट दाखवतो, तेव्हा त्याचा संकेत जीवाकडे येतो आणि जीव हा परब्रह्माचा अंश आहे, असे गीतेचेही प्रतिपादन आहे. 'ममैवांशो जीव लोके जीवभूतः सनातनः ।' मी हा जीव आणि

जीव हे परब्रह्म; म्हणजेच मी हे परब्रह्म हाच भाव संस्कृतमध्ये व्यक्त होताना 'सोऽहम्' ही संज्ञा त्याला प्राप्त होते. 'सोऽहम्' चा साधा अर्थ 'सः अहम् ।' तो मी आहे, असा होतो. थोडक्यात 'मी परब्रह्म आहे' अशी भावना हे 'सोऽहम् साधने'चे मुख्य सूत्र आहे. परब्रह्म अव्यक्त आहे, तथापि कुठलेही व्यक्त रूप धारण करण्याची क्षमता त्याच्यात आहे. त्यानेच समग्र सृष्टी निर्माण केली. सृष्टीच्या संचालनाकरिता त्याने दशावतार धारण केले. सगुण-निर्गुण ही एकाचीच दोन अंगे आहेत. त्यानुसार व्यक्त असो वा अव्यक्त असो, ईश्वर म्हणून तो मान्य करायला अध्यात्मशास्त्राची आडकाठी नाही. आपण राम, कृष्ण, शिव हे देवही मान्य करू शकतो आणि अव्यक्त परब्रह्महीं मान्य करू शकतो. 'सोऽहम साधने'मध्ये धारणा फक्त एवढीच ठेवावी लागते की मला मान्य असलेला कुठलाही देव माझ्या बाहेर नाही. किंबहुना माझ्यापासून वेगळा नाही. 'सोहम्' उपासना ही अद्वैत उपासना असल्याने तो देव मीच आहे. म्हणजे माझ्या हृदयातील जीवशक्ती देवाचे रूपाने कार्य करीत आहे, अशी केवळ मनाची धारणा. ही धारणा मात्र दृढ असावी, निष्ठेने भरलेली असावी आणि त्याबद्दल जिव्हाळा, प्रेम असावे हे सर्व आतून असावे म्हणजे हृदयातून असावे, अंतःकरणाचे गाभ्यातून असावे. यालाच उद्देशून एकनाथांनी 'स्मरणे' हा शब्द वापरला. त्याचे फक्त स्मरण असावे. ओठांची पुटपुट ही अभिप्रेत नाही. हे स्मरण करत असताना माध्यम प्राणाचे वापरावे अशी अपेक्षा आहे. जीवापासून परब्रह्मापर्यंत अखंडपणे कार्यरत असलेली साखळी आपल्या ठिकाणी प्रकट होते ती प्राणातून आणि प्राण प्रकट होतो तो श्वासातून. श्वसनासाठी आत्मशक्तीच कार्यान्वित होते. ही आत्मशक्ती श्वसनाबरोबर प्राणरूपाने बाहेर पडते व पुन्हा आत येते. असे हे प्राणाचे गमना-गमन, येणे व जाणे ही क्रिया सातत्याने अष्टौप्रहर प्रत्येक जीवाचे ठिकाणी चालू असते. हे कार्य सहजतेने नेहमी करता चालू असते. परंतु अद्वयावस्थेकडे जाण्यासाठी याचा वापर विशिष्ट हेतूने करावा लागतो. 'सोऽहम' ची मनामध्ये धारणा ठेऊन हेतूपूर्वक पद्धतीने, नादाकडे अनुसंधान ठेऊन – 'सोऽहम' चा मनातल्या मनात किंवा भ्रामरी पद्धतीने उच्चार केल्यास ही साधना शक्तीशाली होते. नाम जपाप्रमाणे याचा केवळ शाब्दिक जप अभिप्रेत नाही. मनामध्ये 'सोऽहम्' ची भावना ठेवून शाब्दिक जप केला तरी हरकत नाही, असे श्रीगजाननमहाराज गुप्ते यांचे सांगणे असे. ज्यांना अगदीच श्वासावर जप करणे शक्य नसेल त्यांनी तसे करावे. परंतु श्वासावर जप करण्याने तो जप न रहाता अजपा होतो. जपापेक्षा अजपेमध्ये जास्त शक्ती असल्याने श्वासावरच केवळ आतून स्मरण ठेवून मनातून उच्चार करावा. म्हणजे ते 'सोऽहम्' ध्यान तयार होते. 'सोऽहम् साधना' हे 'सोऽहम्' ध्यान आहे. समर्थ रामदासांनी त्याबद्दल असे म्हटले, 'एकांती मौन धरोनि बैसे । सावध पाहता ऐसे भासे । सोऽहम् सोऽहम् ऐसे । शब्द होती ॥ ऐसी हे स्थिती सकळासी । परंतु कळे जाणत्यासी । सहज सोडोनी सायासी । पडोच नये॥...

समर्थांच्या मते 'सोऽहम् साधने' शिवाय अगदी नामजपासह कुठलीही साधना हा सायास आहे, कष्टप्रद आहे. सोऽहम्च्या साधेपणाविषयी संत कबीर असे म्हणतात 'ना मुँह हिले ना कंठ हिले । राम हमारा जप करता है हम बैठे आराम ।' देहाला सर्वात जास्त आरामदायक परंतु प्रत्यक्ष परमेश्वरांनीच करून घ्यावी अशी साधना म्हणजे 'सोऽहम् साधना' आहे. श्रीज्ञानदेवांनी तर या साधनप्रक्रियेचे, तिच्या कार्याचे व फल-निष्पतीचे एकत्र व सुंदर वर्णन केले आहे. "बळीये इंद्रीये येती मना । मन एकवटे पवना । पवन सहजे गगना । मिळोचि लागे ॥ ऐसे नेणो काय आपैसे । तयासीच कीजे अभ्यासे । समाधी घर पुसे मानसाचे ॥" साधनेकरितां काही पथ्ये आवश्य सांभाळावी लागतात. तरीपण इंद्रिये इतकी बलवान आहेत की झाडाची पालवी खुडली की अंकुर आणखी जोमाने उगवू लागतात. त्याप्रमाणे इंद्रियांचे दमन केले तरी इंद्रियवृत्ती अधिक उफाळून वर येतात. तथापि इंद्रिय वृत्तींना प्रकट होण्याकरिता व तृप्ती लाभण्याकरिता मनाशिवाय दुसरे साधन नाही. मनाचे कार्य हे श्वासावर आधारित असते. क्रोधादी विकार उद्‌भवले की श्वसन वेगात चालते. मनुष्य स्वस्थ व शांत असतो तेव्हा श्वसन ही मंद गतीने चालत असते. श्वसनाचे आणखी एक कार्य असे की श्वसनामुळे प्राण थेट ब्रह्मांडांत जातो. त्यालाच ज्ञानेश्वरांनी 'पवन सहजे गगना मिळोची लागे' असे म्हटले आहे. पवन म्हणजे श्वास आणि गगन म्हणजे हृदयाकाश किंवा मूर्धन्याकाश अर्थात या करता विशेष अभ्यास करावा लागतो. अभ्यास म्हणजे सोऽहम् साधना. साध्या सहज सोहम साधनेचे फलित मात्र असे आहे की, न कळत तो समाधी अवस्थेत शिरतो. ज्ञानदेवांनी तर असे म्हटले की समाधी नावाची युवती सोऽहम् साधकाचे हृदय द्वार स्वतः उघडते आणि पुष्पमाला त्याला अर्पण करते. एकूण या साधनेच्या साधे व सोपेपणाबरोबरच त्याचे सामर्थ्यही लक्षात येते. सामर्थ्य हे फलरूपाने समाधीच्या माध्यमातून अनुभवास येतेच, परंतु प्रत्यक्ष साधन प्रक्रियेमध्ये देखील सामर्थ्याचा अनुभव येतो. संत एकनाथ महाराजांनी आपल्या हिंदी अभंगात असे म्हटले, 'एक सास ले जाता है तिन लोक का मोल । कहता कहना करिया आपका बजाऊँ ढोल ॥' कहता कहना करीया हा त्रिपूटी आहे. श्वासागणिक जो नाद (ढोल) निर्माण होतो त्यामुळे त्रिपूटीचा भंग होतो आणि श्वासाच्या कार्याला इतकी प्रचंड गती येते की तो तिन्ही लोकांना व्यापून रहातो. श्वास वायूरूपाने आत जातो व तसाच बाहेर पडतो. परंतु प्रत्येक श्वास आत शिरत असताना भूलोक, भूवर्लोक व स्वर्लोक या तिन्ही मधील आध्यात्मिक तत्त्वे सूक्ष्मपणे खेचून घेतो, हीच तत्त्वे प्राण्याच्या माध्यमातून देहात जिरतात. अध्यात्मिक प्रगतीला ती अत्यंत पोषक ठरतात. नेहमीचा प्राण इतका वेगळ्या अवस्थेत येतो की, त्याचा प्रणव तयार होतो. प्रणव ही शक्ती आहे. जी ॐ मधून उदयाला येते. ॐ हे परब्रह्माचे नाम आहे. नामामध्ये सामर्थ्य अनुस्यूत असते. नाव व नाम यामध्ये किंचित फरक आहे जसे दशरथपुत्र राम हे नाव आहे किंवा देवकीनंदन कृष्ण हे नाव आहे. परंतु अयोध्याधीश त्रिखंडात कीर्ति गाजवणारा आणि रावणाचा वध करणारा भौतिकातला सामर्थ्यशाली आणि अध्यात्मातला विष्णूंचा अवतार असलेला राम हे नाम आहे. तीच गोष्ट भगवान श्रीकृष्णाची. या अर्थाने ॐ हे परब्रह्माचे नाम आहे. ज्या नामाचे स्मरणाने जीव उत्क्रांत होऊन आत्मदशेत येतो ते सामर्थ्य ॐ मध्ये सामावलेले आहे. अ, ऊ आणि म या तीन स्वरांनी हे सामर्थ्य

गठीत झालेले आहे. अ या स्वराचा संबंध थेट पृथ्वी तत्त्वाशी येतो. उ चा संबंध अंतराळ (स्वः) तत्त्वाशी येतो व म चा संबंध स्वर्गापासून तो सत्य लोकांपर्यंत येतो. एकूण ॐ चा उच्चार करत असताना पृथ्वी पासून तो सत्य लोकांपर्यंत म्हणजे 'आघवे ब्रह्म' येथपर्यंत पोहोचतो आणि अध्यात्म प्रगतीची सर्व द्वारे एकदम उघडल्यासारखी होतात. एवढी प्रचंड प्राप्ती लिलया केवळ साधनेतून होते. साधना एरवी कुठल्याही प्रकारची असली तरी ती शेवटी अजपेमध्ये म्हणजे 'सोऽहम्' मध्ये लीन व्हावी लागते. म्हणून जेथे आपल्याला शेवटी येणेच प्राप्त आहे; ते सुरुवातीपासूनच अंगिकारले तर अधिक लाभदायक ठरणारे असते. ज्ञानदेवांचे भाषेत बोलायचे तर 'रोग ही जातो आणि खायलाही गोड' अशी ही सोऽहम् साधनारूपी गोळी आहे.

## स्वामी स्वरूपानंदांचे आगळे वैशिष्ट्य

आधुनिक जगातले नाथ संप्रदायी विशाल व्यक्तिमत्त्व म्हणजे स्वामी स्वरूपानंद. नाथ संप्रदायाचे वैशिष्ट्य वर्णन करीत असताना ज्ञानदेवांनी म्हटले आहे 'पिंडे पिंडाचा ग्रासु । तो हा नाथ संकेतीचा दंशु ।।' आपला देह हा एक पिंड आणि अखिल ब्रह्मांड हा दुसरा पिंड. ब्रह्मांड हे आकाशा-एवढे आणि पिंड हे मुंगी एवढे. एका सामान्य जीवाने उंच उडी घेऊन आकाशाला मिळावे, असे ते आहे. यालाच उद्देशून मुक्ताबाईने, स्वतः अनुभवलेला नवलाव प्रकट केला. 'मुंगी उडाली आकाशी । तिने गिळीले सूर्यासी ।' असे ती म्हणते. ज्ञानदेव म्हणतात, 'पिंडाने ब्रह्मांडाचा ग्रास घ्यावा, म्हणजे जीवाने परब्रह्माला मिठी मारावी. वस्तुतः अशक्यप्राय वाटणारी ही गोष्ट सोऽहम् साधनेतून शक्यतेच्या कोटीत येऊन स्थिर होते. फक्त करावे लागते ते एवढेच - दर क्षणाला सोऽहम् प्रक्रियेकडे जी सहजपणे व नित्य चाललेली असते, तिकडे लक्ष द्यावे. स्वामी स्वरूपानंद म्हणतात ''नाभीपासून ब्रह्मरंध्रात सोऽहम् ध्वनी असे खेळत । तेथे साक्षेपे देऊनी चित्त । रहावे निवांत घडी घडी ।।' 'घडी घडी' असा मनाचा निवांतपणा अनुभवाला यावा. म्हणजे यातून विवेक प्रत्ययाला येतो. थोडा प्रयत्न व थोडी कृपा यातून काय घडते तेही स्वामी पुढे सांगतात, 'घडिघडि करावा विवेक । देहादी प्रपंच मायीक । सत्य नित्य शाश्वत एक । असे निशंःक आत्मरूप ।।. पुढे साधकाची वागण्याची पद्धत कशी असावी असे अत्यंत प्रेमाने स्वामी सांगतात, 'आत्मरूपी दृढ विश्वास । आत्माचि मी हा निदिध्यास । साक्षीत्वे साहून सुख दुःखास । करावा अभ्यास नित्य नेमे ।।' जे घडोघडी अनुभवास येते त्यात सातत्य टिकवावे. किंबहुना त्याचा नित्य नेमाने अभ्यास करावा. आत्म्यावर दृढ विश्वास आणि आत्माच कर्ता सवरता ही सदृढ श्रद्धा या गोष्टी अधिकाधिक बळकट करण्याकरिता साधी-सोपी सोऽहम् ध्यानाची बैठक कदापि सोडू नये. त्याकरिता नाथ संप्रदायी सिद्धांचे स्मरणही असावे. स्वामी पुढे म्हणतात, 'नित्य नेमे सिद्ध स्मरण । करावे भावे सोऽहम् ध्यान । चालता बोलता अनुसंधान । प्रयत्ने करीन असो द्यावे ।।' सोऽहम् ध्यानाबरोबरच इतर वेळी देखील मनाला सात्विक मुशीमध्ये ठेवण्याकरिता 'सोऽहम्'चे अनुसंधान राखण्याचाही प्रयत्न करणे उचित आहे. त्यामुळे चित्त प्रसन्न राहाते. ईश्वरावरील निष्ठा वाढते. स्वाभाविकच संकट-समयी मनुष्य ईश्वरालाच साद घालतो. तोही धावून येतो आणि केवळ संकटमुक्त करतो. इतकेच नव्हे तर परब्रह्म हे आपले मूळ स्थान आहे आणि ज्याला आपण देव-देवतांच्या रूपाने बघतो त्या आनंदाच्या मूळ स्थानावर भगवंत 'सोऽहम' साधकाला अधिष्ठित करतो. स्वामी पुढे म्हणतात 'असो द्यावे चित्त प्रसन्न । भगवंती निष्ठा पूर्ण । तो संकटी सत्वरी धावून । देई संरक्षण निज भक्ता ।। निजभक्तासी घेऊनी जवळी । कृपा कटाक्षे कुरवाळी । जेथीचा तेथे नेवोन घाली । आनंद मेळी स्वरूपाच्या ।।

## भगवत गीतेतला पुरुषोत्तम म्हणजे मीच

सोऽहम साधनेची सुरवात अत्यंत साधी-सोपी आहे. श्वासावर आधारित, आपल्याच देहातून उमटणाऱ्या नादाकडे लक्ष देऊन विश्वातले जे परम श्रेष्ठ, दिव्य, मंगल, उदात्त व गौर वर्णीय आहे ते मी आहे, अशी फक्त मनात भावना बाळगून सहज रीतीने घडणारी ही 'सोऽहम् साधना' आहे. पातळ पाण्याच्या आधाराने अत्यंत टणक, कठीण तथापि सर्वोपयोगी जणू कल्पवृक्ष असावा असे श्रीफल निर्माण होते त्याप्रमाणे साध्या, सुलभ व सोप्या साधनेतून विश्वातले परम श्रेष्ठत्व अंगभूत होते. साधनेच्या प्रवासात अनेक प्रकारचे अनुभव येतात. त्यातून जाणवते ते विश्वाचा पोषणकर्ता फक्त एकला एकच आहे. मात्र तो विश्वाचे पोषण अत्यंत प्रेमाने-जिव्हाळ्याने करतो, जणू काही विश्व ही त्याची प्रजा किंबहुना अपत्य आहे, अशा भावनेने करतो. हे कार्य करण्याची त्याची पद्धतही फार आगळी व वेगळी आहे. तो स्वतःच जाळे पसरतो. तंतुमय, मऊ, मुलायम, ज्याच्या अस्तित्वाची जाणीवही होणार नाही. असे पण तेजःपुंज असणारे ते जाळे असते. त्या जाळ्यात प्रत्येक व्यक्ती सामावलेली असते. व्यक्ती जाळ्यात असूनही स्वतंत्र असते. जाळ्यातील सुरक्षितता ती व्यक्ती अनुभवते. त्याच वेळी परमोच्च उन्नती साधण्यासाठी ती मुक्त असते. स्वतःचे परम कल्याण ती व्यक्ती जाणू शकते. त्या दृष्टीने हवा तो प्रयत्न ती करू शकते. अनेकात राहून ही एकली असते. एकली असताना परम तत्त्वाशी एकताही ती अनुभवू शकते. 'सोऽहम साधने'तून हे सर्व दिसते. वेगवेगळेपणाने अनुभवास येते. द्वैताचे रहस्य उमगते. होता होता अद्वैताची क्रांती घडून येते. द्वैत गळून पडते. न कळत तो परमतत्त्वाशी एकरूप होतो. 'मी तो आहे' ही भावना धूसर होते, अंधुक होते, गळून पडते आणि शेवटी 'मी तो आहे' ही स्पष्ट जाणीव आकाराला येते. 'मी तोच आहे', या भूमिकेवर तो आरुढ होतो. मी देव होऊन राहतो. ईशावास्य उपनिषदाने त्याचे सुंदर वर्णन केले आहे. ते म्हणते, ''पूषन् एकर्षेयम सूर्य । प्राजापत्य व्यूह रश्मीन् समूह । तेजोयत्ते रूपम् कल्याणतमम् । तत्ते पश्यामि । योसः असौ पुरुषः । सोऽहम् अस्मि ।।''

**स्वामी विद्यानंद**
दिव्य जीवन वाटिकाश्रम, पुणे-सासवड रस्ता,
मु. पो. वडकी ४१२ ३०८. जि. पुणे.

# चरित्रगाथा पावन गाता लाभे परमानंद!

**डॉ. सौ. सुनीति दुबळे**

*एम.ए. (संस्कृत-पाली), पीएच. डी. (प्राचीन भारतीय संस्कृती), निवृत्त प्राध्यापिका संस्कृत-प्राकृत भाषा विभाग पुणे विद्यापीठ, संगीत विशारद, डिप्लोमा इन इंडॉलॉजी. आकाशवाणीवर 'गीर्वाणभारती' या कार्यक्रमात भाषणे. 'चिंतन' या सदरात लेखन. तसेच 'कान्हेरी संदेश' मध्ये नियमित लिखाण. डिसेंबर १९७७ मध्ये स्वामी माधवनाथांची अनुग्रह कृपा. स्वामींच्या आज्ञेनुसार जून १९८० पासून प्रवचनसाधना सुरू. १९९२ मध्ये स्वामींच्या आज्ञेने 'पारमार्थिक मार्गदर्शक' म्हणून नियुक्ती. मराठी तसेच इंग्रजी लेख प्रसिद्ध.*

१९८९ सालच्या स्वामीजयंती प्रित्यर्थ स्वामी महाराजांचं चरित्रगान करावं असा प्रस्ताव माझ्यासमोर आला. पण थोडक्या वेळात सम्यक् चरित्र मांडणं हे सोपं काम नव्हतं. पण श्रीगुरुंच्या कृपाशीर्वादाने अवघड गोष्ट सहज होऊन गेली. श्रीगुरु स्वामी माधवनाथांना हे बिकट कार्य करण्यासाठी आपली कृपा असावी असं म्हटलं तेव्हा ते सस्मित मुद्रेने म्हणाले, 'कृपा आहेच !' त्या कृपेचं हे शब्दरूप 'चरित्रगाथा पावन गाता लाभे परमानंद !'

***सोऽहं हंसारूढ सद्गुरु स्वामीस्वरूपानंद ।***
***चरित्रगाथा पावन गाता लाभे परमानंद ॥***

सर्वसामान्यतः साधकांना साधना करताना अडचणी आल्या म्हणजे असं वाटतं की ही परिस्थिती इतकी प्रतिकूल नसती तर मी अधिक चांगली साधना करू शकलो असतो. अव्यग्र मनाने ध्यानसाधनेत, नामसाधनेत अधिक चांगली प्रगती करू शकलो असतो. पुष्कळ वेळा साधनेतील ढिलाईचे समर्थन करण्यासाठीदेखील परिस्थितीची सबब पुढे केली जाते. ही सबब तितकीशी खरी नसून अत्यंत प्रतिकूल परिस्थितीत परमार्थ साधना करता येते. इतकेच नव्हे तर त्या साधनेचे अंतिम फलित असलेली अत्युच्य परमहंस स्थिती पौरुष प्रयत्नांनी प्राप्त करून घेता येते, हे दाखवून देण्यासाठीच स्वामी स्वरूपानंदांचा लीलावतार झाला.

पावसला १९०३ सालच्या डिसेंबर महिन्यात पंधरा तारखेला गोडबोले घराण्यात स्वामी महाराजांचा अवतार झाला. त्यांच्या ईश्वरभक्त आजीला काही कारणाने घरातून घालवून दिले होते. त्यानंतर तिने नरसोबाच्या वाडीला बारा वर्षे तपश्चर्या केली होती आणि त्याचा परिपाक म्हणून 'तुमच्या वंशात ईश्वरभक्त निर्माण होऊन कुळाची कीर्ति दिगंती पसरेल' असा आशीर्वाद एका सत्पुरुषाने दिला होता. तो आशीर्वाद या बालकाच्या रूपाने साकार झाला.

***पावसग्रामी पुत्र जाहला । तपस्विनीच्या कुळी जन्मला ।***
***रामचंद्र अभिधान त्याला ।.त्याच्या रूपे प्रकट जाहला आनंदाचा कंद ॥***

स्वामींचे वडील विष्णुपंत हे स्वभावाने निगर्वी, सालस, सरळ, एकमार्गी, एकांत प्रिय, विरक्त आणि अत्यंत शांत होते. त्यांना वैभवाची, मानमान्यतेची किंवा कीर्तीची मुळीसुद्धा हाव नव्हती. स्वामींची आई हुशार आणि कर्तबगार होती, व्यवहारदक्ष होती. श्रीमंत घराण्यातील असल्याने तिला मात्र समृद्धी आणि ऐश्वर्य यांची आवड होती. निदान आहे ते टिकवणं आवश्यक आहे, असं तिला वाटत होतं. व्यवहाराच्या दृष्टीने ते बरोबरच होतं. करारी, शिस्तप्रिय माता आणि प्रेमळ चुलती यांच्या लालनपालनात सर्वच मुलांनी बाळबोध वळण आणि सदाचारणाचे संस्कार ग्रहण केले होते. रूपसुंदर रामचंद्रांच्या लोभस गुणांमुळे ते सर्वांना हवेहवेसे वाटत. घरच्या मंडळींचे तर ते लाडके होतेच पण मित्रमंडळींमध्येही अत्यंत प्रिय होते. सगळ्यांना गोळा करून अत्यंत मनमिळावू पद्धतीने ते अनेक खेळ खेळत असत. त्यांची शुद्ध सत्त्वगुणी वृत्ति बाल वयातच प्रकट दिसत होती. काहीही करायचं असलं तरी त्याचं नेतृत्व सहजच त्यांच्याकडे येत असे. खेळांच्या नियमांचं काटेकोर पालन करण्यावर त्यांचा कटाक्ष असे. ते सांगतील तसं सगळी मुलं बिनबोभाट करीत असत. त्यांच्याबरोबर खेळताना सर्वांना भारी आनंद वाटायचा. त्यांच्या आकर्षक व्यक्तिमत्त्वाचा सगळ्यांनाच लोभ जडायचा.

***'शुद्ध सत्वगुण मंडित वृत्ति । हवीहवीशी बाह्य आकृति ।***
***आनंदाची पखरण करिती । सवंगड्यांसह खेळ खेळती बाळे होती धुंद ॥'***

त्यांचे मामा केशवराव गोखले हे धार्मिक वृत्तीचे परमार्थी होते. स्वामींच्या घरातही मामांमुळेच परमार्थाला अनुकूल असं वातावरण निर्माण झालं होतं. तथापि स्वामींची खूप चौकस वृत्ति होती. कोणतीही गोष्ट मनापासून पटल्याशिवाय अनुसरण करणं त्यांना मान्य नव्हतं. ते अनेक प्रश्न विचारत असत आणि त्यांच्या साऱ्याच प्रश्नांना वडीलधाऱ्या मंडळींजवळ समाधानकारक उत्तरं असायचीच असं नव्हे. तरीसुद्धा वडील मंडळींच्या इच्छेला मान देऊन काही गोष्टी त्यांना संतोष व्हावा यासाठी ते करत असत. आपल्या या भाच्याची चौकस वृत्ती, कुशाग्र बुद्धी व वर्तनाची विनम्र रीती यांमुळे मामांच्या अंतःकरणात त्यांच्याविषयी अत्यंत जिव्हाळा होता.

पावसमध्ये मराठी पाचवीपर्यंत शिक्षण झाल्यावर माध्यमिक शिक्षणासाठी स्वामी रत्नागिरीला गेले. तिथे त्यांना वृत्तपत्रं, पुस्तकं वाचण्याचा छंद लागला. लोकमान्यांचे राजकारणविषयक विचार त्यांना भारावून टाकू लागले. चार-पाच वर्ष रत्नागिरीत काढल्यानंतर पुढील शिक्षणासाठी ते मुंबईला गेले. त्या काळच्या तरुणांप्रमाणे स्वामीही देशप्रेमाने भारलेले होते. लोकमान्य टिळकांच्या महानिर्वाणानंतर महात्माजींच्या असहकाराच्या चळवळीत स्वामींनी स्वतःला झोकून दिलं आणि पुढील शिक्षण राष्ट्रीय शाळेत घेतले. पावस हेच कार्यक्षेत्र निश्चित करून त्यांनी तिथे स्वावलंबनाश्रम स्थापन केला. या शाळेत बहुविध

आणि अभिनव शिक्षण देण्याचा उपक्रम त्यांनी सुरू केला. राष्ट्रप्रीतीची आवड आजूबाजूच्या समाजात निर्माण करून त्याचं स्वत्व जागं करण्याचा ते मनापासून प्रयत्न करू लागले.

*'राष्ट्रप्रीतीची ध्वजा घेतली । राष्ट्रिय शाळा स्थापन केली ।*
*शिक्षणरीती नव अनुसरली । नवयुवकांना बाळां लाविति स्वातंत्र्याचा छंद ॥'*

परंतु पुढे ब्रिटिश सरकारची वक्र दृष्टी राष्ट्रीय शाळांकडे वळली आणि विद्यार्थ्यांच्या अभावी स्वावलंबनाश्रम बंद करावा लागला. लोकोद्धारासाठी झटणाऱ्या स्वामींपाशी असलेल्या सुप्त, पारमार्थिक सामर्थ्याची त्यांच्या मामांना जाणीव झाली होती आणि म्हणून त्यांना पुण्याला नेऊन त्यांनी मोठ्या प्रेमाने श्रीसद्गुरु गणेशनाथ तथा बाबा महाराज वैद्य यांच्या पायांवर घातलं. स्वामींना पाहिल्याबरोबर सद्गुरु महाराजांनी स्नेहाळ कृपादृष्टीने अवलोकन केलं आणि उभयतांना मोठाच आनंद झाला.

*'मातुल प्रेमे घेउनि जाती । पुण्यपत्तनी गुरु भेटविती ।*
*सोऽहंची ते दीक्षा देती । 'स्वानंदाचा मार्ग खुला तुज' वदति संत श्रीमंत ॥'*

यथाकाल सोऽहंचा अनुग्रह स्वामींना बाबा महाराजांकडून मिळाला खरा; परंतु स्वामींच्या अनुग्रहाविषयी काही कल्पना होत्या. त्यानुसार एकदम खूप बदल जाणवेल अशी त्यांची अपेक्षा होती. त्यांनी अंतःशोध घ्यायला सुरुवात केली. सद्गुरुंच्या सान्निध्यात आनंदाची दिव्य अनुभूति आली होती. तथापि त्या पलीकडे काही खास फरक झाला आहे, असं वाटेना. त्यामुळे त्यांनी श्रीसद्गुरुंनाच शंका विचारली. त्यांच्या 'अमृतधारा' या ग्रंथात ते सांगतात :

*''पुण्यपत्तनी श्रीसद्गुरुंनी पथदर्शी होऊन ।*
*'ॐ तत्त्वं सोऽहं सः' श्रुतिची दाखविली मज खूण ॥*
*म्हणति आणि ते कोण कुणाचा करी येथ उद्धार ।*
*स्वयें कष्टल्याविण का होतो कोठे आत्मोद्धार ॥''*

श्रीमहाराज म्हणाले होते, 'दूध विरजलं आहे. यथाकाल त्याचं दही झालेलं तुला दिसेल. या मार्गात घाई करून चालत नाही.'

*'गणेशनाथे वाट दाविली । दृष्टि अंतरी शोधु लागली ।*
*बदल दिसेना बुद्धी शिणली । गुरु सांगती 'दूध विरजले दही होतसे मंद' ॥*

आपल्या साऱ्या उद्योगांबरोबरच स्वामींची सोऽहं साधना श्रीगुरु निर्दिष्ट मार्गाने नियमितपणे चालू झाली. अनुग्रहानंतर सात वर्षातच त्यांनी तुरुंगात असताना लिहिलेल्या 'नवरत्नहार' या काव्यातून त्यांच्या उच्च आध्यात्मिक स्थितीची कल्पना येते. ते काव्य वाचून श्रीबाबामहाराज कौतुकाने म्हणाले होते, ''अरे वा ! तू तर स्वरूपानंद झालास !' हेच नाम पुढे सर्वार्थाने सार्थ करत स्वामींनी धारण केलं.

स्वावलंबनाश्रम या राष्ट्रीय शाळेतील तीन विद्यार्थ्यांना घेऊन प्रवेश परीक्षेकरता स्वामी पुण्यात आले. त्यानंतर उच्च शिक्षणही तिथेच घेण्याचा बेत त्यांनी आखला. तिघा मित्रांपैकी एकाची नातेवाईकांकडे सोय झाली. तथापि तिघांच्या उदरनिर्वाहाची व्यवस्था करण्यासाठी दिवसाचे सात-आठ तास कष्ट करूनही पुरेसं अर्थार्जन होऊ शकत नव्हतं. त्यामुळे घरीच स्वयंपाक बनवणं प्राप्त होतं. त्यातही वेळ जात होता. आपल्या दोन मित्रांचे शिक्षण सुरळीतपणे व्हावं यासाठी त्या काळात स्वामींनी अपार कष्ट केले. स्वेच्छेने स्वतःचं शिक्षण मागे ठेवलं. ते गोपाळगायन समाजाजवळ एक खोली घेऊन राहिले. तिथून जवळच असलेल्या 'समर्थ भारत प्रिंटिंग प्रेस'मध्ये त्यांना काम मिळाले. आधी त्यांना प्रेसच्या कामाची काहीच माहिती नव्हती. पण थोड्याच दिवसांत खिळे जुळवण्यापासून प्रुफं वाचण्यापर्यंत तिथल्या सर्व कामांत ते प्रवीण झाले आणि रोज आठ तास काम करून महिना तीस रुपये पगार त्यांना मिळू लागला. कालांतराने त्यांना टिळक महाविद्यालयाच्या वैदिक संशोधन मंडळात कारकून म्हणून काम मिळाले. पाच तास काम व चाळीस रुपये पगार असा दुहेरी लाभ झाला. त्यामुळे त्यांना अभ्यासाकरिता थोडी सवड मिळू लागली. परंतु पैसा जास्त मिळाला तरी पुस्तकांच्या खरेदीसारखे काही खर्चही वाढले असल्याने तो पुरेना म्हणून स्वामी नोकरीशिवाय काही कंत्राटी कामेही करू लागले. त्यासाठी त्यांना टिळक विद्यापीठाचे कार्यवाह रा. ग. हर्षे, म. म. दत्तो वामन पोतदार, विद्यानिधि सिद्धेश्वरशास्त्री चित्राव, मीमांसा विद्यालयाचे संचालक किंजवडेकरशास्त्री यांची मुख्यत्वे करून मदत झाली. म. म. पोतदारांनी वेदांतातील तीन ग्रंथ छापण्याची कामगिरी स्वामींवर सोपविली होती. हस्तलिखित पोथ्यांवरून टीपा तयार करून देणे, प्रुफं तपासणे अशी सर्व महत्त्वाची कामं स्वामींनी केली. उदंड कष्ट केले. त्या दोन मित्रांसाठी त्यांच्या अंतःकरणात वसत असलेला स्नेहभाव स्तिमित करणारा आहे. याचबरोबर ते शक्य तेवढा सद्गुरु सहवासाचा लाभ घेतच होते.

देशप्रेमाची ज्योत अंतःकरणात निरंतर तेवत होती. तिच्या प्रकाशात जो मार्ग दिसला त्यानुसार सत्याग्रह करून त्यांनी कारावासही भोगला. याही काळाचा उपयोग त्यांनी आपल्या साधनेसाठी करून घेतला. बरोबरच्या देशभक्तांना त्यांच्या अंतःस्थितीची कल्पना पुरेपूर आली नसली तरी ते वेगळेच आहेत हे सर्वांना कळत होते. त्यामुळेच त्या तुरुंगात त्यांना 'स्वामी', 'मुनि' अशा उपाधी प्राप्त झाल्या.

यानंतर स्वामींच्या जीवनात एक तरुणी आली. परस्पर परिचयाचं रूपांतर प्रीतीत झालं आणि त्यांनी विवाहबद्ध होण्याचा निर्णय घेतला.

*'प्रीतीची फुलबाग बहरली । युवती सुंदर तयां भेटली ।*
*सहजीवन स्वप्नेही फुलली । पुण्यपत्तनी वास करावा असा ठरविला बेत ॥'*

या निर्णयानुसार ऑक्टोबरमध्ये पुण्याला परत यायचं. उरलेले चार विषय देऊन टिळक महाराष्ट्र विद्यापीठाची 'वाङ्मय विशारद' ची परीक्षा पूर्ण करायची असं त्यांनी ठरवलं. या परीक्षेचे सहा विषय त्यांनी १९३४ सालच्या एप्रिल महिन्यात झालेल्या परीक्षेत लिहून पूर्ण केले होते. त्यात उत्तम यशही मिळाले होते. ही परीक्षा पार पडली की पत्रकारितेचा पेशा पत्करून पुण्यातच वास्तव्य करायचं असं त्यांनी योजलं आणि परीक्षेच्या अभ्यासासाठी ते पावसला गेले. परीक्षेसाठी पुण्याला जाताना पावसमधील सर्व आवराआवर करून जायचं असा त्यांचा विचार होता. परंतु हा त्यांचा विचार दैवाला मानवला नाही.

*'दैवाचा घणघात जाहला ज्वरसंतप्त शरीर ।*
*मृत्यु भयाने कंपित अंतर नयनी लोटे नीर ।*

*जगन्माउली त्या षण्मासी देत तयांना धीर ।*
*सद्‌गुरुबोधे सोऽहं साधन तोडितसे भवबंध ॥'*

स्वामी आजारी झाले. काही दिवसांतच ताप गेला पण कमालीचा अशक्तपणा आणि परकाष्ठेची भूक यांनी ते व्यथित झाले. त्यांचे स्वावलंबनाश्रमातील शिष्य व सन्मित्र डॉ. बाबा देसाई औषधोपचारांची शिकस्त करीत होते. पण प्रकृतीत सुधारणा फारच मंद गतीने होत होती. सहा महिने असेच निघून गेले. बाह्यात्कारी स्वामींची प्रकृति फारच बिघडली होती. पण त्याचाही त्यांनी आपल्या साधनेला उपयोग करून घेतला. त्यांची अंतःस्थिती कशी होती याचं सुंदर चित्रण त्यांच्या 'अमृतधारा' या साक्यांच्या संग्रहात पहायला सापडतं. ते म्हणतात :

*'मरणभय तदा अंतःकरणी कारण मोहावरण ।*
*सोऽहंस्मरणे परि अतां दिले निर्भयतेने ठाण ॥*
*निधान संनिध परि घोर तमी इतस्ततः भ्रमलो मी ।*
*ज्ञानकिरण दर्शनें अता सत्प्रकाश अंतर्यामी ॥'*
*'भवती गतिमत् जगदक्षरशः षण्मास परिभ्रमले ।*
*निजली काया उभी कराया म्हणुनि चित्त ना धजले ॥*
*'भ्रमे, भ्रमो भंगुर ते परते होई तू मच्चित' ।*
*माता आपण अशी प्रतिक्षण होती शिकवण देत ॥'*

त्या दुर्धर आजारात ते सोऽहं भजनात अखंड तन्मय राहिले. आणि त्यांनी अहोरात्र जगन्मातेची आराधना केली. ती परम कृपाळु माता त्यांच्यावर प्रसन्न झाली. सोऽहंबोध ठसावला आणि सारं विश्व आत्मारामस्वरूप दिसू लागलं.

*'भुः भुः भुः भुंकते श्वान ते ? छे ! छे ! प्यारे राम ।*
*डरॉंव डरॉंव बेडूक ओरडे ? छे रे ! आत्माराम ॥*
*चिंव् चिंव् गाते चिमणी ? छे छे माझाप्यारे राम ।*
*टिटिव् टिटिव् टिव् टिट्वी ? छे रे माझा आत्माराम ॥'*
*'मी-तूपणा अस्तवले आले साधनेस पूर्णत्व ।*
*कणकणात कोंदले एकले एक नित्य सत्तत्त्व ॥'*

असा सर्वत्र भरलेल्या आत्मतत्त्वाचा अनुभव ते घेऊ लागले. आता प्रपंचाच्या आसक्तीला थारा कसा मिळणार ? देहस्थिती पहिल्यासारखी होईल अशीही शक्यता दिसत नव्हती. अशा अवस्थेत आपल्या प्रियतमेला वचनबद्ध ठेवणं त्यांच्या ऋजु हळुवार मनाला रुचेना. त्यांनी तिला कळवून टाकलं की 'इतउप्पर विवाहाचा विचार करणं सर्वथैव अशक्य आहे तेव्हा मी तुला वचनमुक्त करीत आहे.' तिला उद्देशून दोन साक्या त्यांना स्फुरल्या. ते म्हणतात,

*'नसानसातुनि ते संतांचे नाचे अस्सल रक्त ।*
*जाण साजणी आजपासुनी आम्ही जीवन्मुक्त ॥*
*कर्मविपाके जाण मला गे लागे 'साधब वेड' ।*
*जीवन्मुक्तासही न चुकते प्रारब्धाची फेड ॥'*
*सोऽहं बोधात पूर्ण डूब देऊन बसलेले महाराज*
*'सुहास्य वदन प्रसन्न दर्शन निर्मल अंतःकरण ।*
*मित मधु भाषण शुद्ध मन तथा सदैव सत्याचरण ॥'*

या षड्विध सज्जन लक्षणांची चालती-बोलती मूर्तीच बनले. अर्थातच परमेश्वर त्यांना वश झाला. तथापि यानंतरचं त्यांचं लौकिक जीवन म्हणजे तितिक्षेची परम सीमा होती. अमानित्व, अदंभित्व, प्रेम, अहिंसा, दया, क्षमा, शांति, नम्रता, नेमस्तपणा, साधेपणा, प्रसन्नता आदी सर्वश्रेष्ठ दिव्य गुणांचा आविर्भाव त्यांच्या जीवनात सुस्पष्टपणे प्रत्ययाला येत होता.

*'रामचंद्र प्रभुरूप जाहले । परमहंसपद पूर्ण पावले ।*
*नाम स्वरूपानंद लाभले । आणि जनांना प्रेमें दाविति स्वानंदाचा पंथ ॥'*

यानंतरच्या काळात त्यांनी जे लेखन केलं ते साधकांना परोपरीने मार्गदर्शन करणारं असंच आहे. जी उच्च आध्यात्मिक अवस्था त्यांनी पौरुष प्रयत्नांनी प्राप्त करून घेतली ती मिळवण्यासाठी काय साधना करायला हवी हे स्वामींनी अतिशय सोप्या नि गोड भाषेत सांगितलं आहे. ते म्हणतात :

*'बैसोनी एकांती करी सोऽहं ध्यान । तेणे तुझे मन स्थिरावेल ॥१॥*
*'सोऽहं' 'सोऽहं' ऐसा शब्दाविण जप । होता आपोआप चित्तशुद्धी ॥२॥*
*कैसा शब्दाविण होतो 'सोऽहं' ध्वनि । घेई विचारोनी संतांपासी ॥३॥*
*स्वामी म्हणे जाई संतांसी शरण । तेणे उद्धरण होय तुझे ॥४॥*

विश्वव्यापक सच्चिदानंदघन परमात्मा तोच मी. सःअहम् हा बोध करून घेणं हे मानवी जीवनाचं अंतिम फलित आहे, हे श्रुतिस्मृतींनी सांगितलेलं सनातन सत्यच स्वामी महाराजांनी पुन्हा एकदा, आज समजेल अशा भाषेत सांगितलं.

*हा बोध घेण्यासाठी 'धनसुतदारा असो दे पसारा ।*
*नको देऊ थारा आसक्ती ते ॥ होवो हानिलाभ पावो सुखदुःख ।*
*न सोडी विवेक साक्षित्वाचा ॥'*

असा उपदेश ते करतात. सोऽहं ध्यानाची अगदी सोपी प्रक्रिया स्वामी महाराजांनी 'स्वरूप पत्रमंजूषे' त सांगितली आहे. ते त्या पत्रात लिहितात की आधी साधुसंतांचं, सद्‌गुरुंचं स्मरण करून त्यांना ध्यानासाठी पाचारण करावं आणि मग मोठ्या आनंदाने ध्यानाला बसावं. ते पुढे लिहितात :

*'साधुसंतांचे होता स्मरण । घेता तयांचे मनोमय दर्शन ।*
*लाभतां तयांचे संनिधान । सहजे मन प्रसन्न होय ॥*
*प्रसन्न मन गगनी शिरता । गगन रूप होते सर्वथा ।*
*'त्या गगनाचाही द्रष्टा मी' ऐसे भाविता । उन्मनावस्था अनुभवा ये ॥*
*त्या अनुभवाची सहज स्थिती । शब्दे वर्णावी कवणे रीती ।*
*ज्याची त्यासी येता प्रचीति । आनंद चित्तीं न सामावे ॥'*

ध्यानसाधना करणाऱ्या साधकाला अगदी नेमकं मार्गदर्शन करून ध्यानकाळी येणाऱ्या अनुभूतींच्या मर्यादा ते स्पष्ट करून सांगतात आणि काय अंतिम स्थिति असते तेही सांगतात. ते म्हणतात :

*'होतां सोऽहंभजनी तन्मय । एकवटोनी ज्ञाता ज्ञेय ।*
*येई आत्मसुखाचा प्रत्यय । अतींद्रिय स्वभावें जे ॥*
*नादश्रवण प्रकाशदर्शन । तेथे श्रोता द्रष्टा कोण ? ।*
*तो आत्माचि मी हे ओळखून । तदनुसंधान राखावे ॥*
*सदा स्वरूपानुसंधान । हेचि भक्ति हेचि ज्ञान*
*तेणें तुटोनी कर्मबंधन । परम समाधान प्राप्त होय ॥'*

असं ध्यान करावं ही गोष्ट खरी पण नुसतं सोऽहं ध्यान करून भागणार नाही. त्याला भक्तिप्रेमाची जोड हवी. त्यासाठी ते देवापाशी मागणं मागतात :

*'मागणे हे एक देई भक्तिप्रेम । देवा तुझे नाम गाईन मी ॥१॥*
*आवडीने देवा गुण मी वर्णीन । प्रेमे न्याहाळीन रूप तुझे ॥२॥*
*भक्तिभावे तुझे करीन पूजन । अंतरीं चिंतन निरंतर ॥३॥*
*स्वामी म्हणे पायीं ठेवीन मी माथा । तेणें माझ्या चित्ता समाधान ॥४॥'*

ते असंही सांगतात, 'आवडीने भावें हरिनाम गावें । निर्लज्ज नाचावें संकीर्तनीं ।।' ध्यानाबरोबर असं आवडीने संकीर्तन, पूजन करीत करीत भगवंतांच्या पायी नतमस्तक होत 'स्वामी झाला राममय।' अशी अनुभूति ते वर्णन करतात आणि त्यासाठी रात्रंदिवस हरीचं चिंतन करून त्याच्या पदी स्थिर होण्याच्या आवश्यकतेवर ते भर देतात. अशा तऱ्हेने त्या रमावराला शरण गेल्यावर 'सर्व सुखें' घराला आली असा प्रत्यय येईल याची ते स्वानुभावाने खात्री देतात. स्वामींचं 'संजीवनी गाथे'तील काव्य अत्यंत रसाळ, कमालीचं भावपूर्ण, जागोजाग भक्ति-ज्ञान-योग या मार्गातल्या खुणा दाखवणारं, अनुभूतीतून उमललेलं आणि हृदयाचा वेध घेणारं आहे.

असा हा आत्मतृप्त महापुरुष प्रसन्नतेचं लेणं लेवून कोकणातल्या आडवळणी खेड्यात बसला होता पण त्याची पुष्कळ उशिरापर्यंत मराठी माणसाला जाणीव नव्हती. स्वामींना जे सांगायचं होतं ते सांगून झालं होतं. जे जिज्ञासू त्यांच्याकडे गेले त्यांना अनुग्रह देऊन कृतार्थ जीवनाचा महामार्ग त्यांनी खुला करून दिला होता. परंतु नाथसंप्रदायाची धुरा सांभाळायला समर्थ असा शिष्योत्तम मिळावा याची ते वाट पहात होते. जगन्माऊलीने त्यांच्याकडे सत्यदेवानंद सरस्वती, अमलानंद व बाळासाहेब वाकडे यांना धाडून दिलं. या तिघांनाही स्वामींनी अनुग्रहाचे अधिकार बहाल केले. बाळासाहेब ६८ साली प्रथम स्वामींकडे गेले. हा पूर्ण तयारीचा साधक शिष्य पाहून स्वामींना परम समाधान झालं. पहिल्याच भेटीत त्यांनी बाळासाहेबांना अनुग्रह दिला. त्यानंतर चार-पाच वर्ष अध्यात्म क्षेत्रातील सूक्ष्मातिसूक्ष्म साधना स्वामींनी त्यांच्याकडून करून घेतल्या. त्यांना स्वतःशी एकरूप करून घेतलं आणि 'माधवनाथ' असं सांप्रदायिक नामाभिधान करून संप्रदायाचं लेखी अधिकारपत्र त्यांना दिलं आणि स्वामी संप्रदायाच्या ऋणातून मुक्त झाले.

'कृतं करणीयं प्रापणीयं प्राप्तम्' अशा संतृप्त अवस्थेत असलेले स्वामीमहाराज उत्कटतेने 'माहेरी' जायला सिद्ध झाले. देह ठेवण्यापूर्वी पंधरा दिवस लिहिलेल्या काव्यात ते म्हणतात :

*'अंतरी निजनामी रंगले । स्वामी निजधामी चालले ॥धृ॥*
*आदिनाथ गुरु हे शिवशंकर । आले आले नाथ मच्छिंदर ।*
*आले गोरख गहिनी भास्वर । संगती सिद्ध पुरुष पातले ॥१॥*
*नाथ निवृत्ति हे ज्ञानेश्वर । मुक्ताई सोपान सहोदर ।*
*पांडुरंगही त्याजबरोबर । देवही निजभक्तां भाळले ॥२॥*
*दिक्कालाचे तुटोनि बंधन । जिथे लोपले ते मी-तूपण ।*
*होउनीं स्वयें चिद्घन आपण । स्वभावे साक्षित्वही संपले ॥३॥'*

चिद्घन झालेले स्वामी साक्षित्वाच्या मर्यादा ओलांडून अनंत, अमर्याद झाले आणि मनामनांमध्ये स्थिरावले. पंधरा ऑगस्ट १९७४ रोजी सकाळी नऊच्या सुमारास देहाची खोळ टाकून त्यांनी स्वेच्छेने महासमाधीत प्रवेश केला. त्यांचं सगुण, साजिरं, लोभस लावण्यरूप आता दिसणार नव्हतं. पण स्फूर्तिरूपाने ते 'साऱ्यांच्या हृदयात भरून राहिले. त्यांच्या निर्मल चारित्र्याचा, शुद्ध अंतःकरणाचा आणि विमल बोधाचा ठसा माय मराठीच्या भाग्यवान बालकांच्या अंतःकरणात उमटून राहिला; त्यांचं भावजीवन सुगंधित करत राहिला; त्यांच्या ज्योतीरूप अस्तित्वाचा प्रत्यय येत राहिला.

*'पूर्णकाम होउनी । जनांसि मार्ग दावुनी ।*
*धन्य धन्य जीवनी । समाधिमग्न हो मुनि ।*
*वसतसे स्थिरावुनी । साधकांचिया मनी ।*
*ज्योतीरूपी अस्तित्वाचा पसरे किर्तिसुगंध ॥'*

स्वामी महाराजांच्या अलौकिक चरित्राचं सम्यक् समग्र आकलन होणं ही जवळ जवळ अशक्यप्राय गोष्ट आहे. कारण अगाध, अपार असं गुरुतत्त्व त्यांच्या देहाकृतीने आकाराला आलेलं होतं. ते तत्त्व मायेच्या स्पर्शातही कधी सापडणारं नसल्याने ते शब्दात पकडणं कसं शक्य आहे ? स्वामी काय होते हे समजून घ्यायचं असेल तर त्यांच्या अनेक अभंगांतून जी आंतरिक स्थिती त्यांनी वर्णन केली आहे ती समजून घ्यायला हवी. ते कसे दिसत, काय खात, कसे रहात याची चर्चा निरर्थक ठरेल. ते बोधाच्या फार उंच पातळीवर वावरत होते. त्या पातळीच्या जवळपास जाण्याचा प्रयत्न करायला हवा. दैवी गुणसंपत्तीचा परिपोष त्यांच्या रूपाने आकाराला आला होता. त्या गुणसंपदेचा अंश मात्र तरी आपल्या ठिकाणी बाणायला हवा. ते पूर्ण बोधाचे महासागर होते आणि परम कृपालुपणाने त्यांनी तो बोध वाङ्मयबद्ध करून ठेवला आहे. आपल्या शक्तिबुद्धीप्रमाणे त्यातलं जे काय ग्रहण करता येईल ते करून भगवत्प्राप्तीची वाटचाल घडायला हवी. त्यांचं प्रेम, दया, क्षमा, शांती, आंतरिक कळवळा यांच्या ऋणातून किंचितसं उतराई व्हायचं असेल तर ईश्वरनिष्ठा, गुरुनिष्ठा यांनी युक्त असं जीवन जगायची खटपट करायला हवी.

असं वाटतं, कितीही वर्णनपर शब्द वापरले तरी स्वामींच्या मेरुतुल्य मोठमोठ्या सद्गुणांची कल्पनासुद्धा देणं शक्य होणार नाही म्हणून आदराने त्यांच्या चरणांवर लोळण घ्यावी अन् विनवावं, 'गुरुराज ! आपल्या बोधाची उंची अगर खोली समजण्याची पात्रता माझ्यासारख्या नेणत्या जीवापाशी नाही ! पण या वाक्सुमनांनी आपली पूजा बांधण्याचा वेडा प्रयत्न केला आहे. पूजा कशी करावी तेही कळत नाहीयू पण आपण मानून घ्या ! या भावपूजेचा स्वीकार करा, अजाण बालकाचा अंगीकार करा. आपली कृपादृष्टी निरंतर असू द्या. आपल्याला अभिप्रेत असलेल्या जीवनपद्धतीनुसार जीवन घडू द्या. आपल्या कृपाबळाने तृणाच्याही अंगी वज्राचं सामर्थ्य येऊ शकेल. सोऽहं साधनेने आत्मबोध होण्यासाठी तसं सामर्थ्य द्या !'

साधनेसाठी आवश्यक असणारी चित्तशुद्धी घडवून आणण्याचं

कार्य ही अशी परम पवित्र चरित्रं करतात म्हणून तर ती आदराने गायची !!

*'सोऽहं हंसारुढ सद्गुरु स्वामीस्वरूपानंद ।*
*चरितगाथा पावन गाता लाभे परमानंद ॥धृ॥*
*पावसग्रामी पुत्र जाहला । तपस्विनीच्या कुळी जन्मला ।*
*रामचंद्र अभिधान तयाला । त्याच्या रूपे प्रकट जाहला आनंदाचा कंद ॥१॥*
*शुद्ध सत्त्वगुणमंडित वृत्ति । हवीहवीशी बाह्य आकृति ।*
*आनंदाची पखरण करिती । सवंगड्यांसह खेळ खेळती बाळे होती धुंद ॥२॥*
*राष्ट्रप्रीतीची ध्वजा घेतली । राष्ट्रीय शाळा स्थापन केली ।*
*शिक्षणरीति नव अनुसरली । नवयुवकांना, बालां लाविति स्वातंत्र्याचा छंद ॥३॥*
*मातुल प्रेमे घेउनि जाती । पुण्यपत्तनी गुरु भेटविती ।*
*सोऽहंची ते दीक्षा देती । 'स्वानंदाचा मार्ग खुला तुज' वदति संत श्रीमंत ॥४॥*
*गणेशनाथ वाट दाविली । दृष्टी अंतरी शोधु लागली ।*
*बदल दिसेना बुद्धि शिणली । गुरु सांगती 'दूध विरजले दही होतसे मंद ॥५॥*
*प्रीतीची फुलबाग बहरली । युवती सुंदर तया भेटली ।*
*सहजीवनस्वप्नेही फुलली । पुण्यपत्तनी वास करावा असा ठरविला बेत ॥६॥*
*दैवाचा घणघात जाहला ज्वरसंतप्त शरीर ।*
*मृत्युभयाने कंपित अंतर नयनी लोटे नीर ।*
*जगन्माउली त्या धण्यासी देत तयांना धीर ।*
*सद्गुरुबोधे सोऽहं साधन तोडितसे भवबंध ॥७॥*
*रामचंद्र प्रभुरूप जाहले । परमहंसपद पूर्ण पावले ।*
*नाम स्वरूपानंद लाभले । आणि जनांना प्रेमें दाविति स्वानंदाचा पंथ ॥८॥*
*पूर्णकाम होउनी । जनांसि मार्ग दावुनी ।*
*धन्य धन्य जीवनी । समाधिमग्न हो मुनी ।*
*वसतसे स्थिरावुनी । साधकांचिया मनीं ।*
*ज्योतीरूपीं अस्तित्वाचा पसरे कीर्तिसुगंध ॥९॥*

॥ ॐ तत् सत् ॥

**डॉ. सौ. सुनीती दुबळे**
१८५, शनिवार पेठ,
विश्वकर्मा भवन क्र. २,
घर नं. ४, पुणे ४११ ०३०.



# स्वरूप विश्वंभर

श्री जगदीश्वर व्यापुन राहे अवघे चराचर ।
मानव देही 'पावस' क्षेत्री 'स्वरूप' विश्वंभर ॥
त्या बाळाची पितामही ती साध्वी गंगामाई ।
कृष्णाकाठी प्रसन्न तिजवर श्रेष्ठ यती होई ॥
'विष्णुकृपेसह तव पुण्याने तुमच्या थोर कुळी
श्री दत्तात्रय येतील जन्मा सुयोग्य शुभवेळी ॥'
सत्य जाहले वचन साधूचे आणि मिळाले फळ ।
रखुमाईच्या कुशीत जन्मला रामचंद्र बाळ ॥
अति खोडकर, अति खेळकर वृत्ती बालपणी ।
मेधा, प्रज्ञा प्रगल्भ त्याची ऐसा बाळ गुणी ॥
तारुण्यातच मायभूमीच्या स्वातंत्र्याचा ध्यास ।
पायपीट अनवाणी यास्तव भोगत कारावास ॥
पुढे लागली गुरुभेटीची ओढ अंतराला ।
राम कृष्ण-हरि जपत राहणे एकच ध्यास जीवाला ॥
गुरुभेटीचा प्रभूकृपेचा वाहत आला रगोत ।
गुरुपदी झाले लीन मिळाली ज्योतीमध्ये ज्योत ॥
सोऽहं सोऽहं नादाचा या मिळवूनी आनंद ।
गुरुमुखातून नाव मिळाले 'स्वामी स्वरुपानंद' ॥
अभंग ज्ञानेश्वरी प्रगटली गोड संतवाणी ।
अमृतधारा जीवन जगले गाथा संजीवनी ॥
कैवल्याचे रूप प्रगटले स्वामींचे जीवन ।
जय जय स्वरुपानंद बोलता जीवन हो पावन ॥
स्वामी स्वरुपानंद ठेवीते आपुल्या पायी माथा ।
पदस्पर्शाने पावन व्हावी आमुची जीवन गाथा ॥

**सौ. मधुमालती वसंत करंदीकर**

# 'कुल-स्मृती'


## श्री. बाळकृष्ण गणेश गोडबोले

*बी. ए. (स्पेशल). अर्थशास्त्र, मुंबई पोर्टट्रस्टमध्ये अधिक्षक पदावरून निवृत्त. स्वामींचे पुतणे.*


नदीचं मूळ आणि ऋषीचं कूळ शोधायला कोणी जाऊ नये असं म्हणतात. शेगावचे श्रीगजानन महाराज, शिर्डीचे श्रीसाईबाबा, अशा अनेक साधु-संतांचा पूर्वेतिहास संपूर्णपणे उपलब्ध नाही. पारमार्थिक मार्गावर वाटचाल करताना संतांच्या शिकवणीबरोबरच त्यांची कौटुंबिक व सभोवतालची परिस्थिती, त्याचे त्यांच्यावर नकळत झालेले संस्कार, त्यांचे खाजगी जीवन, या विषयी साधकाच्या मनात एक प्रकारचे औत्सुक्य असतं.

सुदैवाने, पावसचे 'शांती-ब्रह्म' 'स्वामी स्वरुपानंद' यांचे 'जीवन-चरित्र' उपलब्ध आहेच; शिवाय त्यांचा अनेक वर्षे सहवास लाभलेल्या अनेक मंडळींकडूनही आणखी उपयुक्त माहिती मिळते.

'स्वामी स्वरुपानंद' म्हणजे पूर्वाश्रमींचे श्री. रामचंद्र विष्णू गोडबोले हे माझे सख्खे चुलते असल्यामुळे त्यांच्या आजोबांपासूनची माहिती, पू. स्वामींकडून व आई-वडिलांकडून मिळाली, ती अशी :

### पर्शरामपंत (१८३४-१९०९)

स्वामींचे आजोबा. समाधीजवळच्या गोडबोले कुटुंबियाच्या घरातील ८ वी पिढी. त्याकाळी सुद्धा त्यांचे कॉलेजपर्यंत शिक्षण झाले होते. शिक्षण खात्यात अधिकारी होते. निवृत्त झाल्यावर त्यांना रु. १०० पेन्शन होती. त्या वेळी सोने २० रु. तोळा होते. म्हणजेच सांपत्तिक स्थिती उत्तम होती. शिवाय घरचे शेत-कलमे होती. स्वभावाने दिलदार असल्यामुळे गावात कोणी पांथस्थ आल्यास जेवण्या-रहाण्याची सोय अगत्यपूर्वक होत असे. ब्राह्मण, पुराणिक, कीर्तनकार यांना दक्षिणाही मिळत असे. घरामध्ये पूजा-अर्चा, कुलाचार उत्तम तऱ्हेने केले जात.

### गंगाबाई

पर्शरामपंतांच्या पत्नी व स्वामींच्या आजी. त्यांचे माहेर पावस गावातच जुन्या वाड्यातल्या देशमुखांकडचे. त्या ईश्वरभक्त होत्या. त्या वेळच्या रितीप्रमाणे पर्शरामपंतांच्या सावत्र भावास झोप येण्यासाठी अफू घालण्याचे काम यांचेकडे आले. एकदा अफू जास्त झाली आणि दीरास मृत्यू आला. घरातील सर्वांनीच तिला दोषी धरले आणि अखेर पर्शरामपंतांनी तिला घरातून घालवून दिले.

गावातच माहेर असल्यामुळे अपमानित स्थितीत तेथे रहाणे शक्य नव्हते. म्हणून त्या ५ कोस अंतरावरच्या रत्नागिरीत आल्या. एका देवळात पालखी आणि काही भाविक मंडळी निघण्याच्या तयारीत दिसली. पालखीबरोबर जाण्याची इच्छा गंगाबाईंनी बोलून दाखविली आणि त्या मंडळींनी ती मान्य केली. अशा प्रकारे त्या पालखीबरोबर वाडीला आल्या. एका सज्जन गृहस्थाने त्यांना आश्रय दिला. दत्ताची पूजा करून, प्रदक्षिणा घालून, माधुकरी मागून निर्वाह करीत. दैव गती कशी गहन असते ! ज्या घरामध्ये पांथस्थ-वाटसरूसुद्धा भोजन करून तृप्त होत, त्या घरच्या लक्ष्मीला माधुकरी मागून निर्वाह करावा लागला!

अशा प्रकारे १२ वर्षे गेली. पर्शरामपंतांनी दुसरे लग्न करूनही मुले जगत नसल्यामुळे ते निराश होते. तेव्हा वाडीच्याच त्या सत्पुरुषांनी त्यांना दृष्टांत दिला. त्यानुसार ते वाडीला आले व गंगाबाईंना परत नेण्याची इच्छा व्यक्त केली. निघताना त्या सत्पुरुषांनी त्या दोघांना 'तुमच्या कुळात ईश्वरभक्त निर्माण होऊन कुळाची कीर्ती वाढेल !' असा आशीर्वाद दिला. गंगाबाईचे नातू म्हणजेच 'स्वामी स्वरुपानंद' !

### विष्णूपंत (१८६९-१९४६)

पू. स्वामींचे वडील. त्यांचे शिक्षण मॅट्रिकपर्यंत झाले होते. काही दिवस मुंबईत नोकरीही केली. पण घरची सांपत्तिक स्थिती उत्तम असल्यामुळे व चाळीशीपर्यंत वडिलांचे कृपाछत्र लाभल्यामुळे ते पावस येथेच स्थायिक झाले. विष्णू सहस्त्रनामाचे पाठ सतत करीत असत. त्यांना ४ मुली व गणेश, महादेव व रामचंद्र (स्वामी स्वरुपानंद) असे ३ मुलगे झाले. त्यापैकी श्री. महादेव लवकर निवर्तले.

### गणेश (गणपतराव) (१८९८-१९५७)

पू. स्वामींचे वडील बंधू व माझे वडील. मुंबईस पोष्टखात्यामध्ये सुमारे ४० वर्षे नोकरी केली. आपली कामे करून दुसऱ्यांचीही कामे अंगावर घेऊन ती ऑफिसमध्ये उशीरापर्यंत बसून करीत. पू. स्वामींप्रमाणे श्रीबाबामहाराजांनी त्यांनाही अनुग्रह व अधिकार दिले होते. पोष्टातला पगार आणि मोठे कुटुंब असूनही ते उदार मनाने गरजूंना मदत करीत असत. पूर्वीच्या पद्धतीप्रमाणे ते स्वामींना मनी ऑर्डर पाठवित असत. पू. स्वामी काही मंडळींना अनुग्रहासाठी गणपतरावांकडे पाठवीत व त्यांनी काही न सांगता त्यांना अनुग्रह मिळे. पू. स्वामींचे परम मित्र श्री. बाबा देसाई यांनाही त्यांनी अनुग्रह दिला.

त्यांना अनेक सिद्धी वश होत्या. 'अप्पा (म्हणजे स्वामी) पुढे फार मोठा होणार आहे व आपल्या घरी (पावस येथे) आवळी भोजने होतील' असे त्यांनी १९५७ मध्येच सांगून ठेवले होते. त्याप्रमाणे अप्पा पुढे 'स्वामी स्वरुपानंद' झाले व पावसला उत्सवामध्ये आवळी भोजने होत आहेत.

श्री. बाबा देसाई व श्री. भाऊ देसाई यांचे वडील ती. अण्णा देसाई हे मुंबईला भाटीया रुग्णालयात वृद्धावस्थेमुळे आजारी होते. प्रकृती सुधारण्यासारखी नव्हती. पण त्यांना परत पावस येथे नेण्यास डॉक्टर परवानगी देत नव्हते इतका अशक्तपणा होता. तेव्हा भाऊंनी (गणपतरावांनी) रुग्णालयात जाऊन ती. अण्णांच्या बिछान्याच्या चारी टोकांना बसून मंत्र म्हटले व आवश्यक ती शक्ती दिली. ती. अण्णा देसाईना त्याप्रमाणे पावसला सुखरूप नेल्यावर दुसऱ्या दिवशी मृत्यू आला.

शांत स्वभाव, मित भाषण, निस्वार्थीपणा, परोपकारी वृत्ती, इ. मुळे सर्वांना त्यांचे विषयी आदर वाटत असे. मृत्यूची तयारी त्यांनी आधीच करून ठेवली होती. दिवसाकाठी अनेक तास ते समाधी अवस्थेतच असत. 'औषध देऊ नका, हॉस्पिटलमध्ये नेऊ नका.' अशा सूचना त्यांनी आधीच दिल्या होत्या. १-११-१९५७ रोजी अगदी शांतपणे त्यांनी देह ठेवला.

झांकलिया घटींचा दिवा । नेणिजे काय जाहला केव्हा ।
या रीतीं जो पांडवा । देह ठेवी । तो केवळ परब्रह्म ॥
ज्ञा. ८/९८.

## केशवराव गोखले

स्वामींचे व गणपतरावांचे मामा. पावसजवळ गोळप हे त्यांचे गाव. मुंबईस रेल्वेमध्ये त्यांनी अनेक वर्षे नोकरी केली. ते स्वतः पू. बाबा महाराजांचे अनुग्रहित होते व त्यांचेमुळेच पू. स्वामींना व गणपतरावांना बाबा महाराजांचा अनुग्रह व अधिकार प्राप्त झाले.

## रखमाबाई (१८७३-१९५४)

विष्णुपंतांच्या पत्नी व पू. स्वामी व गणपतरावांच्या आई. सांपत्तिक परिस्थिती उत्तम असूनही संसाराचा गाडा असाच चांगल्या स्थितीत रहावा म्हणून त्या प्रथम विष्णूपंतांना व नंतर पू. स्वामींना नोकरी करण्याचा आग्रह करीत. संतांच्या घरच्या माणसांची जी काही आर्थिक-मानसिक ओढाताण होते ती तिच्या वाट्यास आली. परंतु स्वतःच्या कर्तबगारीवर मोठा संसारसुद्धा यशस्वी केला. घर मुला-माणसांनी भरलेलं असावं, अशी तिची स्त्रीसुलभ इच्छा असे. 'घरात दिवा लागला पाहिजे. पूजा झाली पाहिजे. नैवेद्य जायला पाहिजे.' ही तिची इच्छा जाणूनच की काय, पू. स्वामींनी घराच्या परिसरातच समाधी घेण्याचा निर्णय घेतला.

## सरस्वतीबाई (१९०३-१९९१)

गणपतरावांच्या पत्नी व पू. स्वामींच्या वहिनी. समवयस्क असल्यामुळे पू. स्वामींचे आणि तिचे मैत्रीचे नाते झाले. १९३४ च्या स्वामींच्या आजारपणामध्ये आणि नंतर तिने स्वामींची खूप सेवा केली. वडील भावाची पत्नी असल्यामुळे स्वामींना तिच्याविषयी खूप आदरभाव होता. वहिनी पावसला येणार म्हटल्यावर स्वामी संपूर्ण संसारी असल्याप्रमाणे तयारी करीत असत.

दानधर्मामुळे श्री. गणपतरावांच्या पगारापैकी फार कमी रक्कम घरी येत असे. तरीसुद्धा मोठ्या कर्तबगारीने संसार चालविला व सुखाचा शेवट गाठला.

अशा परंपरागत धार्मिक संस्कार लाभलेल्या व संपन्न कुळात पू. स्वामींचा जन्म झाला. वैयक्तिक संसाराला पूर्ण अनुकूल परिस्थिती असूनही त्यांनी विश्वाचा संसार करण्याचे व्रत घेतले. घरातल्या मंडळींशी वागताना ते कुटुंबघटक म्हणूनच वावरले. त्यामुळेच की काय, त्यांचे मोठेपण उशीरा उमगले. आई-वडिलांची सेवा त्यांनी उत्तम प्रकारे केली. बंधू गणपतराव यांचेवर त्यांचे प्रेम होते. त्यांचा एक कोट त्यांचेकडे शेवटपर्यंत होता व ते तो कोट नियमितपणे कपाटातून काढून स्वच्छ करून परत घडी करून ठेवित असत. आम्हा सर्वांवर त्यांची पूर्ण कृपा आहे.




पू. स्वामींनी माझ्या ध्यानात आणून दिल्याप्रमाणे १० पिढ्यांपर्यंत (पू. स्वामींची) गोडबोले घराण्यात चुलत भावंडे नव्हती. फक्त एकाचेच लग्न होत असे. १२ व्या पिढीत ह्यामध्ये बदल झाला.

परम सद्गुरु श्रीबाबामहाराज वैद्य (पुणे) यांनी ज्या ३ अनुग्रहीतांना संप्रदायाचे अधिकार दिले ते म्हणजे १) श्री. केशवराव गोखले (पू. स्वामींचे मामा), २) श्री. गणेश विष्णू गोडबोले (पू. स्वामींचे वडील बंधू व ३) श्री. रामचंद्र विष्णू गोडबोले (श्री. स्वामी स्वरुपानंद), असे सर्व एकाच कुटुंबातील होते.


**श्री. बाळकृष्ण गणेश गोडबोले**
४, आनंदी शास्त्री हॉल, ग्रँट रोड, मुंबई ४००००७



# ‘अमृतधारा’ - ‘प्रकट गुह्य बोले !’

**सौ. सुनंदा आ. शाळिग्राम**

*स्वामी स्वरुपानंद महाराजांचे अधिकारी शिष्य स्वामी सत्यदेवानंद सरस्वती यांच्या शिष्या. श्रीगीता-ज्ञानेश्वरी, भागवत यांची निरुपण सेवा. दर शनिवारी ५ ते ७ श्रीज्ञानेश्वरी प्रवचन. दर रविवारी ४ ते ६ श्रीएकनाथी भागवत निरुपण.*

रामचंद्र विष्णुपंत गोडबोले ‘स्वरुपानंदा’चे ‘स्वामी’ कसे झाले, याचे भावोत्कट दर्शन म्हणजे ‘अमृतधारा’ काव्य ! हे त्यांचे ‘अनुभवामृत’च आहे ! आत्मानुभव शब्दात सांगता येत नाही. कारण ‘सांगतेचि सांगणे जाले !’ ‘सांगता’ म्हणजे सांगणारा ‘आत्मरूप’ झाला आहे. मग आत्मस्वरूपाबद्दल वर्णन कोण करणार ? पण स्वरुपानंद महाराज म्हणतात, ‘जगदंबेचे वरदान लाभल्यामुळे तिनेच मला वदविले आहे.’

***‘अगाध अनुपम अगम्य महिमा माझ्या जगदंबेचा ।***
***अनुभविता मति-गतिहि कुंठिता काय पाड शब्दांचा ॥***
***अवर्णनीय स्वयंसिद्ध तू, तुला रूप ना रंग ।***
***परंतु माते, मज बोलविते प्रेमळता निःसंग !’’***

जगदंबेला ते नुसते काव्यकर्तृत्वच देत नाहीत, तर त्याचे फलही तिलाच अर्पण करतात. रसिकांनी या काव्याला आनंदाने मान डोलविली, जगाने मान दिला तरी -

‘दिला मान तो तिला वाहिला, मला कशाला भार’ असे म्हणून आपली निरहंकारिता प्रकट करतात. वास्तविक, जगाच्या बाजारात ‘काव्या’च्या नावावर काव्यगुण नसतानाही शब्दांचा धंदा करणारे बरेच असतात. सहज-सुलभ, अंतःस्फूर्त लिहिणारा लाखातून एखादाच ! त्यातही आत्म प्रत्ययाचं लिहिणारा विरळाच ! खरं तर, आत्मप्रत्ययाचा स्पर्श जिला झाला आहे, तीच खरी कविता ! म्हणून स्वरुपानंद महाराज म्हणतात,

***‘बाजारी ह्या जो तो करितो व्यवहाराचा धंदा ।***
***कीर्ति काव्य-व्यवहारी परि लाखातुनि एखादा ।***
***त्यात विरळा सत्कवि निपजे अनुभवि जो निज कविता***
***सत्कवींतहि क्वचित् संभवे अनुभवुनी आचरिता ॥***
***अशुब सांगड जये बांधिली काव्य-व्यवहाराची ।***
***खरा यशस्वी तोचि ह्या जगी कृतार्थ कविता त्याची’***

स्वरुपानंद महाराजांनी सांगितलेल्या या निकषानुसार ‘अमृतधारा’ ही ‘कृतार्थ कविता’ म्हणता येईल ! परतत्त्वस्पर्शाचं गुह्यच ‘अमृतधारे’तून प्रकट झालं आहे !

इ. स. १९३५ मध्ये देहाने आसन्नमरण स्थितीत असता आषाढ ते मार्गशीर्ष या सहा महिन्यांत १६२ साक्यांची ही निर्मिती झाली आहे. आजारपणात आणि काव्य निर्मिती ? महदाश्चर्य !

***‘निज-शय्येवरि देह दिसे परि असे कितीवा दूर ।***
***मातृचरणतल्लीन मन तदा नयनी लोटे नीर ॥’*** अशी आपली अवस्था त्यांनी वर्णन केली आहे. ‘देहाच्या’ आजारपणात ‘माझे रडगाणे’ म्हणून येणाऱ्या-जाणाऱ्यापुढे गाऊन दाखविणाऱ्या साधकांना ही साकी खचितच मार्गदर्शक आहे !

‘चित्ते, वाचि, क्रियायां च साधुनामेकरुपता ।’ हेच खरे. ‘आपुले मरण पाहिले म्यां डोळां । तो सुखसोहळा अनुपम ॥’ असा अनुभव ‘अमृतधारे’त ग्रंथित झालेला आहे. पण असा आनंदसोहळा अनुभवण्यापूर्वी ‘मृत्योर्माऽमृतं गमय’ म्हणत कोणता पथ ते आक्रमीत होते, तो प्रवास त्यांनी कसा केला, किती वेगाने केला, त्यातल्या अडचणींवर मात कशी केली, कोणत्या ध्येयानं प्रेरित होऊन केला आणि ध्येयपूर्तीच्या क्षणी त्यांना काय वाटलं, हे कळणं आणि तेही त्यांच्या वाणीतून - म्हणजे ‘लाभु आथि’ !

‘अमृतधारे’ च्या सुरुवातीच्याच साक्यांवरून आपल्याला कळून येते की, कविमन ध्येयप्रवण आहे.

***‘जगी जन्मुनी अभिनव-जीवन-सत्कविवर होईन ।***
***स्वानुभवान्तः स्फूर्त नवरसी सत्य-काव्य निर्मीन ॥’***

या आत्मविश्वासपूर्ण उद्‌गारांचा प्रत्यय ‘अमृतधारा’ वाचताना येतो: सातव्याच साकीमध्ये त्यांना परमध्येयाचा ध्रुवतारा दिसला -

***‘जगी जन्मुनी जगदंबेचे दास होऊनी राहू ।***
***विश्व-बांधवासहित सर्वदा भक्तिसुधारस सेवू ॥’***

किती साधकांना ‘परमध्येय’ कळले आहे ? किती जणांचे मन असे ध्येयप्रवण होऊन साधना करते ? ‘अमृतधारा’ वाचताना असे आत्मपरीक्षण करता आले तर ते हिताचेच होईल.

... कवीचे ध्येय नक्की झाले. मात्र ते किती दूर आहे, माहीत नाही. कधी गाठू सांगता येत नाही. तरी चालणे चालूच आहे कुठवर ?

***‘ध्येय असावे सुदूर की जे कधी न हाती यावे***
***जीवेभावे मात्र तयाच्या प्रकाशात चालावे ।***
***प्रकाशात चालता चालता चालणेचि विसरावे ।***
***भावातीत स्वभावसहज ध्येयी तन्मय व्हावे ॥’***

आत्मप्राप्ती ‘सुदूर’ का ? जीवनातील इतर ध्येये देहाने-इंद्रियांनी, मनाने, बुद्धीने मिळविता येतील. पण आत्मप्राप्ती ‘देहात’ असताना मिळवायची असली तरी ‘देहाने’ म्हणजे ‘इंद्रियांनी’ मिळणारी नव्हे. ‘मनात’ आणलं तर हे ध्येय गाठू शकू हे खरे; पण ‘मन’ हे गाठू शकणार नाही. ‘विचारा’च्या मार्गावरूनच वाटचाल करायची असली

तरी 'विचार मागुता पाउली निघे' अशी स्थिती आहे. म्हणून हे 'सुदूर !' पण 'जीवेभावे' म्हणजे प्रेमाने, अंतःकरणापासून करणाऱ्याला 'त्याचा' प्रकाश मिळतो. म्हणजेच 'सोऽहंभाव' लाभतो. या प्रकाशात वाटचाल कुठवर करायची ?

*'यावत् साधन तावत् सोऽहं - स्मरण अखंडित जाण*
*अढळ भाव सर्वथा असो मग जावो राहो प्राण ॥*

... हीच साधना जोवरी न तो झाला मोह-निरास ।' 'निश्चळपण धनुर्धरा, 'चालणे' येथीचे । असं ज्ञानेश्वर महाराज म्हणतात.

*'मी पणे हालो ठेला । तो आपवेयाचि मज आला ।*
*इया यात्रा होये, भला कापडी माझा ॥'*

'मीपणा' आहे, तोवर 'चालणे' विसरत नाही आणि भावातीत झाल्याशिवाय तन्मयता नाही.

'तत्' मय होण्यासाठी कोणता प्रवास स्वरुपानंद महाराजांनी केला होता ? ध्येय निश्चित झाले. आता त्याला मार्गदर्शक हवा.

*'सत्संगत्वे निःसंगत्वं । निःसंगत्वे निर्मोहत्वं ।*
*निर्मोहत्वे निश्चलितत्त्वं । निश्चलितत्त्वे जीवन्मुक्तिः ॥'*

आद्य शंकराचार्यांनी दाखविलेली ही वाट एका तपात म्हणजे बारा वर्षात स्वरुपानंद महाराजांनी कशी आक्रमिली पहा.

इ. स. १९२३ मध्ये वयाच्या विसाव्या वर्षी त्यांना श्रीगणेशनाथ उर्फ बाबा महाराज वैद्य यांच्याकडून 'सोऽहं दीक्षा' लाभली.

*'पुण्य-पत्तनी श्रीसद्गुरुंनी पथ-दर्शी होऊन ।*
*'ॐ तत्त्वं सोऽहं सः' श्रुतिची दाखविली मज खूण'*

श्रीआदिनाथापासून गुरुपरंपरा सांगितली.

*''म्हणति आणि ते कोण कुणाचा करी येथ उद्धार ।*
*स्वये कष्टल्याविण का होतो कोठे आत्मोद्धार ॥'*

याच खुणेने तन्मयतेने सत्पथ आक्रमिणे सुरू झाले. इथे आपले अंतःकरण हेच प्रमाण होते !

'बाल्यापासुनि गीताध्ययनी होता मज बहु छंद ।' असे ते म्हणतात. म्हणजे 'सत्संगत्वे' मध्ये प्रत्यक्ष श्रीसद्गुरुंचा सहवास व मार्गदर्शन, त्यांनी दिलेले नाम हे जसे आहे तसेच श्रीगीता-ज्ञानेश्वरीसारखे सद्ग्रंथही आहेत. स्वरुपानंद महाराज आता 'तत्कथित तत्त्वसुखात' रमू लागले. पुस्तकी विद्येत त्यांचे मन आता रमेना.

*'पुरे पुस्तकी विद्या ती की अवघी पोपटपंची ।*
*... स्वानुभवाविण वेदान्ताची पोपटपंची वाया ।'*

स्वप्नी अमृता पिउनी कुणाची अमर जाहली काया' असे ते म्हणू लागले. पांडित्यपूर्ण पुस्तके असोत किंवा अननुभवी पंडितांचे बोल असोत, त्यांचे मन या पढिक विद्येला विटले.

*'परोपदेशे पांडित्याचा प्रकर्ष बहु दाखविती ।*
*स्वये आचरू जाता बसते धारण पाचावरती ॥'*

उच्चार, विचार आणि आचार यातील विसंगती त्यांना जाणवली. गतानुगतिकत्वाची ही जनरीत पाहून त्यांचे मन विटले आणि हृदयाच्या एकान्तात जाऊन बसले. आता त्याने वेध घेतला, आत्मविद्येचा !

*'दाविते ज्ञान-भानूते । अज्ञानतम नाशिते ।*
*सुख शाश्वत जी देते । ती विद्या मिळवू इचे ॥*
*दैन्य दुःख लया नेते । पाप ताप निवारीते ।*
*चित्तास शांतता देते । ती विद्या मिळवू इचे ॥'*

'सत्संगत्व' जेव्हा पराकोटीला गेले तेव्हा 'निःसंगत्व' सहजच उदयाला आले. आत्मपरीक्षणातून नितळ झालेल्या मनाने प्रामाणिक कबुली दिली. म्हणूनच मिथ्या गोष्टींना चिकटलेले मन त्यागाला तयार झाले.

*'वेदान्ताच्या पोतांडाची पाठीवरती झूल ।*
*घालुनी तदा होतो सजलो दुबिल नंदीबैल ॥*
*गळ्यात खुळखुळ वाजत होते विषयांचे घुंगूर ।*
*पिटुनि ढोलकी 'हलिव मुंडकी' म्हणे मीपणा थोर ॥*
*ढुम् ढुम् ढुम् शब्दाच्या नादे ढोंग-ढोलकी संगे ।*
*सांगे तैशी टाकित होतो पाउले पुढे-मागे ॥*
*ढोल फोडिला झूल-घुंगुरा दिले झुगारुनि दूर ।*
*'सोऽहंभावे' उडी घेतली अनन्तात चौखूर ॥'*

*'सोऽहं' स्मरणामुळे आता अंतःकरणात निर्भयतेने ठाण मांडले.*

'बुडता अमृती, मरण तरी का संभवेल कल्पांन्ती ?' असा विश्वास 'सोऽहं' ने दिला.

'निधान सन्निध, परि घोर तमी इतस्ततः भ्रमलो मी
ज्ञान किरण दर्शनि अता सत्प्रकाश अन्तर्यामी ।।' त्या प्रकाशात वाटचाल वेगाने सुरू झाली.

*'आत्मसुखाचा अखंड निर्झर वाहे अंतःकरणी ।*
*... न का स्वभावे त्यास्तव व्हावे सर्वस्वाचे दान ॥*

'सर्वस्व' देऊन 'निःसंग' व्हायचे ? म्हणजे काय काय द्यायचे ? स्वरुपानंद महाराज म्हणतात,

'हवे कराया जीवेभावे सर्वस्वाचे दान ।
तन-मन-धन-गृह-सुत-दारादिक आणिक पंचप्राण ।।' ज्याला सर्वस्वाचे दान द्यावे असा हा सखा आहे तरी कोण ?

*'संतत संगे सोऽहं जिवलग सांगे मज गुज गोष्टी ।*
*चिरसुखद असा सखा न दुसरा जरी धुंडिली सृष्टी ॥*
*औटपीठि करी धमूधमू सोऽहं - तारा तेजःपुंज ।*
*तेजे सहजे जाण लोपला माया-ममता-कुंज ॥'*
*'सोऽहं' च्या अभ्यासाने 'मोहाचा क्षय' होऊ लागला.*
*'सावधान मन करि रात्रं-दिन सोऽहम मंत्र जपाते ।*
*अवन करीं ते अखंड फिरते तलवारीचे पाते ।*
*... वार चोरटे करू पाहती षड्रिपु वारंवार ।*
*परि तीक्ष्णतर माझ्या सोऽहं तलवारीची धार ॥'*

आता 'निःसंगत्वे निर्मोहत्वम्' कडे वाटचाल सुरू झाली. 'निर्मोह' चित्त म्हणजेच पावन चित्त ! असं पावन होण्यासाठी प्रयत्न करीत असताना किंचित् तोल गेला तरी चित्ताची समता साधायला 'सोऽहं स्मरण' आहेच ! इथे साधकाला ही जाण आहे की -

'अखंड अभ्यासाविण साध्य न ती समता चित्ताची'

चित्ताचे असे समत्व साधण्यासाठी कवी आपले प्राणही पणाला लावायला तयार झाला आहे.

'मनःपूत वागता अवचिता किंचित् सुटला तोल

(मन पवित्र ठेवून वागत असता)

*म्हणुनि पणाते काय लाविते प्राणहि ते बहुमोल ॥*

*प्रायश्चित्तास्तव मत्प्राणहि जरि मागत असशील*

*दे खुशाल ते, परंतु माते, जिते असो मम शील*

*परिस्थितीशी झुंज खेळता खर्ची पडले प्राण*

*तरी, न तुजविण अन्य स्थलिं मन-बुद्धि ठेवू गहाण ॥'*

निर्मोही मनच भगवत्पदी 'अनन्य' होऊ लागतं. निर्मोहत्वे निश्चलितत्त्वम् !'

'कोड जिवाचे परमात्म्याचे नित्य दिसावे पाय ।

अनन्य होणे ह्याविण नेणे भलता सुलभ उपाय ॥' या 'अनन्यते'ला 'मी' सुद्धा खपत नाही. आता साधक आत्मपरीक्षण करू लागतो की, 'मी कोण ?'

'' 'मी मी' म्हणसी परी जाणसी काय खरा 'मी' कोण । असे 'काय' (देह) मी, 'मन', 'बुद्धी' वा 'प्राण', पहा निरखोन प्राण, बुद्धि, मन, काया, माझी, परी मी त्यांचा नाही तीहि नव्हती माझी, कैसे लीलाकौतुक पाही !''

'मी आणि माझे' ही भ्रांती आहे; हे एकदा कळल्यावर आधि-व्याधि-उपाधितून सुटायला वेळ लागत नाही !

*'मी-माझे भ्रांतीचे ओझे उतर खालती आधी ।*

*तरिच तत्त्वता क्षणात हाता येते सहज-समाधि*

*सहज-समाधि संतत साधी न लगे साधन अन्य*

*सुटुनी आधि-व्याधि-उपाधि होते जीवन धन्य !'*

'मी-माझे' ची भ्रांती आहे, तोपर्यंत वृत्तीची चंचलता आहे. जोपर्यंत 'मी-माझे' चा स्पर्श वृत्तीला होतो आहे, तोपर्यंत वृत्ती स्थिर होत नाही आणि निश्चलत्व आल्याशिवाय तन्मयता कुठली ? पण स्वरुपानंदांची वृत्ती आता जगदंबेच्या नामात रंगली होती. तिने विषयांचे चुंबन घ्यायचे केव्हाच सोडले होते.

*'वृत्ति अखंडित जधि रंगली जगदंबेच्या नामी ।*

*पुण्य-पाप-संबंध संपुनी नित्य पुनीत तदा मी ॥'*

वृत्तीला तर आलंबन हवंय आणि आता 'अहं' सुटला. केवळ 'सः !' काय होईल आता ?

*'अनन्य भावे कळवळूनि जैं उडी घेतली खाली*

*भक्तवत्सला माउली मला फुलासारखी झेली ।*

*धाव घेई तत्क्षणी ठेवुनी भाव पावनी चरणी*

*का विलंब लावील अंबिका बालिकासि उद्धरणी*

*मुग दाखविला म्हणते, माया-भक्तीमाचा खेळ ।*

*ऊठ बालका, हीच असे तव उद्धाराची वेळ ॥''*

परीक्षिती राजाला शुकमुनींनी उपदेश करून उद्धाराला सात दिवस तरी लागले, पण ''मी मातृ-कृपा-कटाक्षमात्रे क्षणात केलो भक्त !''

'अहंते' चा मृत्यू होताच 'भक्ति' चा उदय झाला आणि - 'त्वत्कृपेच माउली, लाधली चिरशांती जीवास !' 'अहंते' च्या मृत्यूचे वर्णन ते असे करतात -

*'शुक्लपक्ष भृगु-वासर रात्री आषाढीची नवमी ।*

*अठराशे छपन्न शकाब्दी मृत्यु पावलो आम्ही ॥'*

या मृत्यूची त्याना भीती वाटली का ? माता जगदंबेचा वत्सलतेचा हात सदैव पाठीवरून फिरत असल्यामुळे ते निर्भय होते.

'पळापळाने करुनि मोकळा काळरूप गळफास ।

निर्भयतेचे पाठ शिकविते आज मला षण्मास ॥' आता कोणत्याही मोहाला आपण हार जाणार नाही, अशी बेडरवृत्ती त्यांच्यात निर्माण झाली.

*''... रडी न खाइन बेडर, माझी जरी निघाली तिरडी*

*माझी कसली ती मोहाची, मी नच जाइन हार ।*

*मत्संजीवन-सूत्र असे जे करी सहज उद्धार ॥'*

*आपल्या या मरणानंतर जगात काय फरक पडेल ?*

*''आणि आमुच्या पश्चात् चाले कसा जगाचा गाडा*

*पाहो जाता दिसे पूर्ववत् सुरुच रामरगाडा ॥*

*तो चि महात्मा, तीच हिंद-भू, तेचि स्वातंत्र्य-रण*

*दृष्टिकोन तो मात्र बदलला येताचि मला मरण ।''*

आपल्याच दृष्टिकोनात फरक पडतो. आधी जे आपल्याला 'माझ्यामुळे' सर्व होते, 'मी' करतो असे वाटत होते, त्याऐवजी आता 'परमेश्वर' सगळे करतो, 'त्याच्या'मुळेच सर्व होते, असे वाटू लागते.

*'यदृच्छेविना हालत नाही वृक्षाचेही पान ।*

*उगाच का वाहसी मानवा वाउगाच अभिमान ॥'*

या अवस्थेत 'जेथे जातो तेथे तू माझा सांगाती' असा अनुभव येऊ लागतो. स्वरुपानंद महाराज म्हणतात -

*'सदैव मार्गी चालत असता मजला देतो हात ।*

*उठता बसता उभा पाठिशी त्रैलोक्याचा नाथ ॥'*

जोवर श्रीचरणांचे दर्शन घडत नाही, तोवर आर्त होऊन आळवणीही केली आहे -

*'काय न झाली अजुनि माउली मत्कर्माची राख ।*

*दावि पाउले भक्तवत्सले, शीघ्र आपुले राख ॥'*

*पण विश्वास आहे की, माउली नक्की येईल.*

*'सदैव साक्षात् ती जगदम्बा असता मज सावरिती*

*होत अवनति तरी मासुती निश्चित येइन वरती''*

असा विश्वास आहे. म्हणून मरणाचा अनुभव घेताना त्यांना भीती वाटली नाही. त्या वेळचा या मायलेकरांचा संवाद 'गोड' आहे -

*'भीति वाटली का बाळ तुला ?' 'छे गे, मुळीच नाही ।'*

*माउली, तुझी मला मुलाला गमेल भीति काही ?*

*आणि सांगते, 'पाडसा, असा दूर नको रे जाऊ*

*ये बाळ, तुला देते बघ हा मोदगोडसा खाऊ*

*तद्वच पडता श्रवणिं तेधवां धाव घेतली जवळी*
*तोच ती त्वरे वात्सल्यभरे स्वकरे मज कुरवाळी ।*
*निढळावरती नीट लावुनी आत्मस्मृतीची तीट ।*
*भक्तिसुखाचा मुखी घालिते साखरघास अवीट ।*
*म्हणे, 'अतां जा बरे लाडक्या, नको गमावू वेळ ।*
*सकळ सौंगड्यासवे हवे ते सोंग घेउनि खेळ ॥'*

भक्तिसुखाचा हा उत्कट अनुभव इतक्या तरल शब्दांत स्वामीजींनी व्यक्त केला आहे की, त्याचा मुळातून जसाच्या तसाच आस्वाद घ्यावा. जगदंबेच्या या लाडक्या पुत्राने माऊलीला उत्तरही समर्पक दिले आहे.

*'मजसि ह्या जगद् रंगभूमिवर जसे दिले त्वां सोंग ।*
*करीन संपादणी तशी मी राहुनिया निःसंग ॥*
*जगज्जननि तव भक्ति-सुधेची पावन भिक्षा घाल ।*
*दारि पातला पहा तुझा हा भाग्यवंत कंगाल ॥*
*चाड मुक्तिची नाहि जिवाला मुक्तिचेही ना कोड ।*
*जगन्माउली दे अखंड तव भक्तिसुखाची जोड ॥'*

माऊलीने ही या लाडक्याला अक्षय, अविभाज्य निजपद दिले. आता हा तिचेच गुण गाऊ लागला; तिचेच कीर्तन ऐकू लागला; तिचेच रूप पाहू लागला; तिचेच ध्यान करू लागला. थोडक्यात याच्या वाणीचा, श्रवणाचा, नेत्राचा, ध्यानाचा, (मन-बुद्धीचा) विषय माऊलीच झाली. 'भक्त' आणखी वेगळा का असतो ? ज्ञानेश्वर महाराज भक्ताचे वर्णन करताना म्हणतात -

*'जयाचिये वाचे माझे आलाप । दृष्टि भोगी माझेचि रूप ।*
*जयांचे मन संकल्प माझाचि वाहे ।*
*माझिये कीर्तिविण जयांचे रिते नाही श्रवण । जया सर्वांगी भूषण माझी सेवा ॥'*

असा भक्त कृतार्थतेचे उद्‌गार काढू लागला - 'अद्वय-भक्ति येता हाती सरली यातायाती' किंवा 'प्रसन्न होता माता, हाता चढले सोऽहंसार । हवा कशाला मला आता हा वृथा शास्त्रसंभार ? किंवा 'आला अनुभव देव तु, तसा भक्तही तू स्वयमेव । छिलालाघव हे अपूर्व तव पाहे तोचि सदैव ।।' देव आणि भक्त यांचे सायुज्य झाले.

*'मी-तूपण अस्तवले आले साधनेस पूर्णत्व*
*कणाकणात कोंदले एकले एक नित्य सत् तत्त्व !'*
*किंवा 'ॐ तत् सत्' साम्राज्य आपुले तीन पाउले प्रांत ।*
*क्षणी तयांनी परी व्यापिले लोकत्रय निभ्रांत ॥'*
*चराचरात आता त्यांना आत्मप्रत्यय येऊ लागला.*
*'भुः भुः भुः भुंकते श्वान ते ? छे ! छे ! प्यारेराम ।*
*डरॉंव डरॉंव बेडूक ओरडे ? छे रे ! आत्माराम ।*
*चिंव् चिंव् गाते चिमणी ? छे ! छे ! माझा प्यारेराम ।*
*टिटिव् टिटिव् टिव् टिटवी ? छे रे ! माझा आत्माराम !'*

स्वानुभूती इथे भावविभोर झाली आहे. असा प्रत्यय येण्याचे कारण काय ?-

'जाण चराचरि भरुनि राहिलो मीच एकला साचा

आज ना उद्या हा नश्वर देह मातीत मिळाला, तरी 'ऐक मातही सदैव पाही मी दिक्कालातीत' असे ते म्हणतात.

'जीवन्मुक्तासहि न चुकते प्रारब्धाची फेड !' हे त्यांना माहीत आहे. म्हणूनच ते म्हणतात, मला कर्मविपाके हे 'सावध-वेड' लागले आहे. मी 'सावध-वेडापीर' आहे. कसा ? -

'मी विश्वसखा, मला सारखा अमीर आणि फकीर' म्हणून ते अखिल मानवाला सांगतात -

'स्वरुपानुसंधान सर्वदा धर्म जगाचा एक ।' किंवा 'जोवरी न ती कानी आली काळाची आरोळी ।

मोह जाळुनी होई मोकळा वाजवुनी कर-टाळी।

असो, सकळ जन तो काळाच्या पडतो भक्ष्यस्थानी

मात्र एकला अमर जाहला जगात आत्मज्ञानी !'

तो केवळ ज्ञानी नाही; तर संतही आहे. 'मऊ मेणाहुनि आम्ही विष्णुदास, कठीण वज्रास भेदू ऐसे' याचा प्रत्यय स्वरुपानंद महाराजांच्या या अनुभवगम्य साक्यांमधून येतो -

*'कोमल अंतःकरण आमुचे जणू फुलाहुनि फूल ।*
*परि वज्राहुनि कठिण, लागता मोहाची चाहूल ॥*
*निज मातेसारिखी लेखितो सदा परस्त्री देखा ।*
*असो कुणी सुंदरा अप्सरा किंवा ते शूर्पणखा ॥*
*नसानसांतुनि ते संतांचे नाचे अस्सल रक्त ।*
*जाण साजणी आजपासुनी आम्ही जीवन्मुक्त ॥'*

आत्मविश्वास पूर्ण अशा या ओळी त्यांच्या सच्चरित्रावरही प्रकाशझोत टाकतात. त्यांचे असामान्यत्व दर्शवितात. सामान्यांसारखे ते नव्हेत. भगवंतानेच त्यांना पाठविले; 'देवदूत'च ते !

*'आजकालचे नकोच आम्ही जुने पुराणे जाणे ।*
*असे वाचला नमूद केला पहा दफ्तरी तेणे ॥*
*पाठवि येथे ती आम्हांते मातेची नवलाई ।*
*चाकर आम्ही धिपल्या कामी न करू कधि कुचराई ॥'*

यामध्ये विनम्रताही प्रकट झाली आहे. मातेच्या कृपेने प्रगटलेल्या या काव्याच्या शेवटी तिच्याच आज्ञेने लेखणी खाली ठेवताना स्वरुपानंदमहाराज भावविभोर होतात -

*'जगन्माउली आज्ञा होता ती पुनरपि उचलूच ।*
*भक्त होउनी त्वद् यशो-ध्वजा जगी उभारू उंच ॥'*

मातेच्या आज्ञेत असणाऱ्या या लाडक्या पुत्राचा यातून जितका आत्मविश्वास प्रगट झाला आहे, तितकाच निरहंकारही ! इतकेच नव्हे तर त्यांची साहित्यनिर्मिती म्हणजे मातेची यशोध्वजा आहे हेही इथे सूचित केले आहे. 'अमृतधारा' ही याला अपवाद नाही. जगन्माउलीने आपले गुपित आपल्या लाडक्याकडून वदविले आहे.

आपण 'अमृतधारे'त स्नान करून कोणते दान द्यायचे ?

*'... करुनि स्नान ।*
*देतसे दान । अहंतेचे॥'*

**सौ. सुनंदा शाळीग्राम**
५१२ शनिवार पेठ, पुणे ४११ ०३०.

# संजीवन गाथेचे अंतरंग

**प्रा. अजित कुलकर्णी**

*बी.ए. (तत्त्वज्ञान), एम.ए. (तत्त्वज्ञान) (समाजशास्त्र) पीएच.डी. काम सुरू. रजिस्ट्रार बी. एम. सी. सी. कॉलेज. पुस्तके, लेखमाला प्रसिद्ध. गेली २५ वर्षे प्रवचन, कीर्तन, व्याख्यान. श्रीज्ञानेश्वरी, भागवत, दासबोध, रामकृष्ण, विवेकानंद इ. गाढा अभ्यास. शंकराचार्यांकडून गौरव पुरस्कार, पुणे महानगरपालिका आदर्श शिक्षक व गौरव पदक. धर्मभूषण पदवी - श्रीमत् जगद्गुरु शंकराचार्य (पुरी) १९९६.*

परमार्थाच्या प्रांगणातील एक अलौकिक व्यक्तिमत्त्व म्हणजे पावसचे 'स्वामी स्वरुपानंद' !

श्रीज्ञानदेवांनी आपला 'नाथ संप्रदाय' हा भागवत धर्माच्या एका छताखाली आणला असला तरी नाथ संप्रदायाच्या मूलगामी तत्त्वप्रणालीनुसार 'नाथ संप्रदायाचे', गेल्या शतकातील 'स्वामी स्वरुपानंद' हे अधिकारी होते.

भक्ती, ज्ञान व योग याचा मंगल ठेवा, एक-एक उत्तमोत्तम अशा शिष्य वर्गाकडे प्रदान करून जनसामान्यात परमार्थातील अंतरंगाचे अधिकारी बनविले आहे. त्या कार्यातील एक साधन म्हणजे 'स्वामी स्वरुपानंदांची संजीवन गाथा !'

स्वामींचे दीर्घकाळाचे वास्तव्य हे पावसलाच झालं ! विश्वमन व अंतर्मनाचा वेध आणि अभ्यास हा पावसला घडला. तरी स्वामीजींनी महासमाधीपूर्वी सांगितले आहे ते असे -

***हे प्रतिज्ञोत्तर माझे उघड आइका***
***आजकालचे नहोच आम्ही ॥***
***माऊलीनेच आम्हाला इथ पाठवले***
***दिलं काम, तिच्याच कृपेने पुरे झालं***
***आता आम्हाला नाही कुठं जायचे***
***इथच आनंदात रहायचं !***

आणि

***माऊलीने अन्यत्र पाठविलं***
***आणि तिथ अवतीर्ण व्हावं लागलं***
***तरी आता चैतन्य स्वरूपात***
***इथ आमचं अखंड वास्तव्य आहेच !***

या शब्दात खूपच गहन अर्थ आहे. तुकाराम महाराजांनीही असे सांगितले होते ते असे -

***आम्ही वैकुंठवासी आलो याचि कारणासी***
***बोलीले जे ऋषी साचे भावे वर्ताया ॥***

हे संत परंपरेचे वैशिष्ट्य आहे. हे थोर पुण्यात्मे ईश्वरी सृष्टीचे कार्य व लोकजीवनातील शाश्वत सुखाचा समन्वय साधण्यासाठी येतात व जातात. अशा थोर पुण्यात्म्याचे चैतन्यरूपी अस्तित्व आजही पावसला आहे, याची अनुभूती सर्वांना आहे.

स्वामी स्वरुपानंदांच्या साहित्यसंपदेत दोन काव्य रचनेचे ग्रंथ आहेत. संजीवन गाथा व अमृतधारा ! संजीवन गाथा ही संपदा, साधकांना मार्गदर्शक व सुबोध अशी आहे. या काव्य पंक्ती संजीवन आहेत. साधक जसजशी उपासना करेल, तसतशी त्याची उपासना दृढ होईल अथवा जो परमार्थी विचारांचा मनुष्य नसेल, तो परमार्थी वा साधक होईल, असे 'सामर्थ्य' या काव्यपंक्तीत आहे. त्यामुळे या काव्य-अभंग रचनेला 'संजीवन गाथा' हे नाव यथार्थ आहे, असे म्हणता येईल.

## 'संजीवन' शब्दाचा अर्थ

संजीवन या शब्दाचा अर्थ अनेक छटांनी पाहता येतो. तथापि प्रस्तुत विषयासंबंधी अर्थ पाहताना असे म्हणता येईल की, 'ज्या विचारांनी, ज्या शब्द सामर्थ्यांनी मनुष्याच्या मन, बुद्धी, चित्त व अंतःकरण पटल यावर एक संस्कार घडून स्फुल्लिंग, स्फूर्ती, प्रज्ञावर्धन, प्रेरणा निर्माण होतात त्याने जीवनात परिवर्तन घडू शकते. नवचैतन्याची निर्मिती होते. त्यामुळे त्या विचारांना व काव्यपंक्तींना 'संजीवन' असे म्हणतात.

## स्वामी स्वरुपानंदांची संजीवनी गाथा : बहिरंग

स्वामी स्वरुपानंदांच्या संजीवन गाथेत २६१ अभंग व परिशिष्टाचे ४ अभंग आहेत. अभंग रचना अत्यंत सोप्या शब्दांच्या पण सामर्थ्य संपन्न अशा शब्दांच्या आहेत. हे अभंग म्हणजे स्वामींचे अनुभवरूप अवस्थेचे वर्णन असलेली स्थिती आहे. जीवनाचे सार सांगणारे विचारधन आहे. या सर्व काव्य रचनेतील विचारशैली, यातील एक मोकळेपणा, सुटसुटीतपणा, सहजस्फूर्ती, विशाल दृष्टिकोन, मार्मिकता, समाजाचे सूक्ष्म निरीक्षण अशा अनेक छटांचे जणू संमेलन दिसून येते.

संजीवन गाथेच्या विचारांचे वर्गीकरण केले तर असे दिसून येते की, मंगलचरण, सद्गुरुपर, श्रीहरिरूपपर, संतपर, नामपर, उपदेशपर, साधनपर अशा रचना यांत आहेत.

## संजीवन गाथेचे अंतरंग

### १) मंगलचरण

मंगलचरण किंवा मंगलवंदना करण्याची भारतीय संस्कृतीची परंपरा

आहे. स्वामी स्वरुपानंदांनीही त्याचे पालन केले आहे. प्रथम स्वामीजी मंगलचरण वंदना करताना सांगतात,

***आदिनाथ सिद्ध, आदिगुरु थोर***
***त्यासी नमस्कार भक्तीभावे ॥...***
***... योग सार ऐसे परंपरा प्राप्त***
***सद्गुरु 'गणनाथ' देई मज ॥...***
***... स्वामी म्हणे झाले कृतार्थ जीवन***
***सद्गुरुचरण उपासिता ॥***

या मंगलचरण वंदनेत स्वामींनी आपुली गुरुपरंपरा सांगितली आहे. मंगलचरण म्हणजे काय ? तर परंपरेने देव-देवतांचे वंदन करण्याचा प्रघात आहे. वेदकाळात प्रारंभी केवळ निर्गुणाची उपासना, ओंकाराची उपासना होती. त्या विचारसरणीत विकास झाला व प्रतिमापूजन आले आणि गणेशवंदनेचा प्रारंभ झाला. तथापि, स्वामी स्वरुपानंदांनी मंगलचरण व गुरुपरंपरा या दोन्ही गोष्टी सांगून ओंकाररूप गुरुवंदना केली आहे. त्याचबरोबर गुरुपरंपरा सांगून मी वैदिकतेने मंगल असलेल्या पावन पथानी जात आहे. मंगल म्हणजे 'पावन-पवित्र पथ' म्हणता येईल, अशा प्रकारे समयोचितता सांधली आहे.

## २) सद्गुरुबद्दल अत्यंत श्रद्धा व त्याचा प्रसाद

स्वामींचा सद्गुरुंबद्दल अत्यंत आदरभाव होता. हे काही अभंगातून व्यक्त होत आहे. स्वामीजी सद्गुरुंबद्दल म्हणतात -

***सद्गुरु गणनाथ उदार समर्थ घाली नयनात ज्ञानांजन ।***
***सहज समाधि सापडले धन लाचावले मन तया ठायी ।***
***चालता बोलता न ढळे आसन न भंगे ते मौन कदा काळी ।***
***स्वामी म्हणे लाभे अवीट आनंद लागलासे छंद स्वरुपाचा ॥***

स्वामीजी म्हणतात, श्री गुरुकृपा कशी झाली, साधना कशी घडली आणि आनंदाची प्राप्ती कशी झाली हे काव्यातून प्रगट केले आहे. सद्गुरुंवर अविचल श्रद्धेने स्वामीजी स्व-रूपात रमलेले दिसतात. स्वामीजी म्हणतात, 'सापडले धन' ! कोणते धन तर, शाश्वत सुखाची प्राप्ती. आणि 'न ढळे आसन' म्हणजे, अविचल श्रद्धा ! ही अशी श्रद्धा आहे. साधक जीवनात गुरुचे महत्त्व विदित केले आहे. त्यासाठी स्वामीजी म्हणतात -

***गुरुकृपेविण नाही आत्मज्ञान***
***वा उगा तो शिण साधनाचा ॥ ६५ सं. गा.***

आणि

***गुरु तो चि देव ऐसा ठेवी भाव***
***सद्गुरु गौरव काय वानू ॥ १७५ सं. गा.***

स्वामींच्या जीवनात साधना करताना जसजशी परिपक्वता येत गेली, तसतशी विचारांची प्रगल्भता वाढत गेली. या सर्व रचना म्हणजे 'स्वामींच्या सर्व भावावस्था' आहेत. त्या भाव अवस्थेत स्वामी म्हणतात-

***सद्गुरु चरण उपासिता जाण***
***आंगवले ज्ञान विज्ञानेसी ॥ १७१ सं. गा.***

आणि

***सद्गुरु स्वरूप अगाध अपार***
***काय मी पामर कैसे वानू ॥ २१४ सं. गा.***

ही अवस्था म्हणजे वेदाची 'नेति-नेति' ची अनुभूती देणारी आहे. तसेच स्वामीजी सद्गुरुंबद्दल म्हणतात -

***नमो जय जय सद्गुरुराव देही दाखविला देव ॥१॥***
***पाजळुनी ज्ञान-ज्योति दूर केली भव-भ्रांति ॥२॥ १३३ सं. गा.***

सद्गुरु ज्ञान ज्योती प्रकट करतात व भव भ्रांती दूर करतात. भव म्हणजे काय ? 'अपूर्णता' ! जीवनातील अपूर्णता कमी करून शाश्वत आनंदानी जीवन पूर्ण साफल्यतेला पोहचू शकते. यासाठी स्वामी गुरुचा हा प्रभाव सामर्थ्य व्यक्त करीत आहेत. 'गुरुंचा प्रसाद म्हणजे पराशांती.' हे या अभंगात स्वामी असे सांगतात की,

***गुरु तो चि देव ऐसा ठेवी भाव सद्गुरु गौरव काय वानूं ॥१॥***
***तो चि ज्ञान-मूर्ति ब्रह्मानंद स्थिती***
***देई परा शांति भाविकाने ॥२॥ १७५ सं. गा.***

गुरु व देव यात अभेद्य, अद्वैत स्थिती अनुभवता आली पाहिजे. तेव्हा पराशांती लाभते याची ग्वाही स्वामी देतात.

***कृपावंत भला सद्गुरु लाभला अंगीकार केला तेणे माझा ॥१॥***
***अंतरीची खूण दाखवोनी मज सोऽहम् - मंत्र गुज सांगितले ॥२॥ १७ सं. गा.***

गुरु जेव्हा शिष्याचा स्वीकार करतात, तेव्हा ते सर्वस्व शिष्याला समर्पण करतात. या समर्पणात स्वामी स्वरुपानंदांना 'सोऽहम्' मंत्राचा प्रसाद लाभला आहे. अशा प्रकारे गुरुप्रती स्वामींनी शब्दरूपी भावाची माणिक मोती समर्पित केली आहेत. या शब्दांनीही साधकाला सामर्थ्याची अनुभूती येते.

## ३) नरदेहाची सार्थता व कर्माबद्दलचा विचार

सर्व संतांनी नरदेह - नरजन्माचे महत्त्व सांगितले आहे. स्वामींनी मानवी जीवनातील वास्तवता व नरदेहाचे महत्त्व, यात समन्वय साधला आहे. ते सांगताना स्वामी म्हणतात -

***नाशिवंत देह, पुत्र वित्त गेह अल्प ही संदेह नाही मज ॥***
***विश्व सर्व जाण काळाचे भक्ष प्रत्यक्ष प्रमाण देखतसे ॥ ११ सं. गा.***

अशा नाशवंत देहात, जीवनात कर्म करावेच लागते. कर्माशिवाय मनुष्य राहू शकत नाही. म्हणून कर्म करताना स्वामी म्हणतात -

***प्रारब्ध संचित आणि क्रियमाण हरिसी अर्पण करोनिया ॥***
***सुखे हारियासी राहिलो निवांत जाहलो निश्चित कर्माकर्मे ॥ २७ सं. गा.***

सर्व कर्मे श्रीहरीला समर्पण करावीत, त्यानेच जीवनात निवांत राहता येते. कर्म कौशल्याने कसे करावे यासाठी स्वामी सांगतात -

***करी गा निष्काम स्वकर्माचरण नामसंकीर्तन विठ्ठलाचे ।...***
***... होता चित्तशुद्धी लाभे आत्मज्ञान***
***ज्ञाने समाधान स्वामी म्हणे ॥ १४८ सं. गा.***

मानवी जीवनात स्वकर्म, स्वधर्म व स्वकर्तव्याचे स्थान वेगळे आहे. मानवी जीवन अंतिमतः आत्मज्ञान प्राप्त करून घेण्यासाठी आहे.

मानवी देहातच आत्मज्ञान करून घेण्याची संधी असल्याने स्वकर्माचरण करावे व समाधानाची ज्ञानाने प्राप्ती करून घ्यावी, हा विचार स्वामी सांगतात.

जीवन व्यतीत करताना स्वामी म्हणतात -

निवडावे जैसे हंसे क्षीर नीर

तैसे सारासार विचारावे ।। १४७ सं. गा.

साधकांनी मानवी जीवनात सारासार विचार करावा. शाश्वत-अशाश्वत, नित्यानित्य, धर्माधर्म, चांगले-वाईट हे समजले पाहिजे. हा सारासार विचाराचा अर्थ आहे. याने काय होते तर,

असोनि संसारी ध्यावे आत्मसुख

तरी चि सार्थक स्वामी म्हणे ।। १४७ सं. गा.

जीवन सुख-दुःखाच्या धाग्यांनी भरलेले आहे. यातही कर्माचे स्थान वेगळे आहे. कर्माबद्दल स्वामी म्हणतात -

कर्म तैसे फळ लाभते केवळ

आणिकांते बोल लावू नये ।।...

... स्वामी म्हणे होसी सर्वथैव जाण

तुझा तू कारण सुख-दुःख ।। ३५ सं. गा.

मनुष्याला सुख-दुःख कर्मानुसार वाट्याला येत असते. पण जो तो, स्वतःच्या कर्मानीच सुख-दुःखाला जबाबदार असतो. हे स्वामी व्यक्त करतात. यासाठी मनुष्याने कर्म कसे करावे तर,

घडे जे स्वभावे कर्म ते आधवे ।

भावे समर्पावे हरिपाया ।।१६५ सं. गा.

एका श्रीहरीची कृपा व सत्ता सर्वत्र आहे. हे जाणून कर्म समर्पण भावनेने करावे. ईश्वर कर्ता समजून वागावे, म्हणजे आत्मानुभूतीची प्रचिती त्वरित येऊ शकते.

हे सर्व सांगताना स्वामींनी जीवनाची एक वास्तवता मांडली आहे. ती अशी -

बाळपणी खेळ यौवनी विलास

वार्धक्यी जीवास व्याधि चिंता ।।

बाळपणी शाळा तरुण्यी संसार

वार्धक्यी जोजार तयाचा चि ।। ५८ सं. गा.

जीवनातील या अवस्था असतात. त्यात मोह मोठा प्रबळ आहे. त्याची निवृत्ती झाल्याशिवाय मनुष्याला विसावा वाटत नाही. हे स्वामी अंतिम चरणात सांगतात.

अशा दुर्लभ जीवनात ध्येय काय असावे तर स्वामी म्हणतात -

सत्याचे दर्शन घडावे संपूर्ण ।

ध्येय हे लक्षून जीवनाचे ।।१।।

विश्वातील सत्याचे ज्ञान मनुष्याने करून घ्यावे. त्यानी जीवनात शांती-सुखाचा लाभ घडतो. दुसरी वास्तवता अशी की,

देह पराधीन नाशिवंत जाण ।

वाया अभिमान वाहसी कां ।। १४५ सं. गा.

खरे पाहता देह पराधीन आहे. नाशवंत आहे. त्याचा अभिमान मनुष्याला असल्याने मी-माझे विचार प्रबळ होतो, हे जीवनात निश्चित घातक ठरते. यासाठी आत्मरूपात राहण्याचे कर्म घडावे, कल्याणाचा विचार करावा हे स्वामींना अभिप्रेत दिसते.

## ४) स्वामीजी नीतिबद्दल विचार मांडतात

मानवी जीवनात नीतिचे महत्त्व अधिक आहे. नीति म्हणजे आचरण, वर्तन ! आचरण हे मानवी जीवनाचे अंग आहे. समाजात नीतिसंपन्न जीवन मनुष्याने व्यतीत करावे, यासाठी स्वामीजी म्हणतात-

कोणी भेटो सुष्ट-दुष्ट

सदा असावे संतुष्ट ।।...

... स्वामी म्हणे प्रतिक्षण

आत्मरूपी अनुसंधान ।। ३७ सं. गा.

व्यष्टी व समष्टी जीवन उत्तम स्तरावर जगता यावे यासाठी स्वामी म्हणतात - कोणी कसे वागो, सदा सर्वदा संतुष्ट असावे. आत्मरुपी अनुसंधानात राहता यावे हा उद्देश प्रमुख असल्याने नीतिबद्दल स्वामी आपले विचार व्यक्त करतात.

मानवी जीवनात नीतिचा प्रभाव मुख्यत्वे समाजजीवनात अधिक असतो, यासाठी स्वामी म्हणतात -

लोक सेवा व्रत आचरिती भावे

तयाते मानावे भाग्यवंत ।।

लोकसेवेसाठी सत्याने स्मरून

करीती ते दान सर्वस्वाचे ।।

त्याचि सेवा व्रते तोषे जगन्नाथ

शुद्ध करी चित्त सेवकाचे ।।

स्वामी म्हणे तेणे लाभे आत्मज्ञान

जनी जनार्दन प्रकटतो ।। ६१ सं. गा.

समाजात जनार्दनाचा वास सदैव असतो. त्याची अनुभूती घ्याववायाची म्हणजे लोकसेवा व्रतानी आचरण करावे. याचा विश्वास स्वामींना वाटत असतो. व्यक्तीगत जीवनाबद्दल स्वामी सांगतात -

प्रपंची विचार करी सारासार

राहे निरंतर सावधान ।।

स्वभावता पावे जे जे सुखदुःख

त्याचा हर्ष शोक मानू नको ।। ७७ सं. गा.

या प्रपंचात मनुष्याने सदैव सावध रहावे, सारासार विचार करावा. हर्ष व शोक सम-समान मानावा. सदैव जागृत राहून जीवन व्यतीत करावे. तेव्हा जीवनात कसे वागावे तर,

प्रपंची असावे उदास वर्तन

आवरावे मन विवेकाने ।।

असो घरदार कुटुंब संसार

नये त्याचा भार वाटो देवो ।। २०३ सं. गा.

संतत्त्व व कवित्वाची जोड स्वामींना लाभली होती. साधनेचा व परिपक्वतेचा अनुभव जसा येत गेला तसे स्वामींच्या कवित्वाचा विकासही

अधिक खुलू लागलेला दिसून येतो.

*नको निराहार नको सेवू फार सदा मिताहार असो द्यावा ॥*

*नको अति झोप नको जागरण असावे प्रमाण नित्रेमाजी ॥ ११६ सं. गा.*

व्यक्तीगत जीवनात कसे वर्तन असावे, हे स्वामीजी या अभंगात सांगत आहेत.

## ५) स्वामीजी आत्म-सुखात रमले

प्रकृती अस्वस्थतेमुळे स्वामीजींचे एका ठिकाणी वास्तव्य होते. तरी अंतरंगी विकास झाला होता. जेव्हा श्रीहरीचे रूप पाहू लागले ते असे -

*हरिरूप ध्याता हरि नाम गाता हरि ची तत्त्वता झालो आम्ही ॥...*

*... स्वामी म्हणे राहू भक्ती सुखी लीन*

*हरिसी अर्पून भोग मोक्ष ॥ २० सं. गा.*

जीवनात भक्तीची अनुभूती आली पाहिजे. या भक्तीने कशी अवस्था झाली तर,

*देव भक्त आणि नाम झाला त्रिवेणी संगम ॥...*

*... देव भक्तांसी एकांती स्वामी म्हणे पडे मिठी ॥ ११ सं. गा.*

देव, भक्त व नाम याने ईश्वरी शक्तीशी स्वामीजी तादाम्य झाल्याचे दिसते. त्यामुळे स्वामी एकांतात आत्मसुखात रमले होते.

सिद्ध-साधक जीवन विश्वात्मक झाले की, जी अवस्था होते ती स्वामी व्यक्त करतात ती अशी -

*हरि-रूप जाण मृत्तिका पाषाण ग्रह तारांगण हरिरूप ॥...*

... एकला चि हरि नांदे सर्वा घरी

आदि मध्य अंती स्वामी म्हणे ॥ १२ सं. गा.

ज्ञानदेव ज्याप्रमाणे एक भावअवस्था व्यक्त करतात की, 'भरला घनदाट हरी दिसे ।' त्याचप्रमाणे स्वामीजींनी अवस्था व्यक्त केली आहे.

पारमार्थिक जीवनाच्या सहा अवस्था असतात. बद्ध, साधक, मुमुक्षु, वंचित, सिद्ध व जीवनमुक्त. पारमार्थिक जीवनातील या विकसीत होणाऱ्या अवस्था आहेत. स्वामींच्या जीवनात बद्ध व साधक अवस्था आढळून येत नाही. त्यामुळे स्वामींच्या प्रत्येक शब्दामध्ये सामर्थ्य, माधुर्य, काही वेगळे आहे. तरी सर्व संतांच्या वृत्तीत, तत्त्वदृष्टीने एकात्मता दिसते. त्यामुळे स्वामी म्हणतात -

*हरीपायी लीन झाले माझे मन । तेणे समाधान अखंडित ।....*

*.... स्वामी म्हणे गेला द्रष्टा दृश्य भाव कोंदटला देव अंतर्बाह्य ॥ १६ सं. गा.*

तसेच

*जीव शिवाचा संयोग हाचि माझा राजयोग । ...*

*... स्वामी बैसला स्व-स्थानी हरिरूप ध्यानी मनी ॥ १४ सं. गा.*

अशा प्रकारे स्वामीजी आत्मसुखात रमले होते. मनापासून या काव्यपंक्तीचे-अभंगाचे चिंतन जे करू शकले तेही आत्मसुखाच्या लाभास पात्र झाले आहेत, अशी अनुभूती साधकांना आहे. या अंगानेही या ग्रंथाचे नाव 'संजीवन गाथा' यथायोग्य ठरले आहे.

## ६) श्रीस्वामींचा लोकांना उपदेश

या अभंगात काही रचना या उपदेशपर आहेत. स्वामींना जे कोणी भेटावयास येत त्यांना ते काही सांगत असत. या बोलण्यातील शब्दाला परतत्त्वाचा स्पर्श असल्याने मन, बुद्धी व चित्ताला एक अनामिक स्पर्श होत असतो, त्यातून जो उन्मेष व्यक्त होई तो असा -

*शब्दांचे पांडित्य कल्पनेच्या गोष्टी वा उगी चावटी करू नये ।*

*स्वामी म्हणे नाही पांडित्याचे काम स्वये आत्माराम दावावा ॥ ९ सं. गा.*

स्वामींकडे सर्व स्तरांवरील लोक येत असत. त्या वेळी एकदा स्वामींनी जणू विश्वालाच सावध करावे असा विचार व्यक्त केला आहे तो असा -

*बुद्धिमंत काय बोलती ते वाया जना सौख्य द्याया 'यंत्र युग' ।...*

*... स्वामी म्हणे ऐसी आसुरी संस्कृती करितसे माती मानवाची ॥ १५ सं. गा.*

यंत्रयुगाच्या दुष्परिणामाचे एक चित्र स्वामींनी विश्वापुढे मांडले आहे. याचे चिंतन केले पाहिजे. सध्या बुद्धिवादही लटका पडला आहे. बहिरंगी विकास कितीही उत्तुंग झाला असला तरी, मनुष्य सुखी बनला असे दिसत नाही. आसुरी वृत्तीची वाढही तितकीच प्रचंड प्रमाणात दिसत असल्याने, त्याची सावधगिरीची सूचना स्वामींजी देत आहेत.

आसुरी संस्कृतीचा परिणाम पाहताना, स्वामींनी यातून सुटण्यासाठी एक विचार व्यक्त केला तो असा -

*हरिचे चिंतन करी रात्रंदिन वा उगा तो क्षण जावो नेदी ॥...*

*... स्वामी म्हणे नित्य हरिचे दर्शन तेणे समाधान परिपूर्ण ॥ २२ सं. गा.*

संसार प्रत्येक जण करीत असतो. हा संसार कृतार्थ व्हावा, म्हणून स्वामीजी संदेश देतात तो असा -

*धरिसील जरी हरिसी अंतरी तरि चि संसारी सुखी होसी ॥...*

*... पाळुनि स्वधर्म भोगी अर्थ काम गाठी मोक्षधाम स्वामी म्हणे ॥ १४ सं. गा.*

स्वामींचे जीवन कृतार्थ होते. जीवनात सद्गुणांचा विलास होता. त्याबरोबर नम्रताही होती. ज्ञानपूर्ण अवस्था होती, त्याबरोबर निरंहकारी वृत्ती होती. त्यांच्या प्रतिभा शक्तीला परतत्त्वाचा स्पर्श होता, त्यामुळे प्रत्येकास संजीवनरूपी चैतन्याचा लाभ मिळत होता. एकांतातही सामाजिक स्थितीची जाणीव होती. या जाणीवेतून एक विचार असा व्यक्त केला की,

*दावी चमत्कार त्यासी नमस्कार लोक व्यवहार ऐसा असे ॥...*

*... स्वामी म्हणे जना कृत्रिमाची गोडी नसे चि आवडी स्वाभाविक ॥ ५५ सं. गा.*

या सामाजिक स्थितीच्या जाणीवेवर एक विचार स्वामी असा व्यक्त करतात की,

*नको व्रत नको तीर्थाटन हरिसी शरण जाय वेगे ॥...*

*... स्वामी म्हणे नको नाना देह-दंड चालवी अखंड नाम-घोष ॥ ६० सं. गा.*

हा नामघोष अखंड होण्यासाठी चित्तशुद्धीचा उपाय सांगितला आहे. तो असा -

*चित्त शुद्धीचा उपाय सदा चिंतावे हरि पाय ॥ ...*

*... चित्ती उपजे सद्भाव स्वामी म्हणे भेटे देव ॥ ७० सं. गा.*

या संसारात विषय-वासनांचा मोह प्रबळ आहे. त्यासाठी स्वामी

एक विचार व्यक्त असा करतात की,

***नको मना होवू इंद्रियाचा दास  विषयांचा फांस टकावेल ॥...***
***... नको नको मना धन मान तृष्णा  अंती विटंबना टळे कैसी ॥... २०१ सं. गा.***

अशा प्रकारे निरनिराळ्या स्तरांवर स्वामीजींनी लोकांनाही उपदेश केला आहे.

## ७) स्वामींचा संतपरंपरेवर पूर्ण विश्वास होता

स्वामींचा संतपरंपरेवर पूर्ण विश्वास होता. संत परंपरा ही भारतीय संस्कृतीचे एक वैभव आहे. सर्व संतांचे कार्य समाज व समाजमन घडविण्याचे आहे. या कार्यान्वये स्वामी असे व्यक्त करतात की,

***संत ते उदार कृपेचे सागर  तयाचे उपकार काय वानू ॥...***
***... स्वामी म्हणे ऋण न फिटे म्हणोनी  भावे लोटांगण घालितसे ॥ १०८ सं. गा.***

या सर्व संत परंपरेत एकात्मता आहे. देश, काल, स्थिती जाणून त्या सर्वांनी आपले योगदान दिलं आहे. ते पाहून स्वामी म्हणतात -

***ज्ञानदेव एकनाथ, आले स्वामी रामतीर्थ ।***
***तुकाराम रामदास, रामकृष्ण परमहंस ।...***

... स्वामी म्हणे ध्याता ध्यान, हरिरूप परिपूर्ण ॥ ४४ सं. गा.

सर्व संत एका बोधावर असतात, तो म्हणजे 'वासुदेव जगत् सर्वम् ।' ही एक भावनिष्ठा आहे. त्यामुळे स्वामींना संतसहवास कसा वाटतो तर,

***संताचा सहवास आवडे जीवास  दुणावे उल्हास अंतर्यामी ॥...***
***... स्वामी म्हणे मज ही चि एक आस संतांचा सहवास नित्य घडो ॥ १४३ सं. गा.***

एकदा का संतसहवास लाभला की, जीवन कसे होते, हे स्वामी सांगतात -

***संतांची संगती घडो सर्वकाळ  आवडो गोपाळ अंतर्यामी ॥...***
***... विषयां गोडी न वाटो जीवास  लागो हरिध्यास स्वामी म्हणे ॥... १०६ सं. गा.***

संत सहवासाने जीवनात शाश्वत आनंदाचा प्रसाद संतांमुळे मिळू शकतो हे जाणून स्वामी म्हणतात -

***संतांची सद्भावे करोनी प्रणिपात  काही आत्महित विचारावे ॥...***
***... स्वामी म्हणे संत वाक्तितील खूण***
***ध्यावी ओळखून ध्यानी त्याने ॥ १७८ सं. गा.***

संत काय करतात तर,

***सांगा का गा जावे संतांसी शरण  काय संताविण ज्ञान नाही ॥...***
***... स्वामी म्हणे संत ब्रह्म मूर्तिमंत  विश्व कल्याणार्थ वावरती ॥ १७४ सं. गा.***

असा संतांबद्दल पूर्ण विश्वास व श्रद्धा स्वरुपानंद स्वामींची होती.

## ८) सोऽहम् साधनेचे अर्ध्वयु स्वरुपानंद

श्रीज्ञानदेवांनी भावार्थदीपिकेत सोऽहम् साधनेचे महत्त्व गायले आहे. हा नाम महिमाच एक प्रकारचा आहे. पू. स्वरुपानंद स्वामीजी सोऽहम् साधनेचे उपासक अर्ध्वयु होते. यावर स्वामीजी म्हणतात -

***सोऽहं सोहं ध्यास लागता जीवास  होतसे निरास संमोहाचा ॥...***
***... स्वामी म्हणे गा स्वानंदाचा भोग  होय तो हि सांग सुखरूप ॥ १७६ सं. गा.***

असे महत्त्व सोऽहम् साधनेचे आहे. या नाम साधनेचा प्रभाव स्वामी सांगतात -

***नाम जपे जाण जळोनिया पाप  होय आपोआप आत्मशुद्धी ॥...***
***... स्वामी म्हणे आता नामे चि सबळ  कापे कळिकाळ आम्हा पुढे ॥ १८८ सं. गा.***

कळिकाळाचे सामर्थ्यही नाम प्रभावाने लटिके पडते. याची अनुभूती स्वामीजींनी घेतली होती, असे दिसते. म्हणून नाम साधनेचा प्रभाव स्वामीजी सांगत आहेत. नामसाधनेने मनुष्य जीवनात काय घडते तर-

***नामसंकीर्तन जीवासी आवडे  मन बुद्धि जडे हरि पायी ॥...***
***... भाव बळे आम्हां हरिचे दर्शन  नित्य समाधान स्वामी म्हणे ॥ ६१ सं. गा.***

नाम साधनेत साधकाला प्रेम हवे आहे. या प्रेमाने भावयुक्त अवस्थेचे सामर्थ्यही वेगळे असते. यासाठी स्वामीजी सांगतात -

***आवडीने भावे हरिनामे गावे***
***निर्लज्ज नाचावे संकीर्तनी ॥ ६८ सं. गा.***

कलियुगात नामसाधना हे वरदान आहे. तन्मयता परमविरहता व तादात्मता या गुणांचा परिपोष झाला की, उत्कर्ष झाला की, वेदाभ्यास, तपसाधनेचे जे फळ असते, ते नामसाधनेने प्राप्त होऊ शकते. यासाठी स्वामी म्हणतात -

***नको वेदाभ्यास करावा सायास  उपास तापास देह दंड ॥ ...***
***... अखंड अंतरी सहज स्फुरण  तेथे ठेवी मन स्वामी म्हणे ॥ ७१ सं. गा.***

नामसाधनेचा प्रभाव नित्य जीवनात घडू शकतो. मनोजय, बुद्धीची निश्चयात्मकता दृढ होते. यासाठी स्वामी म्हणतात -

***नारायणी लय लागता अक्षय  विषयांचे भय काय करी ॥***
***साधे मनोजय बुद्धिचा निश्चय  विषय तो होय मोक्षलागी ॥ १०२ सं. गां.***

अशा प्रकारे नामसाधनेचे महत्त्व स्वामीजी सांगतात.

## ९) श्रीस्वामीजी, स्वरूपभक्तीत चिंब होते

भक्तीचे महात्म्य अनादि काळापासून आहे. कृतयुगात प्रल्हादजीच्या नामसंकीर्तनाने भगवंतालाही अवतीर्ण व्हावे लागले होते. पू. स्वरुपानंद स्वामीही भक्तीरसानी चिंब झाले होते. त्यामुळे भक्त कसा असतो याचे वर्णन स्वामीजी करतात की,

***भक्ताचे अंतरी सावळा श्रीहरी ।  सुखे वास करी सर्वकाळ ॥...***
***... हरि रूप कर्म हरि-रूप धर्म भक्तीचे हे वर्म स्वामी म्हणे ॥ १ सं. गा.***

अशा भक्ताची लक्षणे स्वामीजी सांगतात -

***भक्त तो प्रेमळ अर्पितो केवळ  पान फूल फळ भक्तिभावे ॥...***
***... येर फूल पान भक्तीची ती खूण  भाव चि प्रमाण स्वामी म्हणे ॥ १३२ सं. गा.***

साधकाचे भाव दृढ हवेत. त्याचेही एक सामर्थ्य असते. भक्तीभाव हे साधकाचे भूषण असते. भक्तीने मनुष्याला व्यापक दृष्टी लाभू शकते. त्यासाठी स्वामीजी म्हणतात -

***भक्तांसी साचार विश्वाचा संसार परि अहंकार नसे चित्तीं ॥...***
***... भक्तीचे भूषण मस्तकी धारण  करी नारायण स्वामी म्हणे ॥ १३ सं. गा.***

जो निरांहकारी भक्त असतो त्याचे भूषण भगवंतालाही असते. भक्तीचेही एक वैभव असते व त्यातही एक ऐश्वर्य आहे. असा भक्त कसा असतो तर,

***वासुदेवमय विश्व हे आघवे   भ्रांतीचे निनांवे शून्याकार ॥***
***नाम-स्वरूपातीत वसे वासुदेव   विश्वी स्वयमेव एकला चि ॥ १६० सं. गा.***

सर्वत्र एक वासुदेवमय विश्वाची तो अखंड अनुभूती घेत असतो. सर्वत्र एकच परब्रह्म वस्तु असते ही जाणीव हे पराभक्तीचे लक्षण आहे. यामुळे साधक जीवन कसे असावे तर,

***विषयीं विरक्ति दया सर्वा भूतीं   हरिपायी भक्ति एकनिष्ठ ॥***
***अंतरी जयाते नित्य समाधान   गेले मोह मान सांडोनिया ॥ १८ सं. गा.***

साधकांनी भक्त कसे बनावे हे सांगता-सांगता हाच भक्त 'संत' पदावर आरूढ आपोआप होतो.

## संजीवन गाथेतील परिशिष्टाबाबत

स्वामी स्वरुपानंदांच्या संजीवन गाथा या अभंगाच्या पुस्तकात परिशिष्ट असून त्यात ४ काव्य रचनेचा समावेश आहे.

स्वामीजींनी प्रथम १५६ अभंगाच्या रचना लिहिल्या. त्या रचना स्वामींनी डॉ. रामभाऊ परांजपे, संजीवन चिकित्सालय, रत्नागिरी यांचेकडे वाचावयास दिल्या. मला वाटते, या रचना वाचताना डॉ. परांजपे यांचेवर एक संस्कार घडला असावा. त्यावर त्यांनी चार अभंगांत स्वामींना एक विनंती केली आहे. ते हे परिशिष्टातील अभंग आहेत.

ही विनंती काय तर स्वामींनी १५६ अभंग होईपर्यंत 'स्वामी म्हणे' हा नामनिर्देश केला नव्हता. ती विनंती डॉ. परांजपे यांनी केली आहे, की आपण आपला नामनिर्देश करावा. ती रचना अशी की,

***अहो जी उदारा विनंती अवधारा । आमुच्या अंतरा तोषवाया ॥१॥***
***अभंगाशेवटीं नामाचा निर्देश करणे सुयश जोडावया ॥ परिशिष्ट अंभग १***

ही विनंती स्वामींनी मान्य केली व त्यापुढे झालेल्या रचनेत 'स्वामी म्हणे' हे लिहिण्याचे स्वीकारले, पण कसे तर,

***एकशे छपन्न अभंग रचोन   पहावया म्हणोनी मिसे संता ॥...***
***... अनिर्दिष्टनाम काव्य गमे उणे   केली मिळविणे पाक सिद्धी'' ॥***
***अभंगाशेवटी नामाचा निर्देश   करणे सुयश जोडावया ॥***
***संतांझाती ऐसा पाठवी निरोप   माझा माय-बाप वासुदेव ॥... १५७ सं. गा.***

स्वामींनी नामनिर्देशाची सूचना ग्राह्य धरली ती, 'भगवान वासुदेवाची आज्ञा' म्हणून स्वीकारली. हा देवाचा संदेश मानून या विनंतीचा स्वीकार केला. सर्वांचा विचार करावा, हे धोरण ईश्वरनिष्ठेने स्वीकारले आहे.

## भक्तीरसाच्या अमृतपान वाटपाचे जीवनव्रत

स्वामी स्वरुपानंदांचा पारमार्थिक अधिकार मोठा होता. स्वामींचे वास्तव्य जरी 'क्षेत्र संन्यासा' प्रमाणे असले तरी 'आपण घेत असलेली अनुभूती, साधकांनाही देत असत. सोऽहम् साधनेने सामान्य जीवाचाही उद्धार व्हावा याचा जणू स्वामींना ध्यास होता. सोऽहम् साधनेचा प्रसार व प्रचार स्वामींनी निष्ठेने केला. जे कोणी भेटावयास येत त्यांना अभंगातूनही अनुग्रह करीत असत. ज्यांना हे लाभले त्यांचे जीवन कृतार्थ झाले. अशा प्रकारे भक्तीरसाच्या अमृतपान वाटपाचे जीवनव्रत स्वामींनी स्वीकारले होते, असे म्हणता येईल.

स्वामी स्वरुपानंदांचे विचार म्हणजे अमूल्य अशी उज्ज्वल रत्ने होत. ही विचाररत्नें अनुभूतीच्या कांतीने चमकणारी आणि सूक्ष्म चिंतनाचा वेध घेणारी आहेत. ते सर्व विचार अत्यंत समर्पक अशा शब्दांत ओवलेले आहेत. त्यामुळे अशा काव्यरचनेचा प्रभाव संस्कार रूपाने घडत असतो. अशा प्रकारे संजीवन गाथा जीवनात नव चैतन्याच्या साजानी दैदिप्यमान ठरली आहे.

**प्रा. अजित कुलकर्णी**
६९५, नारायण पेठ, पुणे ४११ ०३०.
फोन : ४४८७०३०

# स्वामी स्वरुपानंद

पुण्याई ती घेऊन संगे रामचंद्र जन्मले
परि कर्तृत्वे स्वरुपानंदजी स्वामी ते झाले ॥धृ.॥
संस्काराची गंगा सुंदर
अभिषेक जणूं नित्य तयावर
मनि ज्ञानाचा फुटला अंकुर
बाल्य सर्व ते याच सुगंधे बहरून गेले ॥१॥
देव, देवता यांच्याच कथा
अध्ययनास्तव सदैव गीता
सदैव अमृत असे प्राशिता
व्यक्तिमत्त्व ते कलपद्रुपासम जणु मोहरले ॥२॥
देण्या युवका बहुविध शिक्षण
अहोरात्र ते झिजले जीवन
तुरुंगवासही आले भोगुन
मनी निरंतर देशभक्तिचे चिंतन चाले ॥३॥
प्रतिभा त्यांची जणू चंदनी
भक्तिरसाने भिजे लेखणी
अनेक ग्रंथ ते झाले लिहुनी
स्वामीसंगे पावस गावहि प्रसिद्ध झाले. ॥४॥

**दि. आ. कुलकर्णी**

# स्वामीजींची साहित्य संपदा : एक विहंग दर्शन

डॉ. ब. ना. तुरंबेकर

*एम.ए., एम.फिल, पीएच.डी. प्रबंध 'स्वामी' स्वरुपानंद यांच्या वाङ्मयाचा अभ्यास'. ज्ञानेश्वरी, संतसाहित्य, मराठी साहित्यावर अनेक संशोधनात्मक लेख प्रकाशित. प्राचीन वाङ्मय आणि तत्त्वज्ञान यांचा विशेष अभ्यास. ज्ञानेश्वरीवर २५० प्रवचने - समाज प्रबोधनाचे कार्य. डी. आर. माने महाविद्यालय कागल मराठीचे अधिव्याख्याते व विभाग प्रमुख. प्रकाशित ग्रंथ - अरुपाचे रूप (स्वामी स्वरुपानंद जीवन आणि वाङ्मय)*

स्वामी स्वरूपानंद हे आधुनिक काळातील थोर संत आहेत. ईश्वरपरायण वृत्ती असलेले महान भगवद्‌भक्त, प्रतिभाशाली कवी, संत ज्ञानदेवांच्या प्रस्थानत्रयीचा प्रचलित भाषेतील अभंग वृत्तांत अनुवाद करणारे अनुवादक म्हणून स्वामी स्वरूपानंद महाराष्ट्रीयांना परिचित आहेत. त्यांची साहित्यसंपदा विचारसंपन्न व साहित्यगुणांनीही मंडित असून, तिला अनुभूतीचे थोर पाठबळ आहे. साधी रहाणी आणि उच्च विचार ही त्यांच्या व्यक्तिमत्त्वाची खास वैशिष्ट्ये. त्यांच्या वाङ्मयनिर्मितीचा हेतू अत्यंत शुद्ध आणि पवित्र असून, ते कमालीच्या निःस्पृह वृत्तीतून जन्माला आले आहेत. सामाजिकतेची जाणीव, विश्वव्यापक करुणा, मानवतावाद, अध्यात्मवृत्ती, ईश्वरभेटीची तळमळ, तत्त्वचिंतन आणि जीवनभाष्य इत्यादींचे दर्शन त्यांच्या साहित्यातून होते.

स्वामी स्वरूपानंद हे संत ज्ञानदेवांचे पारमार्थिक वारसदार आहेत. त्यांची शिकवण आणि तत्त्वज्ञान भगवद्‌गीता आणि ज्ञानेश्वरी ग्रंथांना धरून आहे. नाथसंप्रदाय आणि वारकरी संप्रदाय यांचा समन्वय स्वामींच्या आचार-विचारात दिसतो. आपण नाथसंप्रदायी आहोत असे स्वामी स्वतःच सांगतात.

***स्वामी म्हणे माझा नाथ-संप्रदाय । किंवा***
***नाथ-संप्रदायी आम्ही कानफाटे (सं. गाथा, अं. १२२, १६७)***

स्वामीजींनी वेगळे असे तत्त्वज्ञान मांडलेले नाही. ज्ञानदेवादी संतांच्या तत्त्वज्ञानाचाच त्यांनी आपल्या वाङ्मयाद्वारे प्रसार केला. प्रस्तुत लेखात स्वामींच्या प्रत्येक ग्रंथाचा थोडक्यात परिचय करून दिला आहे.

## १) मृत्युपत्र

'मृत्युपत्र' हे स्वामींचे पहिले काव्य असून ते अद्याप अप्रकाशित आहे. दोनशे साक्यांच्या या काव्यात स्वामींच्या अनेकविध भावभावनांचे सौंदर्यपूर्ण दर्शन घडते. स्वामींची देहबुद्धी नष्ट होऊन आत्मबुद्धीचा उदय होताना जन्माला आलेले हे काव्य आहे. म्हणून स्वामींनी या काव्याला 'मृत्युपत्र' म्हटले आहे. देहबुद्धीचा निरास होणे म्हणजे पारमार्थिक दृष्ट्या मरणच होय. विश्वव्यापक प्रेमाचा आलेला अनुभव स्वामी येथे प्रकट करतात. स्वार्थी, संकुचित आणि शारीरिक प्रेमाची परिणती विश्वव्यापक, निरासक्त व निःसंग प्रेमात झाली असे स्वामींनी म्हटले आहे. विकार हे विकार नसून परमात्म्याची प्रणयलीला आहे, हे समजून द्वैताद्वैत यांचा निरास झाला व अंतरी एकला एक प्रेमा उरला. असा अनुभव स्वामी सांगतात.

***अनुभविता ही प्रेमसमाधी जीव-शिवा अद्वैत ।***
***प्रणय, प्रियकर, तशी प्रियतमा या त्रिपुटीचा अंत ॥***
***त्या प्रेमाचे 'विश्वप्रेमी' झाले पर्यवसान ।***
***आनंदी आनंद जाहला स्वयेंच मी भगवान ॥***

निरासक्त प्रेम हेच जीवनाचे एकमेव ध्येय असून, त्यासाठी योगक्षेमही आवश्यक आहे, असे स्वामी सांगतात. निराभिमानता अंगी यावी यासाठी स्वामींनी देवाकडे दारिद्र्याचे मागणे मागितले आहे. विचार आणि विकार यांचे साक्षित्वाने अवलोकन करणारे स्वामींचे मन प्रस्तुत ग्रंथातून दिसून येते. त्यांच्या अनुभूतीचे सामर्थ्यही जाणवते. जे जे घडते ते ते परमेश्वरी इच्छेनेच घडते; आणि भक्ताच्या कल्याणासाठीच घडते, ही वृत्ती संपूर्ण काव्यात पहावयास मिळते.

## २) अमृतधारा (लेखन काल : शके १८५७)

इ. स. १९३५ च्या दरम्यान स्वामी स्वरूपानंद जवळ जवळ सहा महिने आजारी होते. या काळात त्यांची 'सोऽहं' साधना सतत चालू होती. ते सतत 'मी' चा शोध घेत होते. हळूहळू अंतर्मुख बनत होते. या साधकावस्थेतील भावविलास प्रकट करणारे काव्य म्हणजे 'अमृतधारा' होय. या ग्रंथाचे स्वरूप स्वतंत्र व उत्स्फूर्त आहे. एकशे बासष्ट साक्यांचा हा ग्रंथ आकाराने लहान असला तरी काव्यगुण आणि आध्यात्मिक अनुभव या दृष्टीने फार महत्त्वाचा आहे. ग्रंथाची रचना सूत्रमय आहे. या ग्रंथात स्वामीजी सामान्याकडून असामान्यत्वाकडे वाटचाल करणारे प्राथमिक अवस्थेतील साधक वाटतात. सत्कवी होऊन सत्यकाव्य निर्माण करण्याची स्वामींची इच्छा, चित्तशुद्धीसाठी व्याकुळ होऊन जगन्मातेची केलेली प्रार्थना, सोऽहं जपावरील नितांत श्रद्धा आणि शेवटी जगन्मातेच्या कृपेने आलेला कृतार्थतेचा अनुभव इत्यादी विषयांचे आविष्करण या ग्रंथात पाहावयास मिळते. संपूर्ण काव्यात भक्ताची आर्तता, मनाची कोमलता, दास्यभाव आणि शरणागती यांचे दर्शन घडते.

या वेळी देव भक्त एकच असल्याचा अनुभव स्वामींना आला. अद्वयं भक्ती हातात आली; आणि जन्म-मरणाची यातायात संपली. काही साक्यातून कला व नीती यांचा संबंध स्पष्ट केला आहे. सज्जनांची सहा लक्षणे सांगितली असून, ती अंगी बाणल्यावर परमात्मा वश होतो

असे जगदंबेची आण वाहून सांगितले आहे.

***सुहास्य-वदन प्रसन्नदर्शन निर्मल अंतःकरण ।***
***मित मधुभाषण शुद्ध मन तथा सदैव सत्याचरण ॥***
***एवं षड्विध सज्जन-लक्षण अंगी बाणता पूर्ण ।***
***होतो वश परमेश वाहतो जगदंबेची आण ॥ (अमृतधारा, सा. १६, १७)***

काव्य आणि व्यवहार यांची सांगड घालून म्हणजे स्वतःच्या कवितेत लिहिल्याप्रमाणे आचरण करणारा असा कवी खरा यशस्वी होय. त्याची कविता जगात कृतार्थ होते. अशी काव्यविषयक आपली भूमिका स्वामींनी प्रस्तुत ग्रंथात स्पष्ट केली आहे. जगाला मुक्त करण्याची, आनंदमय करण्याची प्रतिज्ञाही स्वामींनी बोलून दाखविली आहे.

## ३. भावार्थ गीताः (रचनाकाल, शके १८६६)

प्राचीन काळापासून 'भगवद्‌गीता' हा ग्रंथ अनेक विद्वानांच्या आस्थेचा, श्रद्धेचा आणि अभ्यासाचा विषय बनला आहे. स्वामी स्वरूपानंदांनीही 'भगवद्‌गीते' चा साकीबद्ध मराठी अनुवाद केला, तीच 'भावार्थगीता' होय. संस्कृत भाषा अवगत नसल्यामुळे ज्यांना मूळ गीतेचा आस्वाद घेता येत नाही; आणि ज्ञानेश्वरी हा ग्रंथ जुन्या प्राकृत भाषेमुळे ज्यांना दुर्बोध वाटतो, अशा सर्वसामान्य मराठी वाचक वर्गाला गीताज्ञानाचा लाभ घेता यावा म्हणून स्वामींनी हा ग्रंथ रचला आहे. त्यासाठी प्रचलित भाषेचा वापर केला. त्यामुळे मूळ ग्रंथात प्रवेश करणे सुकर झाले आहे. या ग्रंथात तत्त्वज्ञानातील संकल्पना साध्या-सोप्या शब्दांतून उलगडून दाखविल्या आहेत. प्रचलित भाषेतील व नित्याच्या व्यवहारातील शब्द, लालित्यपूर्ण व ओघवती भाषा, साधी-सोपी रचना, सूत्रमयता, अल्पाक्षर रमणीयता, अर्थबहुलता, आशयघनता हे काव्यगुण या ग्रंथात आढळतात. या संपूर्ण अनुवादावर ज्ञानेश्वरीची दाट छाया पडलेली आहे. 'भावार्थगीता' भगवद्‌गीतेचा विस्तार तर ज्ञानेश्वरीचे सार आहे. या ग्रंथाचे स्वरूप एका बाजूला अनुवादात्मक तर दुसऱ्या बाजूला सुबोध-प्राकृत टीकात्मक झाले आहे. ज्ञानेश्वरी समोर ठेवून गीतेचा केलेला हा भावार्थ होय. प्रासादिकता, उत्स्फूर्तता आणि शब्दांची लयबद्ध मांडणी यांनी 'भावार्थगीते'तील साक्या नटलेल्या दिसतात. उदाः

***जाणे येणे भोग भोगणे प्रकृतिचा चि हा खेळ ।***
***आत्मा केवळ अलिप्त निर्मळ तया न ह्यांचा मेळ ॥***
***उपजे नासे असा दिसे हा मायेस्तव आभास ॥***
***नसे तत्त्वता जन्म-मरण हे अविनाशी आत्म्यास ॥***

भगवद्‌गीतेच्या अंतर्गत असलेला ज्ञानयोग, कर्मयोग आणि भक्तियोग स्वामींनी येथे अत्यंत सुलभ करून सांगितलेला आहे.

## ४. संजीवनी गाथा : (लेखनकाल, शके १८६७)

स्वामी स्वरूपानंदांनी आपल्या अभंगरचनेने मराठी वाङ्मयात मोलाची भर घातली आहे. स्वामींचे अभंग 'श्रीमत् संजीवनी गाथे'मध्ये समाविष्ट केले असून त्यांची संख्या २६१ आहे. 'संजीवनी गाथा' हा स्फुट अभंगांचा संग्रह आहे. या अभंगांतून अध्यात्म, भक्ती यांबरोबरच स्वामींच्या विविध अनुभवांचे प्रतिबिंबही पडलेले आढळते. अभंगांची भाषा साधी, सोपी असून भक्तिभावाने ओथंबलेली आहे. अभंग उत्स्फूर्त असून, त्यामागे अनुभूतीचे पाठबळ आहे. अनुभवाचा ताजेपणा आणि निरतिशय आनंदाचा उत्फुल्लपणा स्वामींच्या अभंगांतून प्रत्ययाला येतो.

'संजीवनी गाथे' तील अभंगांतून स्वामींनी विविध उपयुक्त विषयांवर मार्मिक विवेचन केले आहे. त्यात प्रातःस्मरण, ईश्वर प्रार्थना, सद्‌गुरुस्तवन, संतमाहात्म्य, नामसंकीर्तन, विठ्ठलवर्णन, साधकास व सर्वसामान्य जनतेस मार्गदर्शन, आत्मानुभूती विज्ञान आणि अध्यात्म इत्यादी विषयांचे विवेचन आले आहे. ईश्वरप्राप्तीची तळमळ, अखंड नामस्मरण, सद्‌गुरुंची कृपादृष्टी, संपूर्ण शरणागती आणि शेवटी 'विश्वी विश्वंभर कोंदाटला' असा झालेला साक्षात्कार, या सर्व दिव्यानुभूतींचे वर्णन स्वामींनी अत्यंत तन्मयतेने केले आहे. त्याचबरोबर अंतःशुद्धी, भूतदया, समदृष्टी, परोपकार, सहिष्णुता, विवेकपरता, स्वधर्माचरण इत्यादी दैवी गुणांचा पुरस्कार केला आहे. ज्ञान, कर्म आणि भक्ती यांचे सुबोध विवेचन या अभंगांतून पाहावयास मिळते.

स्वामींच्या वाणीमध्ये मराठी भाषेचे विलक्षण मनोहर व साधे रूप पहावयास मिळते. उदाः

***सेवावा एकांत सुखे वारंवार । जनासंगे फार बोलो नये ॥१॥***
***आणिकांची निंदा नायकावी कानी । पर-द्रव्य मनी आणो नये ॥२॥***
***पर-स्त्रीचे ठायी सदा मातृ-भाव । असो द्यावा ठाव वयेलागी ॥३॥***
***स्वामी म्हणे वश राहावे साधनी । सद्‌भावे लक्षोनी हरिपाय ॥४॥***

स्वामींच्या अभंगांतील अनेक चरणांना सुभाषिताचे स्वरूप प्राप्त झाले आहे. उदा. 'न भंगे ते मौन कदाकाळी', 'हरिरूप नर-नारी', 'विषयी विरक्ती दया सर्वभूती', 'न होती विभक्त, देव आणि भक्त', 'पोटी एक ओठी दुजे । हे तो घातक सहजे', 'ब्रह्म बोलाहूनि वेगळेचि' इत्यादी 'संजीवनी गाथे'तील काही अभंगांतून अत्यंत उच्च दर्जाचा आध्यात्मिक विचार आलेला दिसतो. एक हरिपदच अज, अविनाशी असून, इतर दृश्य विश्व मायिक, आभासात्मक आहे. हा अनुभव स्वामींनी अनेक अभंगांतून व्यक्त केला आहे. भक्त आणि ज्ञानी दोन्ही एकच आहेत. अंतःकरणात आत्मज्ञानाचा उदय होताच अवघा संसार मोक्षमय होतो. अखंडितपणे गोपाळाची भेट झाली असता काम-क्रोधादी विकार संपूर्णपणे नाहीसे होतात. कर्माप्रमाणे फळ प्राप्त होते. फलाशा सोडून आणि कर्तृत्वाचा मद टाकून सर्व कर्मे यथोचित करावीत. त्यामुळे चित्तशुद्धी होते व मोक्षाची प्राप्ती होते. जोपर्यंत ज्ञान प्राप्त होत नाही, तोपर्यंत कर्म हेच परमात्म प्राप्तीचे साधन आहे. अद्वैत भक्तीच्या ठिकाणी देव आणि भक्त असा भेद उरत नाही. विषयांबद्दल विरक्ती, सर्वाभूती दया, हरिपायी एकनिष्ठ भाव, अंतःकरणात नित्य समाधान, मोह-मान याबद्दल अनासक्त वृत्ती, पर नारी माऊली समान असणे, इतरांचे धन विषतुल्य वाटणे, परनिंदा न करणे, असत्य न बोलणे आणि सर्वभूतहित वृत्ती असणे ही संतांची महत्त्वाची लक्षणे स्वामींनी सांगितली आहेत. अशी कितीतरी विचाररत्ने स्वामींच्या 'संजीवनी गाथे'त आढळतात.

## अभंग ज्ञानेश्वरी (लेखनकाल : शके १८७५ ते १८७८)

स्वामी स्वरूपानंद हे ज्ञानदेवांचे पारमार्थिक वारसदार असल्यामुळे सात शतकांपूर्वी ज्ञानदेवांनी आपल्या वाङ्मयाद्वारे सांगितलेला विचार स्वामींनी प्रचलित भाषेमध्ये नव्याने मांडला. ज्ञानदेवांचे अद्वयानंद वैभव सर्वसामान्यांना सहजसुलभ होण्यासाठी स्वामींनी 'श्रीज्ञानेश्वरी', 'अमृतानुभव' व 'चांगदेव पासष्टी' हे तीनही ग्रंथ अभंग छंदात अनुवादित केले. दररोज सुमारे दहा ओव्यांचा अनुवाद स्वामी करीत. अशा प्रकारे हा अनुवाद पूर्ण होण्यास अडीच वर्षे लागली. अनुवादासाठी स्वामींनी श्रीनानामहाराज साखरे यांची 'सार्थ ज्ञानेश्वरी' ही प्रत वापरलेली आहे. ज्ञानेश्वरीच्या मूळ अर्थाला धक्का न लावता हे कार्य केले आहे. यात कोणत्याही प्रकारचा आग्रह अथवा स्वमत प्रतिपादन नाही. स्वामींजी ज्ञानेश्वरीचे अंतरंग अधिकारी आहेत. त्यामुळे त्यांचा अनुवाद अधिक प्रमाणभूत ठरतो. 'अभंग ज्ञानेश्वरी'मुळे ज्ञानेश्वरीचे मोठेपण उणे न होता, ते अधिकच वाढले आहे. 'अभंग ज्ञानेश्वरी' च्या वाचनाने मूळ ज्ञानेश्वरीतील अनेक भावच्छटा व अर्थच्छटा सहज लक्षात येतात. दुर्बोधपणा नाहीसा झाल्यामुळे ज्ञानेश्वरीशी संवाद साधणे सोपे जाते. 'अभंग ज्ञानेश्वरी'वर ज्ञानदेवांच्या शैलीचा फार मोठा प्रभाव आहे. स्वामींनी बऱ्याच ठिकाणी मूळ ओवीतील भावार्थाचे अधिक स्पष्टीकरण केले आहे. आशयाला किंचित कलाटणी दिली आहे. अभिव्यक्तीची पद्धती शक्यतो तीच ठेवलेली आढळते. ज्ञानेश्वरीतील रसाविष्कार 'अभंग ज्ञानेश्वरी'मध्येही आढळतो. काही ठिकाणी तर त्याला उत्कटता प्राप्त झालेली दिसते. 'अभंग ज्ञानेश्वरी'मध्ये सर्वत्रच कमालीचा साधेपणा, सुलभता व प्रसन्नता आढळते. ज्ञानेश्वरीच्या अन्य कोणत्याही अनुवादात इतका सोपेपणा असेल असे वाटत नाही. ज्ञानेश्वरीत पहिल्या अध्यायाच्या प्रारंभी गणेशस्तवनात 'उन्मेषसूक्ष्मेक्षणू' असा शब्द येतो. त्याचा अनुवाद स्वामींनी पुढीलप्रमाणे केला आहे.

ज्ञानरूप भले । पहा सूक्ष्म डोळे । शोभती आगळे । विघ्नेशाचे ॥

ज्ञानेश्वरीतील मंगलाचरणांचा स्वामींनी केलेला अनुवाद कमालीचा सुलभ झाला आहे. भाषेच्या प्राचीनत्वामुळे दुर्बोध वाटणारी ज्ञानेश्वरी आता 'सुगम सोपारी' झाली आहे. ओघवती भाषा आणि माधुर्य हा 'अभंग ज्ञानेश्वरी' चा एक महत्त्वाचा विशेष. उदा. पुढील अभंग चरण पहा.

*होई सावधान । सांडी मूर्खपणा । ऊठ चाप-बाण । सज्ज करी ॥ (अ. ज्ञा. २/२७)* *किंवा*

*जे जे सांगती इंद्रिये । ते ते करिती जे स्वये ॥*
*तरले ते ऐसे वाटे । तरी सर्वथा ते खोटे ॥*
*पार्था, भोगसिंधु पार । नाही झाले ते साचार ॥*
*तीर नावेने गाठावे । तो चि बावळ सुटावे ॥*
*मग चुकला अपाय । तो चि पुनरपि होय ॥ (अ. ज्ञा. २/५८९ ते ५९३).*

मूळ कलाकृतीतील भावार्थ आणि सौंदर्य अनुवादात आणण्यात स्वामी यशस्वी झाले आहेत. ज्ञानदेवांची ओवी आणि त्यासाठी स्वामींनी वापरलेला अभंग हे परस्परांना जवळचे व संवादी आहेत. स्वामींचा अनुवाद हा भावानुवाद आहे. इथे अर्थाशी इमान राखले आहे; आणि भाषेचे रूप सांभाळले आहे.

## अभंग अमृतानुभव : (लेखनकाल, शके १८८२)

भाषेची अडचण ज्ञानेश्वरीतील भाषेपेक्षाही अमृतानुभवामध्ये अधिक जाणवते. ही अडचण दूर व्हावी व अमृतानुभवाचा आस्वाद घेणे सर्वांनाच सुलभ व्हावे, म्हणून त्यातील हृद्‌गत स्वामींनी आधुनिक मराठीत सुलभ, सोपे करून सांगितले आहे. ओवीला अभंगाचे रूप दिले आहे. आवश्यकतेनुसार विस्तार केला आहे. भाषा ओघवती व प्रसादपूर्ण आहे. या अनुवादात स्वामींनी शिव-शक्तींनाच 'प्रकृति-पुरुष' किंवा 'ईश्वर-माया' म्हटले आहे. विद्वान केवळ शब्दच्छल करतात. पण आत्मसाक्षात्काराच्या जवळपासही ते पोहचलेले नसतात. त्यामुळे परमार्थ क्षेत्रातील त्यांचा अधिकार फारच तोकडा पडतो. या पार्श्वभूमीवर स्वामींचा अनुवाद महत्त्वाचा ठरतो. तो मुळातूनच पाहण्यासारखा आहे.

## अभंग चांगदेव पासष्टी (लेखनकाल : शके १८८३)

'चांगदेव पासष्टी' या ज्ञानदेवांच्या छोट्याशा ग्रंथात अद्वैतानुभूतीची अत्युच्च्य अवस्था प्रकट झाली आहे. 'आत्मसाक्षात्कार' हाच चांगदेव पासष्टीचा विषय आहे. आत्मज्ञान झाल्यानंतर जग जगरूपाने शिल्लक राहात नाही. विश्व ही आत्मस्वरूपाची स्फूर्ती आहे. हे सर्व जग म्हणजे संवित्तीचा प्रकाश होय. स्वामींनी आपल्या अनुवादात हाच सिद्धांत सुलभ करून सांगितला आहे. अनुवादाच्या शेवटी स्वामींनी स्वतंत्र सहा अभंग रचले असून त्यातून आपले मनोगत प्रकट केले आहे. तसेच ग्रंथाची फलश्रुतीही सांगितली आहे. चांगदेव पासष्टीचा हा अनुवाद गुरुकृपेने झाला असून, गुरुकृपेने प्राप्त झालेले हे ज्ञान भक्तिभावे जतन करावे लागते. त्यामुळे प्रपंचबंध तुटून जीवाला आत्मरूपी विसावा मिळेल असे स्वामी सांगतात. वरील तीनही ग्रंथांचा अनुवाद प्रचलित भाषेच्या वापरामुळे फारच सुलभ-सोपा झालेला आहे. त्यामुळे ज्ञानदेवांच्या साहित्याला दुरूनच नमस्कार करणारा वाचक या ग्रंथांजवळ आला. तात्पर्य, संत ज्ञानदेवांच्या प्रस्थानत्रयीचा अभंगवृत्तांत अनुवाद करणारे अनुवादक म्हणून स्वामी स्वरूपानंदांचे स्थान मराठी साहित्यात लक्षणीय ठरते.

याशिवाय स्वामींनी बरेच स्फुट लेखनही केले आहे. त्यात प्रामुख्याने पुढील लेखनाचा समावेश होतो. (१) श्रीगीता-तत्त्व-सार (२) सात स्फुट काव्ये (३) स्वरूप-पत्र-मंजूषा (४) स्वामी स्वरूपानंद यांची बोधवचने (५) नवरत्नहार (६) तीन प्रवचने (७) श्रीज्ञानेश्वरी नित्यपाठ (संपादित) इत्यादी स्वामींचे सर्व स्फुट लेखनही साधकांना व संसारिकांना मार्गदर्शक ठरणारे आहे. संत साहित्यातील विचार सामान्यजनांपर्यंत पोहचविण्याचे स्वामींचे कार्य बहुमोल आहे. ते साधक, भाविक आणि जिज्ञासू अशा सर्वांनाच उपयुक्त आहे.

**डॉ. ब. ना. तुरंबेकर**
२५, त्रिमूर्ती, प्रतिराज बंगल्यासमोर, राधानगरी रस्ता,
कोल्हापूर - ४१६०१२.

# 'चांगदेव पासष्टी'

डॉ. कांचन मांडे

संतशिरोमणी ज्ञानेश्वरमहाराजांचा ज्ञानेश्वरी अर्थात् भावार्थ-दीपिका हा सर्वात प्रसिद्ध ग्रंथ. भाष्यकार व भावानुवादकार अशा दोन भूमिकांमधून ज्ञानेश्वरांची भेट या ग्रंथाच्या रूपाने होते. अमृतानुभव किंवा अनुभवामृत हा ज्ञानदेवांचा दुसरा ग्रंथ. ज्यामध्ये ज्ञानदेवांच्या स्वतंत्र प्रज्ञाशक्तीचा आविष्कार दिसतो. तिसरा ग्रंथ म्हणजे चांगदेवपासष्टी. ज्यामध्ये केवळ पासष्ट ओव्यांच्या आधारे चिद्विलासाचा पट ज्ञानदेव उलगडून दाखवतात. या खेरीज ज्ञानदेवांचे नित्यपाठाचे अभंग किंवा विरहिण्या असे वाङ्मय उपलब्ध आहे. पण ज्याला प्रस्थानत्रयी म्हणावे असे वर उल्लेखिलेले तीन ग्रंथच. या तीनही ग्रंथांचा तितक्याच समर्थपणे ओवीबद्ध भावानुवाद केला आहे विसाव्या शतकातील सद्‌गुरुस्वरूप पावसच्या स्वरुपानंद स्वामींनी.

कोकणची भौतिक समृद्धी लाभलेल्या स्वामींचे आत्मिक ऐश्वर्यही त्याच तोलामोलाचे आहे. संस्कृत भाषेमध्ये असल्याने सामान्यजनांना काहीशी कठीण वाटणारी भगवद्‌गीता ज्ञानेश्वरांनी भावार्थ दीपिका या नावाने ओवीबद्ध मराठीमध्ये आणली. पण आज विसाव्या शतकामध्ये ज्ञानदेवांची मराठीसुद्धा समजायला जड जाते; म्हणून स्वरुपानंदांनी आजच्या मराठी भाषेमध्ये तिचा अनुवाद केला, पण तोही ओवीबद्धच. अर्थात् भावार्थ गीता म्हणून स्वामींचा स्वतंत्र गद्यात्मक मराठी ग्रंथ आहेच. ओवीमध्ये-पद्यामध्ये रचना करावीशी वाटणे, ही त्या व्यक्तीच्या कोमलतेची अभिव्यक्ती असावी. ज्ञानदेव काय किंवा स्वामी स्वरुपानंद काय हे त्या सच्चिद्‌घन, आनंदस्वरूप परमात्म्याचे मूर्तिमंत 'अवतरण'! कारुण्याची परमावधी ! सहजच त्यांच्याकडून होणार तो करुणेचा वर्षाव ! कृपेची बरसात ! मग त्यासाठी पद्यओवी हा अभिव्यक्तीचा आकार योग्य नव्हे का ? ज्ञानदेवांच्या अनुभवामृताचाही ओवीबद्ध अनुवाद स्वामींनी केला व चांगदेवपासष्टी एकशे तेहतीस ओव्यांच्या आधारे स्वामींनी सामान्य लोकांच्या आकलनासाठी अनुवादित केली.

चांगदेवपासष्टी हा ग्रंथ ज्यांच्या नावाने लिहिला गेला ते चांगदेव फार मोठे सिद्ध पुरुष होते. चौदा विद्या व चौसष्ट कला त्यांनी आत्मसात केल्या होत्या. अत्यंत अवघड अशा हठ योगामध्ये त्यांचा अधिकार उच्च प्रतीचा होता. स्वाभाविक नाना सिद्धी त्यांना सहजसाध्य होत्या. त्यामुळेच काळावर विजय मिळवून चौदाशे वर्षांचे आयुष्य त्यांनी उपभोगले होते. तापी नदीच्या तीरावर असलेल्या आश्रमामध्ये चांगदेवांची रोज पूजा-आरती होत असे. एके दिवशी त्या ठिकाणी पैठणहून एक पांथस्थ आला व त्याने ज्ञानदेवांनी रेड्यामुखी वेद वदविल्याची हकीकत चांगदेवांना सांगितली. ते सारे ऐकून व स्वतःच्या तपःसामर्थ्याने त्याची सत्यता पाहून चांगदेवांनी ज्ञानेश्वरांकडे जायचे ठरविले. पण इतर शिष्यांनी, 'या घटनेची खात्री करून घ्यावी', असे सांगितल्याने प्रथम पैठणला शिष्यांकरवी पत्र पाठवण्यात आले. पैठणच्या ब्राह्मणांनी ही सत्य घटना असल्याचे सांगितले. मग चांगदेवांनी एका वृद्ध तपस्व्याबरोबर ज्ञानदेवांना पत्र पाठवायचे ठरवले. परंतु पत्राचा मायना काय लिहावा याविषयीच चांगदेव साशंक झाले. कारण 'चिरंजीव' लिहावे तर ज्ञानदेव साक्षात् परमेश्वराचा अवतार व 'नमस्कार' लिहावे तर वयाच्या दृष्टीने चांगदेवांच्या तुलनेत ज्ञानदेव म्हणजे लहान पोरच. त्यामुळे कोरेच पत्र ज्ञानदेवांना पाठवण्यात आले. या कोऱ्या पत्राला उत्तर देण्याच्या मिषाने चांगदेव पासष्टीसारखा अप्रतिम ग्रंथ अस्तित्वात आला.

एका परीने, तत्त्वज्ञानाच्या दृष्टिकोनातून ही कथेची चौकट अनावश्यक असली तरी त्या कथेमुळे चांगदेव व ज्ञानेश्वर या दोन्ही व्यक्तिमत्त्वांचे आकलन होण्याच्या दृष्टीने कथेचे मूल्य निश्चितच लक्षणीय आहे. कारण सामान्यतः जेव्हा जेव्हा चांगदेवांचा उल्लेख केला जातो, तेव्हा तेव्हा चांगदेव म्हणजे काही सिद्धी प्राप्त झालेली व त्या सिद्धीच्या बळावर अहंकार बनलेली व्यक्ती असे काहीसे काळ्या रंगात तिचे चित्रण केले जाते. पण त्याचबरोबर ज्ञानदेव हे आपल्यापेक्षा सर्वार्थाने मोठे आहेत, हे जाणल्यावर चांगदेवांनी स्वतःची केली जात असलेली पूजा-अर्चा थांबवून ते ज्ञानदेवांकडे जाण्यास निघाले. ही गोष्ट लक्षात घेण्याजोगी आहे. एका अर्थाने चांगदेवांचा अहंकार हा त्यांच्या विद्याध्ययनामुळे व सिद्धीमुळे आलेला सार्थ अहंकार होता असे म्हणता येईल. पण त्याचबरोबर आपल्यापेक्षाही श्रेष्ठ कोणी आहे हे कळण्याची क्षमताही त्यांच्या ठिकाणी होती, जी फार मोठी जमेची बाजू आहे, ज्यामुळे ज्ञानदेवांना भेटल्यानंतर अहंकाराचा पापुद्रा गळून जाण्यास मदत झाली व मुक्ताईच्या रूपाने गुरुप्रसाद लाभताच चांगदेव सिद्धांचे सिद्ध झाले-मुक्त झाले.

ज्ञानदेव तर साक्षात् ज्ञानस्वरूप. त्यामुळे शिष्याच्या अहंकाराचा थोडाही स्पर्श त्यांना झालाच नाही. ही कथा ज्ञानदेवांच्या गुरुस्वरूपाचा एक निराळाच पैलू दाखवते. सामान्य लोकांना समजण्यासाठी ज्ञानेश्वरी लिहिली असे म्हटले जाते. पण ज्ञानेश्वरी-भावार्थदीपिकेचा गर्भितार्थ पाहू जाता त्याचा अधिकारीही ज्ञानदेवांनी म्हटल्याप्रमाणे 'अर्जुनाच्या पंक्तीला बसू शकणारा' असला पाहिजे, हे लक्षात येते. अमृतानुभव म्हणजे ज्ञानदेवांची आत्मप्रचीतीच आहे. त्यामध्ये आलेली,

'सच्चिदानंदपदत्रयविवरण', 'शब्दखंडन', 'ज्ञानखंडन', 'अज्ञानखंडन' ही विषयांची नावे बघितली तरी त्याची महनीयता जाणवते. या दोन्हीहून काहीसा निराळा, 'गुरु'चे साक्षात् निःश्वसित असणारा ग्रंथ राहतो 'चांगदेवपासष्टी'. चांगदेवांच्या अगोदरही पैठणच्या ब्राह्मणांनी ज्ञानदेवांचा कमी अपमान केला नव्हता. तरीही त्याचा कोणताच संदर्भ ज्ञानेश्वरी किंवा अमृतानुभवामध्ये येत नाही. कारण खरे म्हणजे तो अपमान 'ज्ञानदेवां'पर्यंत पोचलाच नाही. व्यावहारिकतेचे कवच ज्ञानदेवांना कधी बाधलेच नाही व म्हणूनच चांगदेवांचा अहंकार हा सामान्यांच्या दृष्टीने अहंकार होता, ज्ञानदेवांना त्याचा सल तर नाहीच, पण स्पर्शही झाला नसणार. त्यामुळेच ते त्याला सखा म्हणतात. संतांनी सख्य जोडलं ते फक्त ईश्वराशी. 'देयाच्या सख्यत्वासाठी पडल्या जिवलगांसी तुटी । सर्व अर्पावे शेवटी । प्राण तोही वेचावा ।।' (दासबोध ४.८.८) असे संतांनी प्रांजळपणे सांगितले. तेच संतांचे संत ज्ञानदेव जेव्हा चांगदेवांना 'सखया' (ओवी - ४२) म्हणतात तेव्हा त्यांना चांगदेव म्हणजे दुसरे-तिसरे कोणी नसून ईश्वराचे रूपच वाटले नसतील का ? ईश्वररूपाशी ज्ञानाच्या ईश्वराने केलेला हा संवाद अद्वैताच्या, चिद्विलासाच्या वाटेने न जाता तरच नवल ! श्री. प्र. सी. सुबंध यांनी आपल्या 'पासष्टी-प्रदीप' या ग्रंथामध्ये या विषयी मार्मिक विधान केले आहे. ते म्हणतात 'पासष्टी' या शब्दातून चौसष्ट विद्यांची पूर्तता करणारी पासष्टावी अध्यात्म विद्या सूचित होते' (पृ. ६).

अध्यात्मविद्या म्हटल्यावर त्यामध्ये जीव-शिव, आत्मा-ब्रह्म हा विचार असणार हे तर उघडच आहे. पण चांगदेवपासष्टीचा विशेष म्हणजे अद्वैताचा हा विचार मिथ्यात्वाच्या वाटेने जात नाही. म्हणजे असे की अद्वैत शब्द उच्चारताच आठवण होते ती श्रीमद्‌आद्य शंकराचार्यांची. त्यांनी ब्रह्म हेच एकमेव सत्य आहे असे सांगून अद्वैताची स्थापना केली. पण त्याच वेळी एक प्रश्न निर्माण झाला की ब्रह्म हेच एकमेव सत्य असेल तर समोर दिसणाऱ्या जगाला काय म्हणावे ? यामध्ये खरी अडचण येते ती अशी की सामान्य माणसाला ब्रह्म कळतच नाही, ते खरे मानायचे व सामान्य माणसाला सत्य वाटणाऱ्या जगाला काय स्थान द्यायचे ? तर आचार्य म्हणतात जग मिथ्या आहे. अगदी स्थूल मानाने मिथ्या शब्दाचा अर्थ समजून घ्यायचा तर असे म्हणता येईल की, जग आत्ता आहे. पण सातत्याने असेल असे नाही, म्हणून दिसणारे जग ही माणसाला होणारी भ्रान्ती आहे. याच्या उलट ज्ञानदेव वर्णन करतात की ब्रह्म सत्य आहे याविषयी दुमत नाही, पण जगसुद्धा ब्रह्मापेक्षा वेगळे काहीच नाही, या अर्थाने ते नाही. परंतु ते जे दिसते ते ब्रह्माचा-चित्‌चा-चैतन्याचा विलास म्हणूनच दिसते. (चांगदेव पासष्टी, ओवी - १४). ज्ञानदेव आद्य शंकराचार्यांपेक्षा सामान्य माणसाच्या दृष्टीने अधिक सोपेपणाने जगाची उपपत्ती देतात. पुन्हा ज्ञानदेवांची भाषा मराठी असूनही आज समजत नाही. तेव्हा स्वामी स्वरुपानंदांसारखे संत पुन्हा एकदा आणखी सोप्या भाषेमध्ये त्याचा अनुवाद करतात.

स्वरूपानंदांनी केलेला अनुवाद हा भावानुवाद आहे, असे पहिल्या ओवीपासून जाणवते. ज्ञानदेव पहिल्या ओवीमध्येच स्वस्ति श्रीवटेशु- 'चांगदेवा, तुझे कल्याण असो' असे म्हणून सरळ अद्वैताला सुरुवात करतात की जो परमात्मा गुप्त राहून जगाचा आभास दाखवतो व स्वतः प्रगट झाला की जगताचा आभास नाहीसा होतो. या ठिकाणी ज्ञानदेवांनी श्रोत्यांना अद्वैताची जाणीव आहे असे गृहीत धरल्याप्रमाणे वाटते. तर स्वामी प्रथम चांगदेव आत्मस्वरूप आहे याचे निवेदन करतात व नंतर ते आत्मरूप जेव्हा लपते तेव्हा विश्वाचा आभास होतो व ते प्रगट झाल्यावर विश्व मावळते अशा तऱ्हेची रचना करतात. अर्थातच ज्ञानदेवांच्या एका ओवीच्या ठिकाणी स्वामींच्या तीन ओव्या येतात. पासष्टीच्या सुरुवातीला येणारा 'स्वस्ति' शब्द मंगलसूचक आहे. ज्ञानदेवांचा तो शब्द स्वरुपानंदही तसाच ठेवतात. दुसऱ्या ओवीमध्ये ज्ञानेश्वर आत्मतत्त्वाचे निर्गुणत्व सांगतात. ही रचना थोडी संदिग्ध वाटते. एका ओवीमध्ये ज्ञानदेव चार गोष्टींचा निर्देश करतात, की आत्मतत्त्व दिसते तेव्हा जग नष्ट होते. आत्मतत्त्व लपते तेव्हा जग दिसू लागते. वास्तविक आत्मतत्त्व प्रगटही होत नाही किंवा लपतही नाही, तर प्रगट होणे, लपणे यापैकी कोणतेच गुण त्याला स्पर्श करीत नाहीत. ते फक्त 'असते'. यासाठी स्वामींनी चार स्वतंत्र ओव्या रचून अतिशय सोप्या रीतीने हा सर्व अर्थ सांगितला आहे. तिसऱ्या ओवीमध्ये काही असण्यावर किंवा नसण्यावर आत्मसत्ता अवलंबून नाही, ती स्वयंसिद्ध आहे, असे ज्ञानदेव अगदी स्पष्टपणे सांगतात. ज्याचा केवळ दोन ओव्यांमध्ये स्वामींनी अनुवाद केला आहे. यानंतरच्या चार ओव्यांमध्ये ज्ञानदेव त्यांच्या शैलीनुसार अनुक्रमे सोने व दागिने, पाणी व तरंग, पृथ्वी व धुलिकण, चंद्र व त्याच्या कला, अग्नी व दीप असे दृष्टांत देतात व द्रष्टा-दृश्य व्यवहार अविद्येने संभवतो असा सिद्धांत मांडतात. स्वरूपानंद या प्रत्येक दृष्टांताच्या जोडीला आत्मवस्तुविषयक एक-एक सिद्धांत सांगतात. ते म्हणतात की, सोन्याच्या बाबतीत सुवर्णत्व न मोडताच दागिने केले जातात, त्याप्रमाणे आत्मतत्त्वाचे अविनाशित्व भंग न पावताच ते जगद्रूपाला येते. तरंगाचे वस्त्र दूर न करताही पाणी जसे पाणी-स्वरूप असते, तसे हे आत्मस्वरूप जगासहच असते. धुळीचे कण उठले म्हणून त्यांचे पार्थिवत्व दूर होते का ? त्याप्रमाणे विश्वाच्या स्फुरणाच्या रूपाने आत्मतत्त्वच प्रगट होते. चंद्र सोळा कलांनी कधी झाकून जातो का ? किंवा अग्नी दीपाच्या रूपाने निराळा भासतो का ? आणि मग ज्ञानदेवांप्रमाणेच स्वामी निरूपण करतात की अविद्या हीच दृश्याभासाला कारण होते. ज्ञानदेव अविद्या शब्द वापरतात, पण त्याचे कोणतेही स्पष्टीकरण देत नाहीत. कदाचित अविद्या शब्द व त्याचा अर्थ श्रोत्यांना परिचित असेल असे ते गृहीत धरत असावेत. पण स्वामी लिहितात, 'म्हणोनी अविद्या । वस्तुतः जी नाही ।' अविद्या शब्दाचा अर्थच मुळी 'जी नाही ती' तो अर्थ स्पष्ट करून स्वामी सांगतात की ती जगाला निमित्त होते.

यानंतर साधारणपणे आठव्या ओवीपासून अठ्ठाविसाव्या ओवीपर्यंत ज्ञानदेवांनी दृग्-दृश्य विचार मांडला आहे. दृग् म्हणजे बघणारा, एखादी वस्तू म्हणजे दृश्य व त्या दृश्याचे, त्या दृग् म्हणजे द्रष्ट्याला होणारे ते दर्शन अशी त्रिपुटी वेदांतामध्ये फार प्रभावीपणे येते. ही त्रिपुटी नाहीशी होणे म्हणजे अद्वैताची प्राप्ती असा सिद्धांत मांडला जातो. त्या साऱ्या ओव्यांचा शब्दशः अर्थ करण्याची आवश्यकता नाही. पण ज्या ओव्यांचे स्पष्टीकरण स्वामी अधिक सुलभ व सुंदर रीतीने करतात, त्यांचा विचार करू.

ज्ञानदेवांच्या आठव्या ओवीच्या स्पष्टीकरणार्थ स्वामींचे अविद्येविषयीचे विवेचन वर आलेच आहे. पण त्याशिवाय आणखी एका ओवीच्या साहाय्याने ते म्हणतात की, ती अविद्या दृश्य-द्रष्ट्यादी त्रिपुटी दाखवते, परंतु आत्मस्थिती-आत्मतत्त्व मात्र जसे आहे तसे राहते. पुन्हा ज्ञानदेव वस्त्र व सूत, घट व मृत्तिका हे दृष्टांत एकाच ओवीमध्ये देतात. स्वामी अधिक सूक्ष्मतेने तो संबंध स्पष्ट करतात. ज्ञानदेव सांगतात की, वस्त्राला लुगडे असे नाव दिले तरी 'येन्हवीं सूतचि उघडे ।' - खरे तर ते सूतच आहे. स्वामी येथे एक शब्द वापरतात, जो फार महत्त्वाचा आहे, तो म्हणजे 'ओतप्रोत' - उभे व आडवे धागे मिळून वस्त्र होते ही संकल्पना ते एका शब्दांतून मांडतात. 'उघडे' शब्दाचे इतके चांगले व नेमके स्पष्टीकरण क्वचितच आढळेल. तेराव्या ओवीमध्ये ज्ञानदेव, भिंत व त्यावर असणाऱ्या चित्ताचा दृष्टांत देतात व ती संवित्ति - ते आत्मतत्त्व जगदाकाराने प्रकाशत असल्याचे सांगतात. स्वामी पुन्हा थोडा अधिक सखोल विचार मांडतात. ते म्हणतात की, भिंतीवर जसे चित्र किंवा चित्रामध्ये जशी भिंत, त्याप्रमाणे ते आत्मतत्त्व जगद्रूपाने अंतर्बाह्य व्यापून राहिले आहे. पुढच्या ओवीमध्ये ज्ञानदेव गुळाचा व गोडीचा दृष्टांत देतात, की ती गोडी गुळाची ढेप केली किंवा न केली तरीही अनुभवाला येते, त्याप्रमाणे जग असले किंवा नसले तरी आत्मसत्ता तशीच राहते. स्वरुपानंद याचा अनुवाद असा करतात की, गुळाला ढेपेचा आकार दिला नाही तरी त्यामध्ये गोडी कोंदून राहते, त्याप्रमाणे जगाच्या ठिकाणी जग नसले तरी ती चिद्वस्तू-आत्मसत्ता साङ्ग - सर्व अवयवांसह परिपूर्णतेने प्रकाशते.

अठराव्या ओवीमध्ये आत्मतत्त्वच दृग्-दृश्यादी व्यवहार निर्माण करते असे ज्ञानदेव सांगतात. त्याचा अनुवाद करताना स्वामी जे शब्द वापरतात ते इतके चपखल आहेत की त्याचा अनुवाद करणेही कठीण आहे. स्वामींचे शब्द आहेत - 'तैसा जगद्रूपे । ठायीं च स्फुरोन ।' बाकीचा अर्थ सरळ आहे की तो आपलेच दर्शन घेतो तेव्हा दृग्-दृश्यादी व्यवहार संभवतो. यातील 'ठायी च स्फुरोन' हे शब्द नेमका अर्थ स्पष्ट करतात. त्या आत्मतत्त्वाचे स्वयंभूत्व, त्याचे स्फुरण व त्यातून निर्माण होणारा व्यवहार या साऱ्या कल्पना केवळ दोन शब्दांतून स्वामी मांडतात. कारण ज्ञानदेवांप्रमाणे हा सारा त्यांच्याही अनुभूतीचा विषय आहे.

या दृग्-दृश्य विचाराचा समारोप करताना एकोणतिसाव्या ओवीमध्ये ज्ञानदेव म्हणतात की, वाद्याशिवाय ध्वनी किंवा लाकडाशिवाय अग्नी असतो. त्याप्रमाणे दृग्-दृश्यादी विशेष नष्ट झाले तरी आत्मतत्त्व असतेच. स्वरुपानंद या विशेष शब्दाऐवजी 'भासाभास' शब्द योजतात, ज्यामुळे एकाच वेळी दृग्-दृश्यादिही सूचित होते. कारण दृग्-दृश्य या साऱ्या कल्पना एक प्रकारे आभासच आहेत व आभास असल्यामुळे अविद्यानिर्मित म्हणून सान्त, हा सारा भाव त्यातून सूचित होतो. मग उरते ते केवळ आत्मतत्त्व. हा सिद्धांत आपोआप पुढे येतो. जवळपास चाळिसाव्या ओवीपर्यंत या शाश्वत केवळ आत्मतत्त्वाचा विचार येतो. चांगदेव व ज्ञानदेव वस्तुतः एकच असल्याचा निर्वाळा ज्ञानदेव देतात. या सर्वांचा सुगम अनुवाद स्वामींनी केला आहे. फक्त मुख व आरसा यांचा जो दृष्टांत ज्ञानदेव चाळिसाव्या ओवीमध्ये देतात त्याचा उपयोग स्वामींनी एकोणचाळिसाव्या ओवीच्या स्पष्टीकरणासाठी केलेला दिसतो. ज्ञानदेव व चांगदेव यांच्या ऐक्याविषयीचे विवेचन असल्याने अर्थाच्या दृष्टीने फार गैरसोय होत नाही. पण ज्ञानदेवांची चाळिसावी ओवी वाचताना येणारा दृष्टांत स्वामींच्या अनुवादामध्ये एकोणचाळिसाव्या ओवीप्रसंगी का, असा प्रश्न पडतो. अनुवादाच्या ओघामध्ये ते झाले असणे शक्य आहे. अथवा, शब्दाने स्वतःचा शब्द ऐकावा, गोडीने स्वतःची गोडी चाखावी, उजेडाने स्वतःचा उजेड बघावा असे सांगत स्थूलाकडून सूक्ष्माकडे जात असताना, या सर्व दृष्टांतांबरोबर मुखाला बघण्यासाठी आरसा म्हणून मुख हेच असावे असे निखळ अद्वैताचे प्रतिपादन करण्यासाठी स्वामींना ज्ञानदेवांच्या चाळिसाव्या ओवीतील दृष्टांत अगोदर घ्यावासा वाटला असेल.

बेचाळिसाव्या ओवीमध्ये आपल्या दोघांच्या भेटीने अद्वैत मोडेल की काय म्हणून मी शंकाकुल झालो आहे, असे वर्णन ज्ञानदेव करतात, तर स्वामी 'न जाणो शिवेल । मना द्वैतच्छाया । म्हणोनी भेटाया । धजें ना मी ॥' असे स्वच्छ सांगतात. पुढच्या त्रेचाळीसाव्या ओवीमध्ये ज्ञानदेव असाच आशय व्यक्त करतात की तुझी भेट घ्यावीशी वाटते. त्यामुळे मनामध्ये रूपाचा विकार निर्माण होतो व मग तुझ्या-माझ्या स्वरूप भेटीमध्ये काही घोटाळा होईल असे वाटते. स्वामी इथे स्पष्टपणे सांगतात की, तुझी भेट घ्यावेसे मनाला वाटले तर अद्वैतामध्ये होणारी नित्यभेट उपेक्षिली जाईल असे वाटते. या ठिकाणी आठवण होते ती गौडपादाचार्य व आद्य शंकराचार्यांची. गौडपादाचार्यांनी माण्डूक्य उपनिषदावरील कारिकांमध्ये ज्या गोष्टींचे सूचन केले, त्यांचे विवेचन आद्य शंकराचार्यांच्या ग्रंथांमध्ये स्पष्टपणे सापडते. त्याप्रमाणे चांगदेवांच्या प्रत्यक्ष भेटीमुळे अद्वैत दुरावेल की काय अशी शंका ज्ञानदेवांनी व्यक्त केली, त्याचे अगदी नेमकेपणाने निर्वचन स्वामींनी आपल्या अनुवादामध्ये केलेले दिसते. या दोन ओव्यांमधून ज्ञानदेव व चांगदेव यांच्यावरही वेगळाच प्रकाश पडू शकतो. जणू काही अद्वैत खंडित होईल या भीतीने ज्ञानदेवांनीच ही भेट नाकारली, असा अर्थ यातून सूचित होतो. वास्तविक गुरु व शिष्य ज्ञानदेव व चांगदेव एकाच पातळीवर आहेत. उपाधी आहे ती शिष्याच्या अहंकाराची. पण हा दोष शिष्यावर न ठेवता गुरु एका परीने स्वतःकडे तो दोष घेतात, की तुला भेटलो तर आपले अद्वैत बिघडेल - द्वैतामध्ये यावे लागेल अशी भीती वाटते.

पंचेचाळीसाव्या ओवीपासून ज्ञानदेवांची अद्वैताची अनुभूती अधिक सघन होते. कोणत्याही कारणाने मी-तू हे द्वैत शिल्लक राहतच नाही. किंबहुना, मी-तू विरहित तुझी-माझी स्वयंसिद्ध भेट अखंडपणे होतेच असे ज्ञानदेव म्हणतात. या अद्वैताची सिद्धी करताना अठ्ठावन्नाव्या ओवीमध्ये ज्ञानदेव सांगतात की, प्रलयाच्या वेळी सर्वत्र पाणीच पाणी होते. ते पाणी आपला उगमही नाहीसा करते. त्याप्रमाणे तू करावेस, म्हणजे द्वैताचा निरास करावा. पण स्वरुपानंद मात्र हा अर्थ अधिक सूक्ष्मतेने सांगतात. ते म्हणतात की 'प्रपंचासहित । अविद्या गिळोन । तू हि सच्चिद्घन । होईं तैसा ॥' अद्वैताच्या सिद्धांतानुसार केवळ कार्याचा नाश करून भागत नाही, तर कार्यासह कारणाचा नाश करावा, तेव्हाच अद्वैताची सिद्धी होते. 'प्रपंचासह अविद्या गिळणे' यातून हा अर्थ स्वामींनी किती समर्पकपणे दाखवला आहे ते लक्षात येईल.

त्रेसष्टाव्या ओवीपासून उपसंहार सुरू होतो. ज्ञानदेव गुरुस्वरूप

निवृत्तिनाथांचे ऋण मान्य करतात व सांगतात की चांगदेवा, तुझ्या निमित्ताने मला रसाळ स्वानुभवाचे खाद्य दिले. स्वामी 'स्वानुभव' ऐवजी 'स्वानंद' शब्द योजतात व त्या खाद्याचा रसाळपणा अधिकच वाढवतात. चौसष्टाव्या ओवीमध्ये ज्ञानदेव त्या आत्मतत्त्वाची अनिर्वचनीयता मांडतात. स्वामी मात्र ते आत्मतत्त्व सच्चिद्‌घन, आनंदनिधान व परिपूर्ण आहे असे म्हणून सकारात्मक वर्णन करतात. ओवीच्या अखेरीला ज्ञानदेव 'तू तसे व्हावे', असे सांगतात. इथे पुन्हा एकदा स्वामी, ज्ञानदेवांनी सूचित केलेला अर्थ स्पष्टपणे उलगडून दाखवतात व म्हणतात की 'आपणही तैसे । व्हावे परिपूर्ण । तद्रूप होवोन । सोऽहं भावे ।।' संपूर्ण चांगदेवपासष्टीमध्ये सोऽहंचा साक्षात् उल्लेख नाही, पण ज्ञानदेवांना तो अभिप्रेतच नव्हता असे मात्र म्हणता येणार नाही. स्वामींनी ते नेमके जाणले व 'सोऽहं'चे विधान केले. शेवटच्या ओवीमध्ये ज्ञानदेव सांगतात की, शब्दातीत असलेले हे सारे मी बोललो. स्वामी पुन्हा एकदा पुस्ती जोडतात, हे शब्दातीत सारे बोलले ते निवृत्तींचे ज्ञानदेव. काहीशी सहजपणे केलेली ही रचना वाटेल, पण खरे पाहता शिष्याचे बोलणे हे गुरुचेच असते. वास्तविक गुरु व शिष्य हे दोन असतच नाहीत. हे गुरु-शिष्यांचे अद्वैत स्वामींनी अगदी सहजतेने मांडले आहे. कारण त्यांच्या स्वतःच्या बाबतीतही तसेच आहे. म्हणून चांगदेवपासष्टीवर एकशेतेहेतीस ओव्यांचा भावानुवाद लिहिल्यानंतर स्वामी आणखी सहा स्वतंत्र ओव्या लिहितात. ज्यांना एकपासून स्वतंत्र क्रमांक दिले आहेत. त्यामध्ये हा अनुवाद गुरुकृपेने घडला असल्याचे ते नमुद करतात. इतकेच नव्हे तर, गुरुकृपेने मिळालेले हे ज्ञान भक्तीने जतन करावे, त्याचे चिंतन करावे. त्यामुळे प्रपंचाचे बंध तुटून आत्मरूपाचे अमाप सुख भोगून 'सुखरूप' व्हावें अशी कामनाही व्यक्त करतात.

वास्तविक चांगदेव पासष्टीचा अनुवाद झाल्यावर स्वगुरु कृपेचे महत्त्व व त्यातून सर्व जनांना 'सुख' लाभावे ही इच्छा केवळ स्वामींसारखे संतच करू शकतात. अशा प्रकारे निखळ अद्वैतपर अर्थ सांगितल्यावर हा अर्थ ज्यांच्यासाठी सांगितला त्यांच्यासाठी अद्वैताकडे जाणारा मार्ग सुलभरीतीने सांगून ज्ञानदेवांशी असलेले आपले अद्वैतच जणू स्वामींनी सूचित केले आहे.

**डॉ. कांचन मांडे,**
जे-१८, श्रीशंकर नगरी, वनाझशेजारी, पौड रस्ता, पुणे २९.



# स्वामी स्वरुपानंद संपादित 'ज्ञानेश्वरी नित्यपाठ'


**डॉ. मुकुंद रघुनाथ दातार**

*बी.ए. (मराठी), एम.ए. (मराठी), एम.ए. (संस्कृत), पीएच.डी. विषय 'संत एकनाथांची काव्यसृष्टी एक विषय' वारणा महाविद्यालयात ३४ वर्षे मराठीचे प्राध्यापक. मराठी विभाग प्रमुख. पीएच.डी. मार्गदर्शक. शिवाजी विद्यापीठ प्रपाठक. संत साहित्य विषयक लेखन, भाव कविता प्रसिद्ध. आकाशवाणीवरून चिंतने व भाषणे प्रसारीत. महाराष्ट्रात वाङ्मयीन व सांस्कृतिक विषयांवर व्याख्याने. मातृमंदिर विश्वस्त संस्था (ज्ञान प्रबोधिनी), पुणे. संतसाहित्य पुरस्कार १९९९. वारणा परिसरातील शैक्षणिक, सांस्कृतिक व ग्रंथालय कार्यात सहभाग. संत साहित्यावर ५ पुस्तके प्रकाशित.*


## ज्ञानदेव आणि स्वामीजी

श्रीमत् स्वामी स्वरुपानंदांचे आराध्य दैवत आहेत श्रीज्ञानदेव. स्वामीजींच्या साऱ्या चिंतनसृष्टीचे प्रेरणास्थान, काव्यसंपदेचे बलस्थान आणि कार्यकर्तृत्वाचे मर्मस्थान म्हणजे ज्ञानदेव. ज्ञानदेव आणि स्वामीजी यांच्या विचारविश्वात आणि सत्कार्यवैभवात बिंबप्रतिबिंबभाव आहे. सर्वसामान्य लोकांबद्दलच्या, अपार करुणेने उंचबळलेली, ही 'जवळीकीची सरोवरे' आहेत किंवा जणू एकमेकांसमोर अवतरलेले हे डोळस आरसे आहेत. श्रीज्ञानेश्वर हे मराठी संतमंडळाचे मानबिंदू आणि उदारमतवादी मऱ्हाटी संस्कृतीचे कुलपुरुष आहेत. त्यांच्या ज्ञानेश्वरीने, गीतार्थाच्या सहाय्याने, अवघे विश्व भरून टाकले आणि या जगाला आनंदाचे आवारु बनविले. 'जे जे भेटे भूत । ते ते मानिजे भगवंत ।' हाच ज्ञानदेवांनी सांगितलेला भक्तियोग होता. भगवंताच्या मुखाने ज्ञानदेवांनी सांगितले की, 'म्हणौनि कुळजातिवर्ण । हे आघवेचि गा अकारण । तेथ अर्जुना माझेपण । सार्थक एक ।।' तसेच ज्ञानी भक्ताची भूमिका व्यक्त करताना ते म्हणाले - 'हे विश्वचि माझे घर । ऐसी मति जेयाची स्थिर। किंबहुना घराचर । आपण जाला ।।' स्वामीजींनीही विश्वास व्यक्त केला की - 'नरनारी - हरी - रूप दिसो बाहेर अंतरी । 'रामकृष्ण हरि' मंत्र उच्चारो मम वैखरी ।।' स्वामीजींचा संदेशच होता की - 'प्रत्येकाने आपल्या मूळच्या सच्चिदानंद स्वरूपाची जाणीव ठेवून सोऽहं भावाने, सर्व प्राप्त कर्तव्ये, उत्साहाने अनासक्त वृत्तीने आणि ईशपूजन या भावनेने करावीत.' त्यांनी वर प्रार्थनाच केली की, 'उदारा जगदाधारा देई मज असा वर । स्व-स्वरुपानुसंधानी रमो चित्त निरंतर ।।' ज्ञानदेव आणि स्वामीजी या दोघांची विश्वरूप देवाच्या भक्तिसंबंधीची, एकच भावना होती आणि ती म्हणजे 'तेया सर्वात्मका ईश्वरा । स्वकर्मकुसुमांची वीरा । पूजा केली होय अपारा । तोषालागीं ।।'

## सार-स्तोत्रांचे त्रिदल

श्रीमत् स्वामी स्वरूपानंदांनी स्वतः संपादित केलेले 'श्रीज्ञानेश्वरी नित्यपाठ' हे पुस्तक अक्षरशः सहस्त्रावधी भक्त-भागवतांच्या हाती दिले. हे 'श्रीभावार्थदीपिका सार-स्तोत्र' त्यांचे स्वतःचे आवडते होते आणि तोच माऊली प्रसाद, त्यांनी हजारोंच्या हाती अगत्यपूर्वक दिला. या स्तोत्राचा नित्यपाठ व्हावा, या निवडक ओव्यांचा अभ्यास व्हावा, चिंतन व्हावे, पठण व्हावे, अशीच त्यांची इच्छा होती. स्वामी स्वरुपानंदांच्या भावानुवादस्वरूपी साहित्यसृष्टीत 'ज्ञानेश्वरी नित्यपाठाचे' स्थान 'मर्मबंधीचीठेव' किंवा 'वटवृक्षाचे मूल बीज' या स्वरूपाचे वाटते. स्वामीजींनी याच नित्यपाठाचा, साकी वृत्तातील अनुवाद 'गीतातत्त्व सार-स्तोत्र' या नावाने प्रसिद्ध केला. तसेच 'श्रीमत् अभंग ज्ञानेश्वरी-सार-स्तोत्र' असा अभंगात्मक अनुवादही प्रकाशित केला. हे तिन्ही ग्रंथ म्हणजे श्रीज्ञानदेवांच्या हृद्गताचे त्रिदल आहे, बिल्वदल आहे आणि त्यातही मूलस्वरूपी ग्रंथ 'ज्ञानेश्वरी नित्यपाठ' हा आहे. स्वामीजींचा महत्त्वाचा ग्रंथ म्हणजे - 'श्रीमत् भावार्थ गीता' हा ज्ञानेश्वरीला अनुसरून श्रीमत् भगवद्गीतेचा सुबोध, साकीबद्ध अनुवाद आहे. तर दुसरा महत्त्वाचा ग्रंथ 'श्रीमत् अभंग ज्ञानेश्वरी'. हा ग्रंथ म्हणजे श्रीज्ञानेश्वरीचा वर्तमानकालीन मराठीत केलेला अभंगात्मक, रसाळ अनुवाद आहे. या दोन्ही ग्रंथांचे मर्महीं ज्ञानेश्वरी नित्यपाठाच्या चिंतनाने अधिकच ध्यानात येते. कारण तोच ग्रंथ, ज्ञानदेवांचे आणि त्यांच्या ज्ञानदेवीचे हृद्गत अथवा ज्ञानेश्वरांचा मराठीजनांना संदेश, 'शिंपल्यात समुद्र' या न्यायाने यथार्थपणे प्रकट करतो. ज्ञानेश्वरी नित्यपाठ हा ग्रंथ काय साधतो ? तर स्वामी स्वरुपानंदांच्या शब्दांत -

***'जिवा-शिवाची होता भेटी । मावळोनि ज्ञाता-ज्ञेयादि त्रिपुटी ।***
***प्रकटे सोऽहंभाव प्रतीति । उरे शेवटीं ज्ञप्तिमात्र ।।'***

## जन्मकथा आणि महत्ता

'ज्ञानेश्वरी नित्यपाठ' हा स्तोत्र-ग्रंथ कसा निर्माण झाला ? यासंबंधी स्वामी सत्यदेवानंदांनी एक संदर्भ उद्धृत केला आहे. स्वामी स्वरुपानंदांचे चरित्र-संकीर्तन गाताना, 'पावसचा प्रेमदीप' हा चरित्रग्रंथ, सत्यदेवानंदांनी लिहिला आहे. त्यात पृष्ठ ७७ वर उल्लेख केला आहे की - 'स्वामीजींचा निवास श्री. अण्णा देसाई यांच्या घरीच असे. घरातील मंडळींना ते भगवद्गीता समजाऊन सांगत. अध्यात्मशास्त्रातील प्रमेयांचीही सोप्या शब्दांत ओळख करून देत. त्यातच देसाई बंधूंची धाकटी बहीण, बनूताई (सौ. रमाबाई रानडे) या देवगड येथे आपल्या घरी असतात.

त्यांच्यासाठी श्रीस्वामींनी, ज्ञानेश्वरीतील १०९ ओव्या निवडून दिल्या होत्या. त्याच पुढे 'ज्ञानेश्वरी नित्यपाठ' या संज्ञेने, संपादित स्वरूपात प्रसिद्ध झाल्या. या स्तोत्रग्रंथाच्या महत्तेसंबंधी स्वामी सत्यदेवानंद 'पावसचा प्रेमदीप' या चरित्रग्रंथात म्हणतात (५.११५, ११६) - 'मूळ ज्ञानेश्वरीचा केवळ १०९ ओव्यांतून केलेला हा संक्षेप अत्यंत प्रासादिक आहे. कर्म, भक्ती, ज्ञान, गुरुबोध इत्यादी विषय सुंदर तऱ्हेने मांडलेले आहेत. ही छोटीशी पुस्तिका म्हणजे 'ज्ञानेश्वरी वेंचे' पद्धतीचा आदर्शच होय... स्वामीजींची अनुग्रहीत आणि चाहते मंडळींपैकी प्रत्येक व्यक्तीला, नित्यपाठाची प्रसादभेट मिळालेली असते आणि बहुतेकांच्या या ओव्या मुखपाठ असतात. ज्ञानेश्वरी नित्यपाठ हा स्तोत्रग्रंथ किती भक्तजनप्रिय आहे ? तर 'ज्ञानेश्वरी नित्यपाठ' या सारस्तोत्राची शके १९१९ मध्ये म्हणजे इ. स. १९९७ मध्ये, २७ वी आवृत्ती प्रकाशित झाली आहे. एवढा हा स्तोत्रग्रंथ परमार्थप्रवण साधकांना अतीव प्रिय आहे.

## नित्यपाठाची अर्पण पत्रिका

हा 'ज्ञानेश्वरी नित्यपाठ' स्तोत्रग्रंथ स्वामीजींनी आपल्या पूजनीय मामांना अर्पण केला आहे. या स्तोत्राच्या अर्पणपत्रिकेत ते म्हणतात - ब्रह्मीभूत, श्रीमत् सच्चिदानंद सद्गुरु गणेश नारायण उर्फ बाबामहाराज वैद्य (पुणे) यांच्या दर्शनानुग्रहाचा अपूर्व योग, ज्यांच्या वात्सल्यामुळे घडून आला, ते माझे ज्येष्ठ गुरुबंधु आणि पूज्य मातुल श्रीतत्त्वज्ञ केशव विश्वनाथ उर्फ नाना गोखले (शास्त्री हॉल, मुंबई) यांना ही अल्प कृती, कृतज्ञतापूर्वक समर्पण. ही तिथी गुरुपौर्णिमा, शके १८७७ म्हणजे इ. स. १९५५ अशी आहे. याच पुस्तिकेच्या प्रारंभी श्रीज्ञानदेव वंदनेच्या अखेरी, स्वामीजींनी असे म्हटले आहे की - 'ज्ञानेशाला नमिता झाला । श्रीसद्गुरुला तोष । वरदहस्त मस्तकीं ठेवुनी देई मज आदेश॥' या पुस्तिकेत २४ मे १९५७ या दिनांकाला अर्पिलेली, श्रीज्ञानेश्वरी गौरविका आहे. त्यात स्वरुपानंदांनी, ज्ञानेश्वरीची महत्ता सांगितली आहे. तेच मोठेपण, नित्यपाठ या सारस्तोत्राचेही आहे. स्वामीजींनी म्हटले आहे -

*"श्रीज्ञानेश्वरी अमृतगंगा । बहुत सुकृतें लाभली जगा ।*
*पावन करी अंतरंगा । अंगप्रत्यंगा जीवाचिया ॥*
*भक्तिभावें करितां स्नान । निर्मल होय अंतःकरण ।*
*जीवासी परम समाधान । साक्षात दर्शन श्रीशिवाचे ॥"*

## नित्यपाठ : जणू स्वतंत्र ग्रंथ

पूजनीय स्वामीजींचे निकटवर्ती शिष्य, स्वामी स्वरुपानंद सेवामंडळाचे पहिले कार्यवाह श्री. बा. म. परांजपे तथा स्वामीसेवक यांनी 'श्रीज्ञानेश्वरी नित्यपाठ-अभ्यास' हा ग्रंथ संपादित आणि प्रकाशित केला आहे. या ग्रंथाची पहिली आवृत्ती १९८२ मध्ये, तर दुसरी आवृत्ती १९९८ मध्ये प्रकाशित झाली आहे. त्याच्या प्रास्ताविकात स्वामीसेवक म्हणतात - 'श्रीज्ञानेश्वरी नित्यपाठ' या श्रीमत् स्वामी स्वरुपानंद संपादित स्तोत्राकडे, जो जो लक्ष द्यावे, तो तो मन थक्क होऊन जाते. यात श्रीज्ञानेश्वरी (भावार्थदीपिका) या सुमारे ९०००, थोड्या अधिकच ओव्या असलेल्या ग्रंथाचा 'सर्वग्राही सारांश' फक्त १०९ ओव्यांत आला आहे. यातील ओव्यांचा क्रमही श्रीज्ञानेश्वरी अध्यायांच्या क्रमाने नाही. निवडही प्रत्येक अध्यायातून ठराविक ओव्या - अशी नाही. स्तोत्राची सुरुवात पहिल्या तीन अध्यायांतील काही ओव्यांनी होते... सर्वात जास्त म्हणजे १९ ओव्या नवव्या अध्यायातील आहेत. तर सतरा ओव्या दुसऱ्यातील, १४ ओव्या तिसऱ्यातील, १३ ओव्या अठराव्या अध्यायातील आहेत. तसेच ११ ओव्या चौथ्या अध्यायातील, ८ ओव्या बाराव्या अध्यायातील आणि ७ ओव्या तेराव्या अध्यायातील येतात. याचप्रमाणे ६ ओव्या पहिल्या अध्यायातील आणि ४ ओव्या सहाव्या अध्यायातील दिसतात. तसेच प्रत्येकी दोन ओव्या, पाचव्या, सातव्या आणि अकराव्या अध्यायातील असून प्रत्येकी १ ओवी आठव्या, दहाव्या, सोळाव्या आणि सतराव्या अध्यायांतील घेतलेली आहे. अध्याय चौदा आणि पंधरा यांतली एकही ओवी आलेली नाही. स्वामीसेवक म्हणतात, 'ज्ञानेश्वरी नित्यपाठ स्तोत्रात घेतलेल्या ओव्यांतील विषय, क्रमाने पाहिले तर त्यांत अत्यंत सुसंवाद आहे. आणि त्यांतून जणू स्वतंत्र ग्रंथच पूर्णत्वास आला आहे. 'शाब्दे परेच निष्णातम्' अशांकडूनच असे कार्य होऊ शकते.

## नित्यपाठाची विषयवार विभागणी

आपण ज्ञानेश्वरी नित्यपाठ स्तोत्राचे विषयवार अवलोकन करू लागलो तर आपणाला त्यात अध्यात्मिक विषयांची सुंदर साखळी दिसते. या विषयांची गुंफण पुढीलप्रमाणे आहे, असे म्हणता येते. पहिल्या एक ते चार ओव्यांत वंदन आहे. तेथे आत्मरूप ओंकार, श्रीगणेश, सरस्वती माता आणि श्रीसद्गुरु यांना मनोभावे वंदन केले आहे. पुढील पाच आणि सहा या ओव्या मूळ विषयाच्या दृष्टीने स्तोत्रग्रंथाचा उपक्रम आहेत. 'या उपाधिमाजीं गुप्त । चैतन्य असे सर्वगत । ते तत्त्वज्ञ संत । स्वीकारिती ॥' संत आणि तत्त्वज्ञ हे, या जगात आपल्या पंचेंद्रियांना जाणवणाऱ्या, सर्व 'उपाधी' मागील आणि त्या सर्वांत भरून उरलेल्या, चैतन्यतत्त्वाला पूर्णपणे ओळखतात. हीच खरी आत्मविद्या. पुढे सातव्या ओवीपासून, पंचेचाळीसाव्या ओवीपर्यंत, कर्मयोग आहे. ४६ ते ६४ या ओव्यांत ज्ञानयोग आहे. तसेच ६५ व्या ओवीपासून भक्तियोग प्रकट होतो. तो ७९ व्या ओवीपर्यंत आहे. ८० व्या ओवीपासून, अभ्यासयोग विशद केलेला दिसतो. तो ९३ व्या ओवीपर्यंत आहे. ९४ व्या ओवीपासून, १०५ व्या ओवीपर्यंत भगवद्गीतेचे मोठेपण सांगणारा 'मंत्ररहस्य' योग आहे. १०६, १०७, १०८ या तीन ओव्यांत या वाग्यज्ञाचे पसायदान आहे आणि शेवटच्या १०९ व्या ओवीत, कृतज्ञतेने, विश्वरूप परमात्म्याच्या चरणी, भावपुष्पे समर्पित केली आहेत.

*'भरोनि सद्भावाची अंजुळी । मियां वोवियाफुलें मोकळी ।*
*अर्पिलीं अंघ्रियुगुळीं । विश्वरूपाच्या ॥' (११.७०८)*

## नित्यपाठातील कर्मयोग

भगवान श्रीकृष्णाने भक्तश्रेष्ठ अर्जुनाला, निष्काम कर्मयोगाची

दीक्षा दिलेली आहे. नरदेह प्राप्त झाल्यावर कर्मे केलीच पाहिजेत. फक्त ती फलाशाविरहित करणे, ही हातवटी महत्त्वाची आहे, ही खरी मुक्ती आहे. हाच 'योग' आहे. कर्मयोग आहे. भगवान सांगतात की, ज्या प्रमाणे सरळ रस्त्याने चालले असता, मुळीच अपाय नसतो किंवा दिव्याच्या प्रकाशात चालले की, ठेच लागण्याची भीती नसते, त्याप्रमाणे स्वधर्माने वागले असता, आपल्या सर्व इच्छा सहजच पुऱ्या होऊ शकतात. यासाठी सुखाच्या प्रसंगी हर्षोन्माद नसावा किंवा दुःखाच्या वेळी शोकावेगही नसावा. भगवंतमुखाने ज्ञानदेव सांगतात - दैवाच्या अनुकूलतेने हाती घेतलेले कर्म, यथासांग पार पडले तरी त्यामुळे विशेष संतोष मानू नये किंवा काही कारणाने, आरंभलेले कार्य सिद्धीस गेले नाही, अपूर्ण राहिले तरी त्यासाठी खिन्न होऊन आपले चित्त गडबडू देऊ नये. उलट जेवढे म्हणून आपल्या हातून कर्म झाले, तेवढे ते सर्व परमात्याला अर्पण करता आले तर, ते कार्य सहजच संपूर्ण होते, परिपूर्ण होते, हे लक्षात घ्यावे.

ज्ञानदेव सांगतात - भगवद्भक्ताने कर्मयोग कसा साधावा ? तर जे जे कर्म करणीय आहे आणि प्रसंगानुसार प्राप्त झाले आहे ते ते फळाची आशा सोडून करीत राहावे. आपणास सुयोग्य अशा धर्माचे, स्वधर्माचे, जो आचरण करतो त्याला त्याच आचरणाने, मोक्षाची प्राप्ती होऊ शकते. जो आपला स्वधर्म, तोच नित्ययज्ञ होय, असे समजून कर्माचरण केले की, तेथे पापाचा शिरकावच होत नाही.

*'अगा जया जें विहित । तें ईश्वराचें मनोगत ।*
*म्हणौनि केलिया निभ्रांत । सांपडेचि तो ॥' (१८-९११)*

भगवंत सांगतात - अर्जुना नीट ऐक. जे कोणी, मनुष्य देह मिळाला असता कर्माचा कंटाळा करतात, ते अडाणी होत. उलट कर्माचा मुळीच त्याग न करता, राजा जनक यांच्यासारख्यांना मोक्षाचे सुख मिळाले आहे. या जगाची रहाटी अशी आहे की, या जगात थोर लोक, जे कर्म आचरतात, त्यालाच सामान्य लोक धर्म समजतात आणि त्याचेच आचरण करतात, अनुकरण करतात. अशी स्थिती असल्यामुळे ज्ञानी पुरुषांनी कर्म सोडणे, बरोबर नाही. इतकेच नव्हे तर संतसज्जनांनी कर्माचे आचरण विशेष काळजीने केले पाहिजे. हे स्पष्ट आहे की, ज्ञानी पुरुषाचा देह वरवर पाहिले तर बाह्यतः आपल्या स्वभावानुसार हिंडत असतो; पण त्याच्या मनातील विचारांची स्थिरता, बैठक कधी विघडत नाही. भगवंत सांगतात -

*'अर्जुना समत्व चित्ताचें । तेंचि सार जाण योगाचें ।*
*जेथ मन आणि बुद्धीचें । ऐक्य आथी ॥' (२.२७३)*

म्हणजे असे की, यशापयशाबाबत चित्ताची समता राखणे, हेच योगाचे मर्म आहे. अशा योगात मन आणि बुद्धी यांचे ऐक्य असते. म्हणजे मनाचा संकल्प आणि बुद्धीचा निश्चय हे एकमेकांच्या बाबतीत अविरोधी असतात. जशी निवाऱ्याच्या ठिकाणी असणारी, दिव्याची ज्योत मुळीच हलत नाही, त्याप्रमाणे योगयुक्त पुरुष, स्व-रूपाच्या ठायी स्थिर बुद्धीने राहतो. पण विशेष गोष्ट अशी की, अशा योगयुक्ताच्या मनात, जसा कर्माविषयी तिरस्कार नसतो, त्याचप्रमाणे त्याच्या अंतःकरणात, कर्माच्या फळाची इच्छा, चुकूनही केव्हाही प्रवेश करू शकत नाही हे महत्त्वाचे असते.

## नित्यपाठातील ज्ञानयोग

'अध्यात्मविद्या विद्यानाम् ।' असे म्हटले गेले आहे. त्यातही ज्ञानयोगाचे महत्त्व विशेष आहे. यासाठीच भगवंत म्हणतात - ज्याने आत्मज्ञानरूपी अग्नीच्या द्वारे, आपली सर्व कर्मे जाळून टाकली आहेत, ती व्यक्ती म्हणजे मनुष्यरुपातील प्रत्यक्ष ब्रह्मच आहे, असे समजावे. आपणाला हे सर्वोत्तम ज्ञान लाभावे, असे जर वाटत असेल तर संतसज्जनांची सर्वस्वे करून, भक्ती करावी. लक्षात घ्यावे की, 'आत्म अनात्म विवेक' हीच खरी आत्मविद्या आहे. तोच ज्ञानयोगाचा गाभा आहे. अखेर नरदेह हा पंचमहाभूतांचा बनला आहे. कर्माच्या धाग्यांनी गुंफलेला आहे. आणि तो जन्ममृत्यूच्या चाकावर घातलेला असून, गरगरा फिरत आहे. काळरूपी अग्नीच्या कुंडात हा नरदेहरूपी लोण्याचा गोळा अर्पिलेला असून, माशीने पंख फडफडवावेत, तेवढ्या अल्पकाळात हा देह नाश पावतो. नरदेहाची अशी वाईट अवस्था आहे. पण आत्मा तर अनादिपणामुळे, स्वभावतःच नित्य आणि सिद्ध आहे. तो आत्मा लौकिकार्थाने आनंदित नाही, की आनंदरहित नाही. तो एकही नाही आणि अनेकही नाही. तो मुक्तही नाही आणि बद्धही नाही. कारण या साऱ्या लौकिक कल्पना, मूळ आत्मा, परमात्मा याच्याबाबत संभवतच नाहीत, हे नीट समजणे हेच खरे आत्मज्ञान होय. हेच परमतत्त्व होय. अशा आत्मज्ञानी व्यक्तीची थोरवी काय वर्णावी ? ज्ञानदेव म्हणतात, असे हे ज्ञानी भक्त, विश्वरूप-विश्वंभर परमात्म्याला, अंतःकरणात साठवून, या त्रैलोक्यात सुखाने क्रीडा करतात. व्यवहारमग्न असतात. त्यांना सर्व भूतमात्रांत, तो एक भगवंतच दिसतो.

*'हे विश्वचि माझें घर । ऐसी मती जयाची स्थिर ।*
*किंबहुना चराचर । आपण जाहला ॥' (१२.२१३)*

## नित्यपाठातील भक्तियोग

अवघ्या मराठी जनांना ज्ञानेश्वर ग्वाही देतात की, पूर्ण आत्मज्ञानी असूनही जर त्या ज्ञानी व्यक्तीच्या ठायी, भगवद्भक्तीची आस्था असेल तर त्या भक्ताला, स्वतः भगवंतच मस्तकी धारण करतात. या भगवद्भक्तांची थोरवी फार मोठी ! कारण भगवंत हा स्वतः वैकुंठात नसेल, एक वेळ सूर्यबिंबातही नसेल, कदाचित योग्यांची मनेही ओलांडून जाईल, पण अशा तऱ्हेने भगवंत जरी हरवला, तरी जेथे भगवद्भक्त या भगवंताचे मोठ्या उल्हासाने, सर्वोत्तम नामसंकीर्तन करीत असतील, तेथे हा भगवंत नक्की सापडणारच ! तेथेच तो शोधावा ! या नामसंकीर्तनाची पद्धती आणि महती सांगताना, ज्ञानदेव म्हणतात - अहो, हे महात्मे कृष्ण, विष्णू, हरि, गोविंद या हरिनामाचेच संकीर्तन करतात. कथन, गीतगायन, छंदोगायन करतात आणि मधून-मधून सुस्पष्ट रीतीने, पुष्कळ आत्मचर्चाही करतात. अधिक काय सांगावे ?

या हरिभक्तांच्या वाणीत, भगवंताचीच कथा असते. त्यांचे डोळे भगवंताचेच रूप पाहण्यात मग्न असतात. त्यांचे मन सर्वस्वी भगवंताविषयीच विचार करीत असते. भगवंताचे गुण ऐकण्यावाचून त्यांचे कान रिकामे नसतात. खरे तर त्यांच्या शरीरातील प्रत्येक अवयवाला, भगवंताचीच कोणती ना कोणती सेवा, हीच भूषण होऊन राहिलेली असते !

श्रीज्ञानेश्वर भगवंतमुखाने स्पष्ट अभिवचन देतात की, कोणी तथाकथित दोषयुक्त जातीत जन्मलेले असोत किंवा वैश्य, श्रमजीवी किंवा स्त्रिया असोत, या सर्वांनी माझी अनन्यनिष्ठ भक्ती केली की, ते सर्वजण माझ्याच स्वरूपाला येऊन मिळतात. मी एक भक्तीच ओळखतो. त्या ठिकाणी लहान किंवा थोर अशी निवड करीत नाही. आम्ही वाटेल त्याच्या, कोणाच्याही भक्तिरूपी मेजवानीचे पाहुणे असतो - याची, हे अर्जुना खात्री बाळग. अरे, खरे तर पान अथवा फूल किंवा फळ हे मला अर्पण करणे हे भक्तीचे केवळ प्रतीक आहे. निमित्त आहे. वास्तविक मला सर्वस्वी आवडते ते भक्ताच्या मनात असलेले शुद्ध, प्रेमळ भक्तितत्त्व होय. असा भक्त, स्वतः मी वेगळा आणि इतर भूतमात्रे वेगळी, अशी भाषाही विसरतो. कारण त्याच्या दृष्टीने अवघ्या विश्वात, विश्वंभरच भरून उरलेला असतो. त्याला अवघ्या जगात भगवंताशिवाय दुसरे काही दिसतच नाही. म्हणून तो निर्वैर होतो.

***'हे समस्तही श्री वासुदेवो । ऐसा प्रतीतिरसाचा वोतला भावो ।***
***म्हणोनि भक्तांमाजि रावो । आणि ज्ञानिया तोचि ॥'*** (७.१३६)

## नित्यपाठातील अभ्यासयोग

कर्मयोग, ज्ञानयोग आणि भक्तियोग असा हा त्रिवेणी संगम साधण्यासाठी अभ्यासयोगाची गरज आहे. त्याचेही विशदीकरण नित्यपाठात येते. ज्ञानदेव भगवंतमुखाने, अर्जुनाला आणि सर्वच परमार्थसाधकांना सांगतात - तुम्ही आपले मन मद्रूप करा. माझ्या भक्तीच्या ठायी दृढ प्रेमभाव धारण करा. प्रेमभक्तीत रंगून जा. सर्व विश्वाच्या ठायी माझेच स्वरूप आहे, असे ओळखून मला 'एकाला' नमस्कार करा. यासाठी साधना-उपासना कोणती ? तर सततच्या आत्मचिंतनाने, 'सोऽहं'च्या ध्यानाने किंवा अनन्यनिष्ठ ईश्वरी नामस्मरणाने आपले मन इतके भरून टाकावे की, मनात भगवंताखेरीज कोणाला राहताच येऊ नये. सर्व वस्तुमात्रातील एकमेव भगवंत ओळखावा. त्याला सर्वत्र, सहजपणे, नमस्कार करावा, हाच तो अभ्यासयोग !

भगवंत असेही सांगतात, हे माझ्या अनन्यनिष्ठ भक्ता, तू माझ्याच ओढीने, वेधाने, लक्षपूर्वक, सर्व सांसारिक संकल्प, संपूर्णपणे जाळून टाक. मग तू खरा भगवद्भक्त म्हणजे शुद्ध यज्ञकर्ता ठरशील. रूपकाने सांगायचे तर आत्मचिंतनरूप यज्ञात, आपल्या मनात येणाऱ्या सर्व कल्पनांचा पूर्णपणे होम करावा. हाच सर्वश्रेष्ठ यज्ञ होय. अशा प्रकारे संकल्प-विकल्पांचे, हवे-नकोचे, कल्पना तरंग थांबले की, मन शांत होते. मग आनंदरूप आत्मरूपाची ओळख पटते. स्वतः आत्मरूप, ईश्वररूप होता येते, हेच त्या भगवंताच्या हृदयातील गुपित आहे. आता हे प्राप्त होण्यासाठी, अभ्यासयोग कोणता ? साधनामार्ग कोणता ? त्यासाठी श्रीज्ञानदेव भगवंतमुखाने सांगतात, हे माझ्या भक्ता, तू जर तुझे सकलवासना रहित असे चित्त, मनबुद्धिसहीत असे चित्त, माझ्या हाती समग्रपणे, संपूर्णपणे देऊ शकत नसलास तर तू असे कर की, या आठ प्रहरांमध्ये नेमकेपणाने, साक्षेपाने, निमिषभर म्हणजे क्षणभर तरी तुझे चित्त मला देत जा.

भगवंत पुढे सांगतात, मग जेवढा वेळ तुझे चित्त माझे भक्तिसुख अनुभवेल, तेवढा वेळ तुझे चित्त निश्चितपणे प्रापंचिक विषयांच्या ठिकाणी अरुची घेईल. उदाहरणाने सांगायचे तर पौर्णिमेपासून पुढे ते चंद्रबिंब दिवसेंदिवस कमी कमी होत जात, अखेर अमावस्येला, अगदी नाहीसे होते. त्याप्रमाणे सांसारिक भोगातून तुझे चित्त निघून ते माझ्यामध्ये प्रवेश करीत करीत, हळूहळू मद्रूपच होऊन जाईल. हाच तो अभ्यासयोग होय. या अभ्यासाला कोणतीही गोष्ट, मुळीच कठीण नाही. यासाठी हे भक्ता तू प्रयत्नपूर्वक अभ्यासयोगाने माझ्या स्वरूपी एकरूप हो. भगवंत सांगतात - या मानवी मनाची एक गोष्ट मात्र फार चांगली आहे. ती म्हणजे त्याला एकदा गोडी लागली, की ते अनुभवलेल्या गोडीच्या ठिकाणी सवकते. म्हणून त्या मनाला कौतुकाने, आत्मानुभूतीचे सुखच पुनःपुन्हा, वारंवार दाखवीत जावे अशा या अभ्यासयोगाची फलश्रुती कोणती ? तर -

***'ऐसा जो कामक्रोध लोभा । झाडी करूनि ठाके उभा ।***
***तोचि येवढिया लाभा । गोसावी होय ॥'*** (१६.४४४)

## नित्यपाठातील 'मंत्ररहस्य'

ज्ञानदेव सांगतात - खरे तर ईश्वरी 'नाम' हेच ब्रह्म आहे. ज्या भगवंताकडून हे सर्व दृश्यमात्र, विश्वरूप प्रकाशिले जाते त्या भगवंताच्या ठिकाणी 'ॐ तत् सत्' हा नामोच्चार, साधकाला घेऊन जातो. याच ऐक्य भावाने, अनन्य निष्ठेने, भक्ताने भगवंताला शरण जावे. सोन्याचा मणी जसा सोन्याशी अभिन्न असतो, अथवा पाण्याची लाट जशी पाण्याशी ऐक्य पावते, त्याप्रमाणे साधकाने अद्वैत भावाने भगवंताला शरण यावे. भगवद्रूप होऊन, भगवंताची सेवा करणे, हीच 'सहजभक्ती' आहे. ही पूर्णाद्वैत ज्ञानाने, हस्तगत होते. ही चिद्विलासाची जाणीव, हेच ते भगवद्गीतेचे 'मंत्ररहस्य' आहे. स्वतः भगवंतच सर्वांना आवाहन करतात की, ज्या बालकाला आईशिवाय दुसरे जीवनच नाही, त्या बालकाची आणि आईची, जशी भेट करून द्यावी त्याप्रमाणे, अध्यात्म विद्येच्या मंत्राचे संपूर्ण रहस्य सांगणाऱ्या या भगवद्गीतेची ओळख, भगवद्भक्तांना अवश्य करून द्यावी.

***'ते हे मंत्ररहस्य गीता । मेळवी जो माझिया भक्ता ।***
***अनन्यजीवना माता । बालका जैसी ॥'*** (१८.१५१२)

अशा तऱ्हेने भगवद्भक्तांची या भगवद्गीतेशी प्रेमाने जो भेट घडवील तो देहपातानंतर, खात्रीने भगवद्रूपच होईल, असे त्या सर्वरूप सुंदर, सर्वार्थ डोळस आणि सर्वदेशनिवासी श्रीकृष्णाने अर्जुनाला सांगितले. या मंत्ररहस्याची थोरवी किती वर्णावी ? हे मंत्ररहस्य असे आहे की,

वैराग्यशील पुरुषही ते जाणण्याची इच्छा बाळगतात. संतसज्जन तर त्याचा नित्य अनुभव घेतात आणि सोऽहं भावनेने संसारसागर तरून गेलेले योगयुक्त इथेच रममाण होतात. तेच हे 'मंत्ररहस्य' भगवंताने गायिलेली 'गीता' या नावाने सुप्रसिद्ध आहे. ज्ञानसागर वाङ्मयाचे, ते सारसर्वस्व आहे आणि याच मंत्ररहस्याच्या योगाने ते 'परमात्म'रत्न आपल्या स्वाधीन होते. ज्ञानदेव सांगतात, तेच 'मंत्र' रहस्य भगवद्‌गीता रूपाने सर्वांना लाभले आहे. खरेतर वासरासंबंधीच्या प्रेमाने, त्याच्याबद्दलच्या पान्ह्याने, गाईचे दुभते, घरातील सर्व माणसांच्या उपयोगी पडते; त्याप्रमाणे भक्तश्रेष्ठ अर्जुनाच्या निमित्ताने, ही भगवद्‌गीता प्राप्त झाली असून ती जगाचा उद्धार करीत आहे.

*'वत्साचेनि वोरसें । दुभते होय घरोघेशे ।*
*जाले पांडवाचेनि मिषें । जगदुद्धरण ॥'* (१८.१४६७)

## सत्‌कविवरांचा प्रसाद

श्रीमत् स्वामी स्वरुपानंदांनी म्हटले होते की, 'जगी जन्मूनी अभिनव जीवन सत्‌कविवर होईना । स्वानुभवीं स्फूर्त नवरसी सत्यकाव्य निर्मीन ॥' त्यांनी श्रीज्ञानदेवांना वंदन करताना म्हटले होते, 'नमितो योगी थोर विरागी तत्त्वज्ञानी संत । तो सत्कविवर परात्पर गुरु ज्ञानदेव भगवंत ॥' आपणही त्याच शब्दांचा कृपाप्रसाद घेऊन म्हणू शकतो - 'नमितो योगी थोर विरागी तत्त्वज्ञानी संत । तो सत्कविवर नवनाथरूप स्वरुपानंद समर्थ ॥' स्वामी स्वरुपानंदांची सारी साहित्यसृष्टी, ही 'ज्ञानदेव आणि ज्ञानदेवी' यांच्याच विषयी चिंतन करणारी, चेतनाचिंतामणीची दुजी सृष्टी आहे. ती भावानुवादी आहे. तशीच स्वतंत्र स्वरुपाची आहे. पण ती ज्ञानदेव शरणच आहे. स्वामीजींनी सर्व साधकांना कळकळीने आणि तळमळीने आवाहन केले आहे की, 'नित्य अंतरी ज्ञान-देव । सर्वाभूती भगवद्‌भाव । देव-भक्तां एक चि ठाव । अपूर्व नवलाव अनुभवावा ।' ज्ञानदेवांचा आणि ज्ञानदेवीचा संदेश, पुनःपुन्हा लक्षात घ्यायचा असेल आणि तसे आचरण करायचे असेल तर 'ज्ञानेश्वरी नित्यपाठ' हा स्तोत्रग्रंथ सर्वाधिक महत्त्वाचा आहे. हा नित्यपाठ आपणाला स्व-स्वरुपी लीन व्हायला शिकवितो. सोऽहं साधनेने दिव्य शक्तीचा अनुभव घ्यायला प्रवृत्त करतो. एकदा स्वरूपाचा शोध-बोध झाला की, देहबुद्धी संपते. आसक्ति-अभिलाषा नष्ट होते आणि संसारातील 'सत्य' स्वरूप ओळखता येते. परिणामी अखंड प्रसन्नता लाभते. सोऽहं साधनेद्वारा आत्मकल्याण साधता येते. आणि विश्वकल्याणासाठी कार्यरत होता येते. शेवटी लोकोद्धार झाल्याशिवाय आत्मोद्धार संपूर्ण होत नाही, हेच चिद्‌विलासवादी भक्तियोगाचे मर्म आहे. 'ज्ञानेश्वरी नित्यपाठ' हीच गोष्ट आपणाला सांगतो. तो जीवनातील 'विषादयोग' संपवून कर्मयोग-ज्ञानयोग-भक्तियोग आणि अभ्यासयोग यांचे वरदान देतो. स्वामीजींनी भगवंताकडे जी वरप्रार्थना केली तीच 'ज्ञानेश्वरी नित्यपाठा'साठी संजीवनी - मंत्र वाटते. स्वामीजी म्हणतात -

*'देव-भक्त असें द्वैत अद्वयत्व न खंडितां ।*
*राखवीं देव देवेशा प्रार्थना ही तुला अतां ॥'*

**डॉ. मुकुंद र. दातार**
२, प्राध्यापक निवास, वारणानगर, ४१६ ११३ जि. कोल्हापूर,.

# "स्वरुप - पत्र - मंजुषा" :


## स्वामी प्रज्ञानंद (प्रा. म. अ. कुलकर्णी)

*एम.ए. शिवाजी विद्यापीठात मराठीत सर्वप्रथम. निवृत्त मराठी विभाग प्रमुख, डी. आर. के. कॉलेज ऑफ कॉमर्स कोल्हापूर. कथा, कविता व स्फुट लेखन निरनिराळ्या नियतकालिकांतून प्रकाशित. संतचरित्रे - ६ पुस्तके प्रकाशित. महाराष्ट्र व महाराष्ट्राबाहेर व्याख्याने. 'श्रीक्षेत्र-पावस' षण्मासिकाचे संपादक*


प. पू. स्वामी स्वरूपानंदांच्या मौलिक साहित्य संपदेमधील 'स्वरुप पत्र मंजूषा', हे पत्रलेखनात्मक पुस्तक, स्वामी सत्यदेवानंद यांनी संपादित केलेले आहे. 'कोणाही परमार्थ जिज्ञासूला या पत्रांतून शुद्ध परमार्थातील पुढचा मार्ग उजळून दिसेलच परंतु विशेषतः ज्यांनी 'त्वमेव सर्व मम देव देव ।' अशा पूर्ण शरणागतीने श्रीस्वामींच्या चरणी मस्तक ठेवले आहे अशा प्रत्येक सांप्रदायिकाला स्वरुप-साक्षात्कार होण्यासाठीच नव्हे तर कृतार्थ संसारी जीवनासाठी सुद्धा आवश्यक ते सर्व मार्गदर्शन या पत्रवाङ्मयात मिळेल यात तिळमात्र शंका नाही. ही पत्र-मंजुषा म्हणजे श्रीगुरुंची खरी खरी चिरंजीव वाङ्मय मूर्ती आहे.' - असा सार्थ निष्कर्ष आपल्या संपादकीयात, 'मांदूस उघडण्यापूर्वी' - या लेखात स्वामी सत्यदेवानंदांनी नोंदविला आहे.

इ. स. १९५१ ते १९६३ या कालावधीत आठ-दहा प्रिय व्यक्तींना वेळोवेळी लिहिलेल्या पत्रांचा हा संग्रह आहे. प. पू. स्वामी स्वरुपानंद यांनीच उल्लेख केल्याप्रमाणे आपल्या सुहृद-सज्जनांना लिहिलेली ही पत्रे असून स्वामींनी स्वहस्ते त्याची स्थळप्रत करून ठेवलेली होती. सर्वार्थाने ही स्वामींची अस्सल साहित्यसंपदा असून त्यातून स्वामींचे विचार तत्त्वज्ञान प्रकट झाले आहे. साधकावस्थेपासून पूर्ण सिद्धावस्था प्राप्त झाल्यानंतरही स्वामी या त्यांच्या विचार तत्त्वज्ञानाशीच श्रद्धापूर्वक एकरूप झालेले होते हे दिसून येते. स्वामीपदास जाऊन पोहोचण्याची ही बीजरूप सूत्रेच आहेत. ही पत्रे-काव्ये म्हणजे त्यांच्या आत्मकंदांना फुटलेले सहज कोंबच आहेत. स्वामींचे लोकहित तत्पर अंतःकरण या पत्रांमधून ओसंडून वाहते झाले आहे.

***प्रियजनासी सांगाव्या गुजगोष्टी ।***

***ऐसे बहुत वाटते चित्ती ॥***... अशा उत्कट ओढीने, 'तुम्हासारखा साधक आगळा' - भेटला म्हणून आत्मसुख सोहळा भोगण्याचे रहस्य सांगण्यासाठी किंवा लाभो अखंड प्रसन्नता ।

प्राप्त होवो चित्तासी समता ॥... अशा उदार, व्यापक सहानुभूतीने हे लेखन घडलेले आहे. स्वामींचे साधकांसाठी प्रगट झालेले हे अभ्यासपूर्ण, सखोल, मर्मग्राही चिंतन-मननच आहे. कोठे विस्ताराने कोठे सिद्धांतरूप. पण ही सारी पत्रे म्हणजे स्वामीजींच्या अनुभूतीचाच उत्स्फूर्त काव्यमय आविष्कार आहेत. स्वामीच एका पत्रलेखनाचे शेवटी लिहितात - 'ऐसे प्रभूसी प्रार्थिले । अंतरी स्फुरले तेचि लिहिले ॥... समर्थ रामदास सांगतात - हे प्रचितीचि उत्तरे । कळती सारासार विचारे । मनन ध्यासे साक्षात्कारे । पावन होईजे ॥(९-४-४१)... अगदी तसेच सामर्थ्य, तसेच आश्वासन या पत्रांच्या आधारे जणू स्वामी तुम्हा-आम्हा सर्वांना देत आहेत.

स्वामी सत्यदेवानंदांनी या साठ-पासष्ट पत्रांचे वर्गीकरण १) कर्मयोग सिद्धी, २) सगुण उपासना, ३) तत्त्वज्ञान प्रबोधन, ४) श्रीमत् सद्‌गुरु भजन महिमा, ५) सांप्रदायिक सन्मार्ग प्रकाश व ६) प्रासंगिक बोधसुधा अशा सहा प्रकरणांत केलेले असून त्या त्या विभागातील पत्रांचे वैशिष्ट्य 'मननामोद' या नावाने स्वतंत्र टिपणांमधून कथन केले आहे. हे अभ्यासपूर्वक केलेले विवरणही साधकांना उपयुक्त असेच झाले आहे. या सर्व पत्रांमधून 'अक्षय्य सौख्य शांतीचे भांडार' कसे भरलेले आहे हे ध्यानी येण्यास हे समीक्षण सहाय्य करणारे आहे. भक्तिज्ञान वैराग्य लक्षण । नीतिन्याय स्वधर्म रक्षण । साधनमार्ग अध्यात्म निरुपण । प्रांजळ बोलावे ॥ (४-२-१६) असा एक दंडक रामदासांनी नवविधा भक्तीचे विवरण करताना सांगितला आहे. अध्यात्म विद्या शास्त्राधारेच कथन करावी...स्वामी स्वरुपानंदांचे पत्रव्यवहारातील मार्गदर्शन व सत्यदेवानंदांचे त्या पत्रांवरील मार्मिक भाष्य या दोन्हींचा येथे समसमा संयोग झालेला दिसून येतो. 'स्वामी म्हणे सुखे जोडू परमार्थ । सद्‌गुरु समर्थ पाठीराखा ॥' - ही प. पू. स्वरुपानंदांची भूमिका, स्वामी सत्यदेवानंदांनी अधिक सुकर करून ठेवली आहे.

साधकाच्या जीवनामधील संसार-दुःखे संपून जावीत, त्यांच्या वृत्ती शुद्ध व्हाव्यात, भगवद् चरणी त्यांची प्रीती जडावी, त्यांचे ऐहिक, पारलौकिक मनोरथ पूर्ण व्हावेत, त्यांना सन्मार्ग लाभावा, संत वचनांचा प्रत्यय त्यांना यावा आणि परम समाधानाची प्राप्ती व्हावी या सद्‌हेतूने स्वामींनी त्यांच्या प्रिय व्यक्तींना केलेले हे प्रबोधन आहे. प्रिय व्यक्ती या निमित्त त्या सर्वच पत्रांतील उपदेश सर्वसामान्यपणे कोणाही साधकाला उपयुक्त, उद्‌बोधक ठरेल असाच शाश्वत स्वरुपाचा आहे... या पत्रांतील परमार्थ निरुपण म्हणजे स्वामी स्वरुपानंदांच्या शिकवणुकीचे त्यांनीच काढलेले साराचेही सार आहे असे म्हणता येईल. हे मार्गदर्शन इतके सात्त्विक, तुष्टी-पुष्टीदायक आहे की, सर्व साधू-संतांनी संतोषाने डोलावे इतके अचूक, अनुभवपूर्ण, सांगोपांग असे आहे ! 'स्वस्वरुपी रंगो मन । लाभो परम समाधान ॥'... या साध्याशी नेऊन ठेवणारे असे आहे. समर्थ दासबोधात विचारतात, 'स्वरुपे स्वरुपी रंगावे । कोण्या प्रकारे ॥' (९-१०-३५) त्या प्रश्नाचे उत्तर या पत्रांमधून आपोआप मिळून

जाते ! अनेकार्थाने ही पत्रे स्वामी स्वरुपानंदांचा एक 'सत्संगच' घडवितात ! त्यामधून स्वामीजी आपल्याला लाभलेल्या विमल-शुद्ध स्वरुप-ज्ञानाचाच आविष्कार करताहेत हे ध्यानी येते. हा एक 'गुरुशिष्य संवादच' होऊन जातो.

या चराचराचे मूळ काय ? याचा शोध घेणं म्हणजे शुद्ध ज्ञान होय. त्या दृष्टीने या संग्रहामधील तत्त्वज्ञान प्रबोधन या तिसऱ्या गटातील २३ ते ३३ ही अकरा पत्रे वेदान्त विचार मांडणारी आहेत. त्यात पांडित्य प्रदर्शन नाही. सहज ओघात साध्य-साधना विचार त्यातून मांडला गेला आहे.

नित्यमुक्तच असताना जीव भव दुःखात का व कसा सापडला ? त्याचे हरवलेले शांती-समाधान त्याला पुन्हा कसे प्राप्त होईल ? जीवाला नेमके बंधन कशाचे आहे ? संकल्प विकल्प आले कोठून ? देह जर मी नव्हे तर सुख-दुःखे भोगतो कोण ? दृष्टीला दिसते ते सत्य की असत्य ?... मनाचे स्वरुप काय ? मी-माझे या भावनेचा मोह का पडतो ? ही प्रपंच रचना मायावी का मानायची ? मग स्वयंसिद्ध अशा आत्मस्थितीचे नेमके स्वरुप कोणते ? त्याची प्राप्ती कशी होईल ?... साक्षीत्व म्हणजे काय ? अशा महत्त्वाच्या प्रश्नांची उत्तरे या पत्रगटात आलेली आहेत. भारतीय तत्त्वज्ञानातील तात्त्विक भाग साधारणपणे सारखाच असतो. चिंतन करणारी व्यक्ती त्याची मांडणी वेगवेगळी करीत असते. स्वामींनी या सर्व प्रश्नांचे सखोल चिंतन केले होते. त्याची उत्तरेही त्यांना मिळालेली होती... जीव नित्यमुक्त पण अहंकाराने तो बंधनात पडला. अहंकारामुळेच मी-माझे ही विपरीत भावना निर्माण होते. स्वरुपाचे विस्मरण व अज्ञानाचा प्रभाव यामुळे माणूस सुखाच्या खोट्या कल्पनांमागे धावत राहून अपरिमित दुःखेच भोगत राहतो. त्यात जो खरा आत्महित साधण्यासाठी दक्ष असा विरळा, साधकच संतांना शरण जाऊन आत्मसुखाचा - आत्मप्रकाश लाभ व्हावा म्हणून तळमळत असतो- उत्कटपणे साधना-उपासना करू इच्छितो - उदार सद्‌गुरु अशा प्रामाणिक साधकांवर कृपा करतात. त्याला स्वानुभवाची खूण दाखवतात. श्रवण, मनन, निदिध्यासादि मार्गांनी मग तो अखंड आत्मस्थितीतील स्वानंद वैभव भोगू लागतो. सद्‌गुरुचरणी दृढ विश्वास हवा. अखंड एकांत सेवण्याची सवय व्हावी. लौकिकाचा हव्यास सुटावा, अभ्यास वाढवीत जावा म्हणजे चित्ताला, बुद्धीला स्थिरता प्राप्त होऊन साधना घडते. आत्मोद्धार होतो. सगुण उपासना करता करता निर्गुणाचेही आकलन होते... आत्मज्ञानानेच शांती लाभ होतो - असे स्वामी निरनिराळ्या पत्रांतून सांगतात.

*आत्मज्ञाने मुक्ती । आत्मज्ञाने भक्ती ।*
*आत्मज्ञाने शांती । मेळवावी ॥...*
*हा निष्कर्ष स्वामी काढतात.*

सद्‌गुरु पायी जे लीन होतात, पूर्ण मन बुद्धी अर्पण करतात व ज्यांच्यावर श्रीगुरुंची पूर्ण कृपा होते त्यांनाच सर्वत्र एकच परब्रह्म भरलेले आहे, याची प्रचीती येते. संसार मोक्षमय व्हावा ही आस असेल तर 'सद्‌गुरु'चरणांची सेवा हाच एकमेव उपाय आहे, हे परमार्थातील मर्महीं स्वामी मुक्तपणे, ठामपणे सांगताना दिसतात. त्यासाठी सद्‌गुरु नामाचा छंद लागावा. त्यांचे संकीर्तन करावे. त्यांच्या परब्रह्म रुपात तल्लीन व्हावे ही युक्तीही स्वामी सांगतात. "सद्‌गुरु वैभव वाढवावे । सेवाभावे सर्वदा ॥" - हा सद्‌गुरु महिमा स्वामींनी पुढील ३४ ते ४० या क्रमांकांच्या पत्रांमधून सांगितलेला आहे. संत व सद्‌गुरु या सत्ता एकच. संतकृपेनेही बुद्धी परब्रह्मी लीन होते. चित्त चैतन्यी मिळून जाण्याची किमया घडते म्हणून साधकाने संतकृपा संपादून स्वहित साधावे असेही स्वामीजी सांगतात.

साधकाने आपली साधक दशा श्रद्धे-निष्ठेने युक्त अशी वाढवावी. विकसित करावी. भक्ताने आपल्या उपास्यावर देवावरच भार घालावा. त्या शिवाय अन्य कोणताही आधार नाही. तोच एक आपला त्राता असा भाव ठेवावा. त्यालाच अनन्य शरण जावे, अशा भावयुक्त सेवा करणाऱ्यांचा देव संरक्षिता होतो. म्हणून भक्ताने चिंता, भय, शोक आदी विपरित भावना समूळ टाकून देऊन दयाघन अशा भगवंतालाच आळवावे. जीवनातील 'श्रेय' काय 'प्रेय' काय याचा विवेक नेहमी जागा ठेवावा. देह, दारा, पुत्र, वित्त या सर्वच गोष्टी मायिक-नाशिवंत आहेत हे जाणून त्या नित्य, शाश्वत अशा आत्मपद-प्राप्तीचाच ध्यास घ्यावा ही खरी भक्ती-उपासना आहे. उपासनेने मन, बुद्धी, चित्त, अहंकार यांचा पूर्ण लोप होऊन जावा. प्रपंचाची आसक्ती संपून जावी. लौकिकाची क्षिती न धरावी, चित्ताला उपरती व्हावी म्हणजे भगवद् भक्ती घडू लागते. अखंड नामस्मरण करावे. आपल्या ठायीचे सात्विक भाव जागृत व्हावेत, हेच भक्ताठायीचे अतुलनीय वैभव आहे. देवच भोक्ता देवच कर्ता असा अनन्य भाव ठेवावा. म्हणजे प्रासंगिक येणाऱ्या हर्ष उद्वेगादी भावनांनी भक्तीभाव डळमळत नाही. देव आपले शुद्ध मनोरथ पूर्ण करणारा आहेच यावर दृढ विश्वास ठेवावा... स्वामी स्वरुपानंदांना प्रिय असणाऱ्या भक्ताची लक्षणेच या उपासनाविषयक (१२ ते २२) पत्रांमधून व्यक्त झालेली आहेत.

त्या पुढील (२३ ते ३३) अकरा पत्रांमधून परंपरा प्राप्त सोऽहं साधनेचे स्वरुपही नकळत सांगितले गेलेले आहे. जो अहंकारयुक्त होऊन मोहजाळी गुंतून ममत्वात गुरफटतो तो आत्महत्याराच ठरतो... सद्‌गुरु भेटले, त्यांनी बोध केला म्हणजे मग साधनेतच साधकाने तत्परतेने रमून गेले पाहिजे. मनानेच मन मागे सारीत, आत्मरुपापर्यंत शोध घ्यावा. सगुणाचे मूळ निर्गुण. त्या आपल्या मूळ निर्गुणापर्यंत अभ्यासाने जावे. मी देह नव्हेच. हा अभ्यास दृढ करावा. विक्षेप आले तरी ते टाकून द्यावेत. सद्‌गुरुंना वारंवार शरण जावे. येणारे सर्व संकल्प-विकल्प त्यांना सांगावेत. ते कृपा करतात. त्यामुळे सोऽहं भाव जागृत होतो. अखंड प्रसन्नतेचा लाभ होतो. मिथ्या कल्पना मावळतात. नित्य नव्या समाधानाची प्राप्ती होते. त्यातून शाश्वत स्वरुपाचा ठाव मिळतो. सोऽहं हा बोधही आहे. तो प्राप्त होताच भेदाभेद मावळून जातात. सर्वाभूती एक आत्माच ओतप्रोत भरलेला आहे. त्या आत्म्याशिवाय अन्य काही नाही हेच आकळू लागते. द्रष्टा, दृश्य, जीव-जगत् सारे काही एक तत्त्वच भरून राहिलेले आहे, हे ध्यानी येते. ही आत्मस्थिती

सुख-दुःखातीत आहे. इथे देव भक्त एक होऊन जातात. स्वामी स्वरुपानंदांना हा अनुभव प्राप्त झाल्याचे ते स्वच्छ शब्दांत मान्य करतात.

*आता मज ऐसा जो का अनुभव ।*
*तोचि तुम्हां सर्व सांगितला ॥...*
*सांगितला तरी येथे कोणी कोणा ।*
*श्रोता वक्ता जाणा तोचि एक ॥*

असा मोठा मार्मिक-आत्मानुभव ते मांडतात.

असा अनुभव प्राप्त व्हावा असे वाटत असेल तर (भावार्थ) गीता वाचावी. श्रवण, मनन, चिंतन करावे. गीतेचा दुसरा अध्याय, बारावा अध्याय त्या दृष्टीने फार महत्त्वाचा आहे याचाही उल्लेख स्वामी करतात. 'भाव तैसा देव' हे सूत्र तर पारमार्थिकांनी सदैव लक्षात ठेवावे, असे महत्त्वाचे आहे. नित्य नियम हवा. अंतरी उत्कट भावना असाव्यात. संसारी अलिप्तपणा साधून अखंड सोऽहं भजन करावे. सद्‌गुरुवर एकलव्यासारखी भक्ती करावी. संसार हा ज्याच्या त्याच्या प्रारब्धानुसारच घडत असतो हेही ध्यानी घ्यावे. आत्मनिवेदन साधीत, साधीत पूर्णत्वास पोहोचावे. मनाचे मनपण पूर्ण संपून ते चैतन्यात समरस करावे ही सोऽहं साधना ! मन पवन एक करीत गगनात प्रवेश करावा. आत्मा सर्वगत आहे. तो नित्य, शुद्ध, बुद्ध आहे. अलिप्त आहे हे अनुभवावे. विश्वरूप हे आत्म्याचेच प्रगटीकरण आहे हे जाणून आपण सर्वार्थाने विश्वरूप होऊन जावे, हा नाथपंथाचा बाणा आहे. पाहाल ते जनार्दन रूप. ऐकाल तेही जनार्दनाचेच रूप. चाखाल, वास घ्याल, स्पर्श कराल ते सारे जनार्दन रूपच आहे, असा अनुभव शेवटी प्राप्त होतोच होतो!

ही स्वरूपाची ओळख झाली की आपोआप जन्ममरण संपून जाते. देहीच विदेही अवस्था प्राप्त होते. हेच आत्मज्ञान होय. संसार मोक्षमय होऊन जातो तो असा. सद्रूप, चिद्रूप, आनंदरूप हे विश्व आणि आपणही तसेच हे समजून अखंड समाधानाची प्राप्ती होत रहाते. अशी सोऽहं साधनेची प्रक्रिया या पत्रांमधून प्रसंगा-प्रसंगाने प्रकट झालेली आहे.

फोडुनी शब्दांचे अंतर । वस्तू दाखवी निजसार । तोचि गुरु माहेर-अनाथांचे ॥ (५-२-१५) अशी सद्‌गुरु ओळखण्याची एक खूण समर्थांनी दासबोधात सांगितली आहे. स्वरूप पत्रमंजुषेत १३ ते २२ या गटातील पत्रात श्रीराम प्रभू, शिवशंकर, श्रीदत्तात्रेय या देवदेवतांच्या उपासना कशा कराव्यात या संदर्भात स्वामींनी मार्मिक मार्गदर्शन केले आहे. त्यातील एका पत्रात दत्तगुरुंच्या स्तुतिमंत्राचा नामगजर दिला असून त्याचे अधिक स्पष्टीकरण त्याच पत्रात केलेले आहे. ते समग्र पत्र मुळातून वाचण्यासारखे आहे.

*भावन प्रापक दिगंबरा । कोशरक्षक दिगंबरा ।*
*सर्वरक्षक दिगंबरा । आरोग्यवर्धक दिगंबरा ॥...*

असा गजर आहे. अशा नामघोषाने पापे नष्ट होतात. त्रिताप नष्ट होऊन जातात. अज्ञान दैन्य नाहीसे होते. भवभय संपून जाते... त्या मंत्रातील अर्थ स्पष्ट करताना स्वामी लिहितात -

*अहंतेने जीव बांधला ।*
*सुखदुःखादि द्वंद्वी अडकला ।*
*देहचि मानी आपणाला ।*
*म्हणोनी मुकला 'निजधनाते' ॥५॥*
*तेचि तयाचे मुक्त धन ।*
*सोऽहं भावे देसी दाखवून ।*
*'कोश रक्षक' होऊनि आपण ।*
*करिसी जतन तयाचे तू ॥६॥...*
*सदा सर्वांते संरक्षिसी ।*
*म्हणोनि 'सर्व रक्षक' म्हणू तुजसी ।*
*तो तू विसरोनी अतुल्या श्रीवासी ।*
*काय उपेक्षिसी निजभक्ता ॥७॥...*

असे मार्मिक पारमार्थिक आशय स्वामींच्या निर्मळ-ज्ञाननिष्ठेमधून प्रगट होतात. स्वामी साधकांना सन्मार्ग दाखविणारे सद्‌गुरु होते हे सहज लक्षात येण्यासारखे आहे. सगुणोपासना करणाऱ्या भक्ताला खरे परमार्थ सुख लाभावे त्यासाठी त्याची परमार्थ बुद्धीच विशाल, व्यापक करावयास पाहिजे हे स्वामी पूर्ण जाणून आहेत.

स्वामीजींनी या संदर्भातील पत्रांमधूनच साधकदशेचीही वैशिष्ट्ये स्पष्टपणे कथन केली आहेत. साधक न पाहे संपत्ति । साधक न पाहे विपत्ति । चित्तासी होता उपरति । जडली प्रीति भगवंती ॥... नाही प्रपंची आसक्ती । लौकिकाची न धरी क्षिती । अखंडे करणे भगवद्‌भक्ती । परम गती हेचि मानी ॥... यासारख्या गौरवामधून स्वामीजी भक्ताचे यथार्थ वर्णन करून प्रिय वाटणाऱ्या आपल्या सुहृदांचे भावबळही वाढविताना दिसतात. प्रपंची निश्चिंत राहा. प्रारब्ध भोग कोणासही चुकलेले नाहीत... अर्धपोटी राहावयाची पाळी आली तरीही भगवद्‌भजन न चुकावे... श्रीराम आणि सद्‌गुरु समर्थ दोघे एकच आहेत यावर श्रद्धा असो द्यावी, अशा गोष्टींचा यथोचित उपदेश ते कृपाळुपणे करतात. चंचल भक्ती संपून जावी व निश्चलाचे ठायी विवेकाने भक्ती जडावी हा त्यात हेतू दिसतो.

भक्त, साधक होऊन जन्माचे सार्थक निश्चित करता येतेच. केवळ व्यवहारी आणि प्रापंचिक होऊन जीवन जगायचे असेल तरीही - काही मूल्ये पाळूनच जीवन जगा असा आग्रह (१ ते १२) प्रारंभीच्या पत्रांमधून धरतात. प्रपंच वेगळा व परमार्थ वेगळा अशी वस्तुस्थिती नसतेच. स्व-हित साधताना 'स्व' ची व्यापकता वाढवावी. त्याला आदर्शाप्रत न्यावे म्हणजे झाले ! प्रथमतः स्वामी सांगतात -

*धंदा व्यवहार ओघासी जो आला ।*
*पाहिजे तो केला दक्षपणे ॥...*

अर्थ काम हे दोन्ही पुरुषार्थ भोगण्यासाठीच आहेत हेही मान्य. पण त्या भोग भोगण्यालाही विवेकाचा आधार हवाच हवा. धन स्वधर्माच्या आश्रयाने मिळवावे. संयम, नीती यासह धर्माच्या आचरणासहित धन मिळवावे. शेवटी शांती समाधान हेच अंतिम साध्य आहे. अर्थ मिळविण्याच्या हव्यासात 'अनर्थ' पदरी पडता कामा नये. काम भोगाने दारुण दुःखाचा धनी होऊन जाता कामा नये. स्वामी स्पष्टपणे उपदेश करतात -

*स्वधर्मानुसार पाळोनि संयम ।*
*अर्थ आणि काम भोगी जो का ॥*
*नको मुक्तीसाठी धुंडावया कोठे ।*
*शोधित ती येते तयालागी ॥...*

स्वामींनी स्वतंत्रता व परतंत्रता याचे मार्मिक अर्थ केले आहेत. संयमाची पूर्णावस्था । तयासीच नाव 'स्वतंत्रता' । सर्वथा प्रकृतीची सत्ता । 'परतंत्रता' तीच जाणा ॥...

संयमी माणूसच आत्मप्राप्ती करून घेऊ शकतो आणि प्रकृती आधीन झालेला - स्वैराचारी बनून अधोगतीस पावतो. क्लेश, दुःखे, संकटे त्याच्या वाट्याला नेहमी येतात. पण जो देहाभिमानी न होता, संसारव्यथा बाजूला ठेवून सात्त्विक वृत्तीने जीवन जगतो तो धन्यतेला प्राप्त होतो. सुख, समृद्धी, समाधान या गोष्टी सद्गुरुकृपेने प्राप्त होतात. निजभक्ताचे संरक्षण देव-सद्गुरु करतात हे ओळखून सावध, साक्षेपी, दक्ष माणूस काया, वाचा, मनाने ईश्वरास शरण जातो. उदंड यत्न जरुर करावेत पण यशापयशाच्या संदर्भात उदासीन राहून फल ईश्वरचरणी अर्पण करावे. जो ईश्वराचा अंकित होतो - त्याचे तो सदैव संरक्षणच करतो हे ओळखावे. सत्य प्रीतीने, विनयवृत्ती ठेवून संतोषाने जीवन जगावे... अशा आशयाचा प्रपंच विचार स्वामींनी मांडलेला आहे. संसार प्रपंची रमलेला जीवही समाधानाचा अक्षय्य ठेवा मिळवू शकतो हेच पर्यायाने स्वामींना सांगावयाचे आहे.

*चित्त ठेवावे प्रसन्न । कदापिही न व्हावे खिन्न ।*
*भावे करावे सोऽहं ध्यान । स्वरुपानुसंधान राखोनी ॥*

हा स्वामींचा मुख्य उपदेश आहे.

स्वामीजींच्या या सर्व पत्रांमधून स्वामींचेही मनोगत कळते. अंतरंग दर्शन होते. कर्म, उपासना, ज्ञान या संदर्भातील त्यांची बैठक समजते. स्वामीजी सकलांची अंतःकरणे आधी सहानुभूतीने जाणतात. त्यांच्या ठायीच्या सद्गुणांचा मुक्त कंठाने गौरव करतात. मग योग्य ते प्रबोधन मार्मिक शब्दांत करतात. समर्थ सांगतात त्या प्रमाणे

आधी अंतर हाती घ्यावे । मग हळूहळू उकलावे ।

नाना उपाये न्यावे । परलोकासी ॥... हे चातुर्य स्वामीजींच्या ठायी होतेच. शिवाय स्वामीजी शास्त्राधारे बोलतात. परमार्थाचा विस्तार करतात. स्वधर्माची ध्वजा उभारतात. भक्तमंडळी सुखी व्हावीत यासाठी अध्यात्म विद्या सोपी करून देतात. उपासनेच्या दिशा स्पष्ट करतात. कारण स्वामीजी स्वतः सत्कीर्तीचे पुरुष होते. परमेश्वराचे अंश होते. धर्मसंस्थापनेचा ध्यास त्यांच्या अंतर्यामी नित्य वसत होता... हे सारे या पत्रमंजुषेत आढळते !.

**प्रा. मधुकर अनंत कुलकर्णी तथा स्वामी प्रज्ञानंद**
२६३, 'ई', चैतन्य अपार्टमेंट,
ताराबाई पार्क, कोल्हापूर - ३.

## अभंग

मज स्वरुपानंद गुरु लाभले । जीवनाचे सार्थक झाले ॥
सत्कर्मे ती घडवून हाती परोपकारा जीवन जगती
सदाचार ते अंगी बाणले ॥१॥
तूच माझी मायमाऊली । अंर्तयामी मूर्ति वसली ॥
भेटीसाठी मन आतुरले ॥२॥
तूची ब्रह्मा, विष्णु, महेश तूची सर्वांचा जगदीश
सन्मार्गी तू चाल वदले ॥३॥

**सौ. मृणाल सुहास थोरात**

## चला हो सज्जनगड



चला चला हो सज्जनगड जावू
रामदासांचे दर्शन घेवू
नाही चढाया पायरी अवघड
चला चला हो सज्जनगड
सज्जनगडावरी हो जावू
दर्शनाला हो बारी लावू
रामदासांची समाधी डोळे भरूनी पाहू
चला चला हो सज्जनगड जावू
तिथे महाप्रसाद तिर्थ घेवू
वसुंधरेच्या महाली जाऊ
तिथे थोडी विश्रांती घेऊ
रामनाम हे मुखी म्हणू
चला चला हो सज्जनगड जावू
दिदिंच्या चरणी दंडवट माझा कोटी कोटी
रामनाम सतत येवू दे सतत माझ्या ओठी
श्रीराम जयराज जयजयराम
जय जय रघुवीर समर्थ

**सौ. सुरेखा घोरे**
मांगडेवाडी

# एका आधुनिक संताचे भावदर्शन

**डॉ. हे. वि. इनामदार.**

*एम.ए.एल.एल.बी. पीएच. डी. डॉक्टरेट 'संत नामदेव' या विषयावर. सेवानिवृत्त प्राचार्य एस.एन.डी.टी. माजी अध्यक्ष गीता धर्म मंडळ, पुणे. २५-२६ पुस्तके प्रसिद्ध. विद्यापीठ पातळीवरील उत्कृष्ट शिक्षक म्हणून राज्य पुरस्कार. विद्यापीठावर मार्गदर्शक अध्यापक.*

'निवृत्ति-ज्ञानदेव-सोपान-मुक्ताबाई-एकनाथ-नामदेव-तुकाराम' हा उद्घोष वारकरी भक्तांच्या मनीमानसी रुजलेला आहे. ज्ञानदेवांच्या प्रभावळीतील सर्व प्राचीन संत, मराठी मनाच्या विटेवर अठ्ठावीस युगे नांदत राहणार आहेत. या संदर्भात आणखी एक सुखद घटना मनोमन जाणवते. अर्वाचीन संतांनाही अलीकडे चांगले दिवस आले आहेत. उपासक हे या संतसज्जनांची पावन स्मृती अतीव श्रद्धेने जागवीत आहेत आणि साहित्याचा उत्कंठेने मागोवा घेत आहेत. विद्यापीठीय पातळीवरील संशोधन-प्रकल्प म्हणून अर्वाचीन संतांचा अभ्यास होत आहे. आधुनिक अभ्यासक 'एक ग्रंथकाराभ्यास' या भूमिकेवरून अर्वाचीन संतांकडे वळले आहेत. हे सारेच चित्र विलोभनीय आहे; स्पृहणीय आहे.

## अर्वाचीन संतांचा अभ्यास

श्री वासुदेवानंद सरस्वती (सुनीता ज. जोशी, पुणे), श्री. गुलाबराव महाराज (कृ. मा. घटाटे, नागपूर), श्री. दासगणू महाराज (ग. प्र. परांजपे, पुणे) श्रीहंसराज स्वामी (कल्याण काळे, पुणे), आचार्य विनोबा भावे (अ. दे. अडावदकर, नागपूर), पंत महाराज बाळेकुंद्रीकर (म. बा. जोशी, कोल्हापूर) अशा अर्वाचीन संतांविषयीचा ग्रंथकाराभ्यास सादर करणाऱ्या प्रबंधांना त्या त्या विद्यापीठांची डॉक्टरेट ही पदवी प्राप्त झाली आहे; एवढेच नव्हे तर हे सर्व प्रबंध ग्रंथरूपाने प्रकाशितही झाले आहेत.

अर्वाचीन संतविषयक प्रबंध-ग्रंथांच्या या श्रेय-नामावलीत आणखी एका नाममुद्रेचा समावेश करण्याचा सुयोग आला आहे. कोल्हापूर येथील प्रा. बळवंत नाथा तुरंबेकर यांनी 'स्वामी स्वरूपानंद यांच्या वाङ्मयाचा अभ्यास' या विषयावरील आपला प्रबंध शिवाजी विद्यापीठास फेब्रुवारी १९९५ मध्ये सादर केला. विद्यापीठीय मराठी विभागाचे प्राध्यापक आणि प्रमुख म्हणून डॉ. लक्ष्मण रामदास नसिराबादकर हे त्या वेळी काम पाहात होते. संत साहित्याचे साक्षेपी समीक्षक आणि समाजमनस्क प्राध्यापक म्हणून डॉ. नसिराबादकरांचा लौकिक आहे. त्यांचे समर्थ व सहृदय मार्गदर्शन प्रा. तुरंबेकरांना लाभले. प्रस्तुत प्रबंध विद्यापीठ-नियुक्त परीक्षकांना पसंत पडला. शिवाजी विद्यापीठाची पीएच. डी. (मराठी) ही पदवी त्याबद्दल प्रा. तुरंबेकरांना मिळाली. त्यांनी मूळ प्रबंधाचे संस्करण करून त्याची सुरेख मुद्रण-प्रत सिद्ध केली. पंत महाराज बाळेकुंद्रीकरांच्या परंपरेतील एक सश्रद्ध उद्योजक म्हणून कोल्हापूरचे श्री. विवेक चौधरी हे ओळखले जातात. त्यांच्या 'अवधूत प्रकाशन' या संस्थेतर्फे हा प्रबंध आता ग्रंथरूपाने प्रकाशात येत आहे. स्वामी स्वरूपानंदविषयक अभ्यासकाचा प्रस्तुत प्रकल्प पंत महाराजांच्या उपासकाने प्रकाशित करावा, हा खरोखर मणिकांचनयोग आहे, त्यामागील औचित्य केवळ अपूर्व आहे.

## ग्रंथाची मांडणी

मनोगत, आठ प्रकरणे, एक परिशिष्ट आणि दोन सूची यांमध्ये प्रस्तुत ग्रंथ लेखकाने सादर केला आहे. रत्नागिरी जिल्ह्यातील 'पावस' या गावाला स्वामी स्वरूपानंदांच्या पावन वास्तव्यामुळे क्षेत्रमहिमा प्राप्त झाला. त्यांची साहित्यसंपदा गुणसंपन्न आहे. विचारवैभव, वाङ्मयविशेष, अनुभवसमृद्धी आणि विषयांची विविधता यांमुळे त्यांचे समग्र साहित्य उद्बोधक आणि अभ्यासनीय ठरते. स्वामीजींचे व्यक्तिमत्त्व व त्यांचे वाङ्मय यांतील अनुबंध, साहित्यनिर्मितीमागील त्यांची प्रेरणा आणि त्यांच्या साहित्याची समीक्षा अशा अंगांनी आपण हा ग्रंथकाराभ्यास सादर करीत आहोत, हे लेखकाने मनोगताच्या या निवेदनात आरंभीच स्पष्ट केले आहे.

यानंतर, आपल्या वाङ्मय-विवेचनाला पोषक ठरतील अशा पहिल्या दोन प्रकरणांतून लेखकाने अभ्यासाची पार्श्वभूमी विशद केली आहे. स्वामी स्वरूपानंदपूर्व संतपरंपरा हा पहिल्या प्रकरणाचा विषय आहे. दुसऱ्या प्रकरणात स्वामीजींचे चरित्र, तसेच त्यांचे आध्यात्मिक आणि सामाजिक कार्य यांचा परिचय करून दिला आहे. त्यापुढील पाच प्रकरणांतून स्वामीजींच्या विविध ग्रंथांचा क्रमशः परामर्श घेण्यात आला आहे. अमृतधारा, मृत्युपत्र, भावार्थगीता, संजीवनी गाथा, अभंग ज्ञानेश्वरी, अभंग अमृतानुभव, अभंग चांगदेव पासष्टी आणि स्फुट रचना, हे स्वामीजींचे समग्र साहित्य अध्यात्मपर आहे. ते विपुल, वेधक आणि वेचक आहे. स्वामीजींचे ग्रंथ हे त्यांच्या व्यक्तिमत्त्वाचे उघडे गवाक्ष कसे आहे, याविषयीचा वेध समारोपाच्या शेवटच्या प्रकरणात लेखकाने मार्मिकपणे घेतला आहे.

विषय-सूची आणि संदर्भ साहित्य-सूची या व्यवस्थित स्वरूपात दिलेल्या आहेत. अशा प्रकारे प्रस्तुत ग्रंथाची मांडणी सुसंगत आहे; संशोधन पद्धतीला धरून ही मांडणी केली आहे.

## ग्रंथाचे अंतरंग

स्वामीजींच्या व्यक्तिमत्त्वाची जडणघडण कशी होत गेली, हे दुसऱ्या प्रकरणाच्या पूर्वार्धात लेखकाने साधार उलगडून दाखविले आहे. अनुवंश, निसर्ग, काळ व परिस्थिती या चार घटकांच्या अद्‌भुत रसायनातून ('फ्यूजन'मधून) माणसाचे व्यक्तिमत्त्व आकार घेत असते. त्यांपैकी अनुवंश, काळ व परिस्थिती या घटकांचा प्रभाव स्वामीजींच्या व्यक्तिमत्त्वावर कसा पडत गेला, याची मीमांसा लेखकाने मार्मिक स्वरूपात केली आहे. मात्र 'निसर्ग' या घटकाचीही नोंद घ्यायला हवी होती. पूर्वाश्रमीचे श्री. गोडबोले हे पुढे स्वामी स्वरूपानंद म्हणून संत-पदवीपर्यंत जाऊन पोहोचले. महामहोपाध्याय दत्तो वामन पोतदारांचे लेखनिक म्हणून काम करणारे हे गोडबोले लौकिकाकडून अलौकिकाकडे वळले, कारण आतील ऊर्मीच त्यांना परमार्थमार्गाकडे घेऊन गेली. 'तुका म्हणे झरा । आहे मुळीचाचि खरा' अशी ही आंतरिक ओढ होती. 'जीव ओढतो वर वर जाया चैतन्यापाठी' असा या व्यक्तिमत्त्वाचा प्रकार होता. त्यामुळे नैसर्गिक प्रेरणा या घटकाचाही प्रभाव स्वामीजींच्या बाबतीत विचारात घेतला पाहिजे.

- याच संदर्भात आणखी एका मुद्याचा विचार करणे योग्य ठरेल. स्वामीजींचे लौकिक व्यक्तिमत्त्व आणि त्यांचे वाङ्मयीन व्यक्तिमत्त्व एकरूप आणि एकरस असल्याचे या ग्रंथात प्रत्ययकारी पद्धतीने विशद केलेले आहे. ग्रंथाच्या गुणवत्तेचेच ते निदर्शक आहे. मात्र इथेच दोन गोष्टींचा खुलासा अपेक्षित होता. एकतर 'वाङ्मयीन व्यक्तिमत्त्व' ही संकल्पना सुस्पष्ट करणे गरजेचे आहे; दुसरे असे की, लौकिक व्यक्तिमत्त्व आणि वाङ्मयीन व्यक्तिमत्त्व या दोहोंत अद्वैत असते किंवा कसे, याविषयी दोन मते आहेत. कवीच्या खाजगी आयुष्याचा त्याच्या काव्यजीवनाशी संबंध नसतो; तसा तो संबंध लावू नये, असे एक मत आहे. 'कविराज चंद्रशेखर' या आपल्या लेखात विठ्ठलराव घाटे यांनी या मताचा पाठपुरावा केला आहे. चंद्रशेखर कारकुनी करायचे. बडोद्यास 'मामाचा पोळ' या वस्तीत ते गरिबीने राहायचे. पण काव्यवाचनात ते रंगले की, 'कसा आहे झेलम-काठचा हा गालिचा ?' असे विचारायचे. दुसऱ्या मताप्रमाणे, कवीचे लौकिक जीवनच त्याच्या काव्यात प्रतिबिंबित होते. राजकवी यशवंतांची परिस्थिती गरिबीची होती. ''जूं बैसलें मानेवरी । चाबूक हा पाठीवरी'' असे स्थिर नैराश्य त्यामुळेच त्यांच्या कवितेतून व्यक्त होत होते.

- या दोन्ही मतांचा संदर्भ देऊन स्वामीजींच्या वाङ्मयीन व्यक्तिमत्त्वाची ओळख करून देणे अधिक उचित ठरेल.

स्वामी स्वरूपानंदांच्या समग्र ग्रंथसंपदेचा सविस्तर आणि सूक्ष्मदर्शी परामर्श या ग्रंथाच्या निमित्ताने प्रथमच घेतला गेला आहे. 'मृत्यूपत्र' आणि 'अमृतधारा' या दोन ग्रंथांतून त्यांचा जीवनालेख चित्रित झाला आहे; व त्यांच्या आयुष्यातील काही प्रसंग या ग्रंथांच्या निर्मितीस कारणीभूत ठरले आहेत, हे लेखकाने संयमाने आणि सम्यक स्वरूपात सांगितले आहे. 'भावार्थगीता' ही भगवद्‌गीतेची साकीबद्ध मराठी अनुवादाची काव्यकृती आहे; व या कृतीत स्वामींची स्वतंत्र प्रतिभाही प्रकट झाली आहे, हे लेखकाने नेमकेपणाने दाखवून दिले आहे.

अभंग ज्ञानेश्वरी, अभंग अमृतानुभव व अभंग चांगदेव पासष्टी या स्वामीजींच्या तिन्ही ग्रंथांचा लेखकाने घेतलेला परामर्श त्याच्या सूक्ष्म अभ्यासातून सिद्ध झाला आहे. ज्ञानदेवांच्या या मूळ तीन ओवीबद्ध ग्रंथांचा स्वामीजींनी 'अभंग'रूप अनुवाद केला, कारण अभंग हे जसे एक वृत्त आहे, तशीच ती एक वृत्तीही आहे. ज्ञानदेवांच्या भावार्थाला धक्का न लावता, काव्यस्वरूपातच त्यांच्या रचनांना अर्वाचीन मराठीचा साज चढविण्याचे कार्य स्वामींनी रससंपन्न काव्यशैलीत कसे केले; तसेच ज्ञानदेवांचे ग्रंथ आणि स्वामीजींनी त्या ग्रंथांचे केलेले अनुवाद यांत बिंबप्रतिबिंब-भाव कसा आहे, हे या ग्रंथात साधार आणि सविस्तर स्पष्ट करण्यात आले आहे. विनोबांची 'गीताई' आणि स्वामीजींची 'अभंग ज्ञानेश्वरी' यांचा तौलनिक रसास्वाद घेता आला असता, तर हे सारेच विवेचन अधिक प्रभावी झाले असते.

स्वामीजींच्या गद्य-पद्यात्मक स्फुट रचनांनी लेखकाने करून दिलेली ओळख अभिनव आणि सर्वस्पर्शी आहे. तीन (गद्यरूप) प्रवचने, काही पत्रे, स्वरूप-पत्र-मंजुषा, गीतातत्त्वसार, स्फुट काव्ये, नवरत्नहार, बोधवचने, अशा स्फुट लेखनातील त्यांचे तत्त्वचिंतन हे त्यांच्या ग्रंथगत तत्त्वज्ञानाशी कसे सुसंगत आहे, याचा आढावा लेखकाने सुसूत्रपणे घेतला आहे.

## समारोप

आपल्या समग्र अभ्यासाचे फलित लेखकाने पुढील शब्दांत मांडले आहे : ''स्वामी स्वरूपानंदांचे वाङ्मयीन कर्तृत्व मौलिक स्वरूपाचे आहे, संतत्व हे त्यांच्या एकूण लेखनाचे केंद्रस्थान आहे. हे संतत्व विशाल, व्यापक, व मानवतावादी आहे. सखोल जीवनाशय हे त्यांच्या साहित्याचे वैशिष्ट्य आहे. सत्य, शिव, व सुंदर या मूल्यांनी त्यांची साहित्यनिर्मिती संपन्न झाली आहे. संतसाहित्याची उज्ज्वल परंपरा तेवत ठेवून स्वामी स्वरूपानंदांनी बहुमोल कार्य केले आहे.''

डॉ. बळवंत तुरंबेकरांच्या या अभिप्रायाशी सहजपणे सहमत होता यावे, अशाच तोलामोलाचा ग्रंथ त्यांनी वाचकांच्या हाती दिला आहे. व्यासंगप्रेमी संशोधन-छात्र, समर्थ संशोधन-मार्गदर्शक आणि संतप्रेमी सश्रद्ध प्रकाशक असा त्रिवेणी संगम इथे झाला आहे. हा केवळ वाचून हातावेगळा करण्याचा ग्रंथ नाही. 'नामा म्हणे ग्रंथ श्रेष्ठ ज्ञानदेवी । एकतरी ओवी अनुभवावी।।' - या न्यायाने स्वामी स्वरूपानंदांचा परमार्थ-विचार यथाशक्ती आपल्या जीवनात अवलंबिण्याचा संदेश इथे मिळतो. आनंदस्वरूप स्वरूपानंदाविषयीचा प्रस्तुत अभ्यास वाचकांना संतोष देईल.

'- ग्रंथु निका जाला असे !'

'अरूपाचे स्वरूप' - (स्वामी स्वरुपानंद : जीवन आणि वाङ्मय)

लेखक : डॉ. बळवंत ना. तुरंबेकर

**डॉ. हे. वि. इनामदार**

८६०/१५ भारती निवास कॉलनी,

एरंडवणा, पुणे - ४११ ००४.

# "श्री गीतातत्त्वसारामध्ये" स्वामीदर्शन

प्रा. डॉ. ग. वा. करंदीकर

*प्रबंध - समर्थ रामदासांची अध्यात्मपर स्फुट प्रकरणे – एक विवेचक अभ्यास. ३३ वर्षे अध्यापन कार्य. मराठीचे प्राध्यापक. चार पुस्तके प्रकाशित. १० वर्षे गीता धर्म मंडळ पुणे संस्थेचे सहकार्यवाह.*

श्रीमद्भगवद्गीता हा ग्रंथ अनेक आचार्यांचा, पंडितांचा, कवींचा, अभ्यासकांचा आवडता ग्रंथ आहे. श्रीज्ञानदेवांनी या ग्रंथाचा महिमा परोपरीने सांगितलेला आहे. प्रत्यक्ष वेद आपले न्यून्य कमी व्हावे या उद्देशाने गीतारूपाने भगवंताच्या मुखातून अवतीर्ण झाले.

***म्हणौनि वेदांची सुसेव्यता । ते हे मूर्त जाण श्रीगीता ।***
***श्रीकृष्णे पंडुसुता । उपदेशिली ॥(ज्ञाने. १८.१४५६)***

अर्जुनाच्या निमित्ताने जगाचा उद्धार होण्यासाठी गीतेचा अवतार झाला. प्रत्येक आचार्यांनी आपल्या संप्रदायाचा आधार ग्रंथ म्हणून गीतेचा गौरव केला. विशिष्ट संप्रदायाची परंपरा लक्षात घेऊन गीतेचा अर्थ समजून घेता येतो. वेदवाङ्मयात ज्ञान, भक्ती आणि कर्म ही तीन कांडे आहेत. तीच गीतेने पुन्हा प्रतिष्ठिली आहेत; परंतु संप्रदायानुसार त्यांपैकी एकाला प्राधान्य मिळते व दुसरी दोन त्याच्या अनुषंगाने समजून घ्यावी लागतात. गीतार्थ समजण्यासाठी सद्गुरु लाभावा लागतो. तो प्रसन्न झाला तर शिष्याला विद्या प्राप्त होईल. परंतु त्या विद्येचे संप्रदायाप्रमाणे अनुष्ठान केले तरच ती विद्या फलद्रूप होते. श्रीज्ञानदेवांनी संप्रदाय-निष्ठा स्पष्ट करताना अमृतमंथनाचा दाखला देऊन सांगितले आहे की, अमृत प्राप्त व्हावे या उद्देशाने समुद्रमंथन केले तरी प्रथम हलाहल निर्माण झाले. जगाचा ताप हरण व्हावा म्हणून महादेवाला ते हलाहल कंठस्थ करावे लागले. दुभती गाय असली तरी धार काढण्याच्या वेळी तिलाही आंजारावे-गोंजारावे लागते. ती हातोटी ज्याला प्राप्त झालेली असते त्यालाच धारोष्ण दूध मिळते, इतरांना तिच्या लाथा खाव्या लागतात ! म्हणून 'गीताशास्त्र' समजून घेण्यासाठी योग्य संप्रदाय निवडावा लागेल. त्या संप्रदायाचे नीतिनियम समजून घ्यावे लागतील. गीतार्थ समजून घेण्यासाठी सद्गुरुंची प्रसन्नता असावी तरच

***तयांचा श्रवणपुटीं । गीतेची अक्षरें जंव पैठीं ।***
***मेतीना तव उठाउठी । पळेंचि पाप ॥ (ज्ञाने. १८.१५३०).***

सद्गुरु मुखातून गीताक्षरे ऐकता आली तर शिष्याचे दुरित दूर होते. हा श्रीज्ञानदेवांचा आदेश लक्षात घेऊन स्वामी स्वरुपानंदांनी आपल्या आवडत्या शिष्य वर्गासाठी प्रसन्नचित्त होऊन 'श्रीगीता-तत्त्व सार' हा ग्रंथ सिद्ध केला आहे.

स्वामी स्वरुपानंदांनी श्रीज्ञानदेवांच्या 'पदाची कोर' न सोडता भावार्थ दीपिकेच्या प्रकाशात 'गीतादर्शन' करून घेतले. श्रीभगवद्गीतेत 'हरिदर्शन' होते तर ज्ञानेश्वरीत 'गीतादर्शन' होते. स्वामीजींनी श्रीज्ञानेश्वरीच्या सुमारे नऊ हजार ओव्यांपैकी एकशे नऊ ओव्यांची निवड करून 'श्री ज्ञानेश्वरी-नित्यपाठ' हे स्तोत्र आपल्या संप्रदायासाठी सिद्ध केले. स्वरुपानंदांच्या शिष्यवर्गात हे स्तोत्र अनेकांनी नित्य पठणात ठेवले. स्वामी स्वरुपानंदांनी श्रीमद्भगवद्गीतेचा साकीबद्ध अनुवाद करून 'श्रीमत् भावार्थ गीता' हा ग्रंथही प्रसिद्ध केला; त्यामुळे संस्कृत गीतेचा साकीबद्ध मराठी अनुवाद उपलब्ध झाला.

एकाच गव्हाच्या पिठापासून शेवया तयार होतात, पुरणपोळी तयार होते, मांडे तयार करता येतात. या शिवाय पाककला जाणणाऱ्याला विविध पक्वाने निर्माण करता येतात. त्यातील मुख्य पदार्थ गहू असतो. त्याप्रमाणे मुख्य गीतातत्त्वाचा विविधांगी आविष्कार स्वामीजींनी केला आहे. 'अभंग ज्ञानेश्वरी' असो, 'श्रीज्ञानेश्वरी नित्यपाठ' असो श्रीमद्भावार्थ गीता असो. त्या सर्व ठिकाणी 'गीतातत्त्वाचाच' पाठपुरावा केलेला आहे.

गीता-ज्ञानेश्वरी भक्तांना ही पक्व फळे पुनःपुन्हा चाखाविशी वाटतात. स्वामीजींचे एक शिष्य श्री. श्री. गो. कोकजे गुरुजी यांनी स्वामीजींनी केलेला 'गीतेचा साकीबद्ध अनुवाद' आणि 'श्रीज्ञानेश्वरी नित्यपाठातील ओव्या' समोरासमोर ठेवून ते हस्तलिखित स्वामी स्वरुपानंदांना दाखविले. त्याबरोबर असे लक्षात आले की, ज्ञानेश्वरी नित्य पाठातील ओव्यांशी मिळत्या-जुळत्या साक्या नव्याने लिहाव्या लागतील ! श्रीज्ञानदेवांनी मंथन करून 'गीता सार' समजावून दिले. त्या नित्यपाठाच्या एकशेनऊ ओव्यांत केवळ गीतेचे सार नाही तर मुख्यतः ज्ञानेश्वरीचाही सारांश आलेला आहे. स्वामीजींनी श्रीज्ञानेश्वरीच्या नित्यपाठातील ओव्यांना प्रतिबिंबित करणाऱ्या एकशे एकवीस साक्या सिद्ध केल्या. त्या 'श्रीगीता तत्त्वसार' या स्वरूपात प्रसिद्ध झाल्या. वास्तविक पाहता 'श्रीगीतातत्त्वसार' या नावाने प्रसिद्ध झालेल्या एकशेवीस साक्या या 'श्री ज्ञानेश्वरी नित्यपाठाशी' अनुबंधित आहेत. त्याचे प्रमाण असे की, नित्यपाठातील १०९ ओव्या 'तत्त्वसारां'मध्ये १२१ साक्यात प्रतिबिंबित झालेल्या आहेत. त्या प्रसिद्ध करताना तारका चिन्ह असलेल्या साक्या या श्रीज्ञानेश्वरीतील ओव्यांशी जुळणाऱ्या आहेत. त्यांचा गीताग्रंथाशी अनुबंध नाही.

श्रीज्ञानेश्वरीच्या पहिल्या ओवीतील सारा आशय व्यक्त

करण्यासाठी श्रीगीतातत्त्वसारात तीन साक्या आलेल्या आहेत.

*ॐ नमो जी आद्या । वेद प्रतिपाद्या ।*
*जय जय स्वसंवेद्या । आत्मरूपा ॥ (ज्ञाने. १.१)*

त्यासाठी स्वामी स्वरुपानंदांनी तीन सुंदर साक्या लिहिलेल्या आहेत. त्या पुढीलप्रमाणे –

*आत्मरूप ॐकारतत्त्वत् तूंचि जगाचें मूळ ।*
*तुज मीं नमिलें, तुझा जय असो, तुवां व्यापिलें सकळ ॥१॥*
*सर्वातीत हि सर्व हि तें तूं सर्वात्मक तूं साच ।*
*अनन्यभावें तुज वर्णवि गावें वेदांनींच ॥२॥*
*'नेति नेति' ते वेद बोलती तयांसि पडिले मौन ।*
*जाणाया तुज समर्थ सहजें दुजा तुजाविना कोण ॥३॥*

'स्वसंवेद्या' या एका शब्दासाठी तिसरी साकी, 'वेद प्रतिपाद्या' या शब्दासाठी दुसऱ्या साकीचा दुसरा चरण, आणि 'ॐनमोजी आद्या' यासाठी पहिली साकी, दुसऱ्या साकीचा पहिला चरण असा विस्तार पाहिला की श्रीज्ञानदेवांचे मिताक्षर श्रेष्ठत्व आणि स्वामीजींचे प्रत्ययकारी विवरणकौशल्य आपल्या लक्षात येते. त्याचबरोबर हेही लक्षात येते की या तीनही साक्यांचा 'श्रीगीतातत्त्वसार' या नात्याने नेमका अनुबंध नाही. तरीही या एकशेएकवीस साक्यांना 'श्रीगीतातत्त्वसार' असे शीर्षक देण्यात स्वामीजींची श्रीज्ञानदेवांकडे पाहण्याची सूक्ष्म दृष्टी जाणवते. स्वामीजींना भगवान श्रीकृष्ण आणि 'भगवान', ज्ञानेश्वरांच्या रूपातच दिसतात ! श्रीमद्‌भगवद्‌गीतेतील 'स्वरूप ज्ञान' श्रीज्ञानदेवांच्या अक्षराअक्षरातून स्फुरते आहे, असे स्वामीजींना वाटते ! त्यामुळे ज्ञानेश्वरीतील 'शब्दब्रह्मात्मक श्रीगणेश' यांची आराधना करून दुसऱ्या साकीत स्वामीजी सांगतात -

*"तत्त्वसार अवधारा विनवी श्रीनिवृत्तिचा दास ॥" (४)*

हाच सद्‌गुरु मला भवार्णवातून तारून नेईल. नित्यानित्य विवेक समजावून देईल. विश्वमोहिनी शारदेची माझ्या सद्‌गुरुंना कृपा लाभली आहे. जगत् विलासातच 'गीतातत्त्वाचा शोध आणि बोध' सद्‌गुरु ज्ञानदेवांच्या वाग्विलासाने मला समजून घेता येईल (साकी ४ ते ७). श्रीज्ञानदेवांच्या पदबंधातून गीतातत्त्व शोधण्याचा हा प्रयत्न स्वामीजींच्या पारदर्शी प्रतिभेचा प्रत्यय वाचकाला आणून देतो.

## गीतातत्त्व सार

ज्याप्रमाणे भूस टाकून धान्याचा कण जवळ करावा त्याप्रमाणे ज्ञानवंत हा मायेचा त्याग करून ब्रह्मपदी स्थिर होतो. 'आज जे भरलेले दिसते ते सरते आणि जे रिते असते ते पुनश्च भरते', हा सृष्टीचा स्वभाव आहे, न्याय आहे. 'उपजे ते नाशे, नाशे ते निपजे' हे जाणून शोक सर्वथा त्याज्य आहे. प्रत्येकाने आपापल्या स्वभावधर्माप्रमाणे आचरण करावे. हर्ष-शोक, जय-पराजय, लाभा-लाभ हे समत्व बुद्धीने स्वीकारावे. माणसाला कर्म करण्याचा अधिकार आहे मात्र त्या कर्माच्या फलावर त्याचा अधिकार नाही. समत्व भाव हीच श्रेष्ठ योगसाधना आहे. कर्ता, कर्म आणि क्रिया या तीनही स्वरूपात ब्रह्मभाव मानावा. निरासक्त वृत्तीने व्यक्तीने विहित कर्म करावे. नियत कर्म यज्ञकार्य भावनेने पूर्ण करावे. कर्म करीत असताना कर्तेपणाचा अहंकार नसावा. निष्काम वृत्तीने कर्माचरण करावे. लोकसंग्रहाची, लोकधारणेची भावना ठेवून कर्माचे आचरण देहबुद्धी सोडून करीत रहावे. मन, बुद्धी, आणि चित्त या तीनही ठिकाणी समत्त्व भाव असावा अशी वृत्ती झाली तर वारा न लागलेल्या ज्योतीप्रमाणे बुद्धीला स्थिरता येते. ज्ञानाग्नीमुळे ज्यांची कर्मे जळून जातात त्यांनाच पंडित असे म्हणतात. असे संत ब्रह्मरसाचे मूर्तिमंत अवतार असतात. त्यांनी ही ब्रह्मविद्या सर्वांना समजावून दिली. जेव्हा 'ज्ञाता, ज्ञेय, ज्ञान' ही त्रिपुटी संपते तेथे भक्ताला 'परंधाम' गवसते ! माणसाचा देह म्हणजे पंचमहाभूतांचा मेळ असतो. सत्त्व-रज-तम या त्रिगुणांनी तो गुंतलेला असतो. शरीर क्षणभंगुर आहे. आत्मा शाश्वत आहे. निर्गुणी आहे. 'क्षेत्र-क्षेत्रज्ञ' किंवा 'क्षर-अक्षरत्व' ज्ञानदृष्टीने पाहावे आणि ब्रह्मभाव ओळखावा. जे भजननिष्ठ भक्त असतात. ते भगवंताला आवडतात. अभ्यासाला असाध्य असे काही नसते. प्रपंचदृष्टी सोडून ते भगवंताचरणी दृढ श्रद्धा ठेवणारा आत्मानंद प्राप्त करून घेतो. 'ॐतत् सत्' या तीन शब्दांत सारे विश्व सामावलेले असते. ज्ञानाने आणि विज्ञानाने त्याची ओळख करून घ्यावी. अव्यभिचारी भक्तीने भगवंतालाही आपलेसे करावे.

हे सारे गीतासार खरं म्हणजे भावार्थदीपिकेत विस्ताराने वर्णिले आहे. भावार्थदीपिकेत श्रीज्ञानदेवांनी जे 'पसायदान' मागितले आहे, त्याचाही साकीरूपात स्वामीजींनी अनुवाद केला आहे.तो पुढीलप्रमाणे आहे.

*विश्वात्मक जो देव तये ह्या वाग्यज्ञे तोषावे ।*
*तोषुनियां मज अतां स्वभावें कृपादान हें द्यावें ॥ (११८)*
*गळुनि कुटिल्या दुष्टां लागो गोडी सत्कर्माची ।*
*हार्दिक मैत्री परस्परांशी जडो भूतमात्राची ॥ (११९)*
*तेथ म्हणे जगजीवनदान प्रसाद हा होईल ।*
*ज्ञानदेव सुख पावे ऐकुनि असा वर-द तो बोल (१२०)*

पसायदानाला प्राप्त झालेले हे साकीचे रूप हा स्वामीजींचा अधिकार आहे.

वास्तविक स्वामी स्वरुपानंदांनी हे श्रीगीतातत्त्वसार श्रीज्ञानेश्वरीच्या विचारदर्शनातून सांगितलेले आहे. त्यात आदर्श भक्ताचे जे चित्र रेखाटलेले आहे त्यात स्वामी स्वरुपानंदांचे भावचित्र सहजपणे उमटले आहे. या एकशेएकवीस साकींचे ते वैभव आहे. नकळत स्वामी स्वरुपानंदांनी आपलेच वर्णन केले नसेल ना, अशी शंका घेतली तरी स्वामीजींच्या भक्तांना त्यांचे 'शब्दचित्र' या स्तोत्रात केव्हाही पाहता येईल.

*संत विवेकी सत्प्रदीप कीं चिद्रत्नांची खाण ।*
*शांति-सुखाची ब्रह्मरसाची मूर्ति ओतिली जाण ॥ (५०)*
*ते स्वानुभवी वैराग्य-रवि प्रसन्न होउनि पूर्ण ।*
*सत्‌शिष्यांतें कृपा-कटाक्षें देती आत्मज्ञान ॥ (५१)*

***होतां ज्ञान-प्रकाश ऐसा गुरु-कृपें चि साचार ।***
***क्षणांत पाहीं लोपुनि जाई मोहाचा अंधार ॥(५४)***
***देह बरिवरि जरी तयाचा दिसे हिंडतो ऐसा ।***
***तरी अंतरी ब्रह्मभाव तो असेचि जैसा तैसा ॥ (४९)***
***"देही" तोहि असे, तयातें सुख-दुःखी म्हणतीच ।***
***परी प्रत्ययें सांगों कीं, तो मूर्त-ब्रह्म चि साच ॥ (४०)***

आरशात जसे स्वतःचे रूप पाहता येते तसे या साकीमध्ये साक्षात स्वामी स्वरुपानंदांचे प्रतिबिंब पडलेले आहे. त्या दर्शनसुखाचा लाभ या ग्रंथात होतो. शिवाय त्यांचा 'कृपामय - संदेशही' भाविकांना ऐकता येतो. स्वामी स्वरुपानंद आपल्या भक्तांना जणू म्हणतात –

***योगीजन मद्‌भक्तांपाशीं मज शोधी साचार ।***
***जे नित्य नवा अखंड बरवा करिती नामोच्चार ॥ (७२)***
***मद्‌गुण गाती नित्य रंगती मुखें गर्जती नाम ।***
***सुखें साधिती सोऽहं-जपातें स्मरुनी आत्माराम ॥ (७३)***
***दृष्टी भोगी स्वरूप माझें वाचें मद्‌गुण गान ।***
***धरुनि प्रीति मद्‌गुण - किर्ती - श्रवणिं गुंतले कान ॥ (७५)***
***आत्मज्ञानें दूर सारुनी स्वर्ग-नरक-संसार ।***
***सोऽहं - भावें तन्मय होई मद्रूपी साचार ॥१०७॥***

स्वामीजी हे 'श्रीगीतातत्त्वसार' - गीतेतील मुख्य विचार - श्रीज्ञानदेवांच्या शब्दांत सांगायचा प्रयत्न करतात म्हणून हे तत्त्व शब्दांनी स्पष्ट करता येत नाही. ते अनुभवावे लागते, ही आत्मविद्येची किमया आहे.

***शब्दांविण हें संवादावें अतीन्द्रिय हि भोगावें ।***
***बोला आधी सिद्धान्ताशीं पूर्ण मिळोनी जावें ॥ (११४)***

ते गीतारत्न सोऽहंभावें 'कंठस्थ' केले पाहिजे. ही गीतारूपी भगवंताची मूर्ती भक्तिभावाच्या दुर्वादलांनी पूजिली आहे. त्या पूजेने आत्म-सिद्धिविनायक देव संतुष्ट होतो, अशी फलश्रुती सांगून हे स्तोत्र संपूर्ण केले आहे.

प्रयागतीर्थी गंगा-यमुना आणि सरस्वती या तीन नद्यांचा संगम आहे. त्याप्रमाणे या श्रीगीतातत्त्वसार ग्रंथात गीता ज्ञानेश्वरीच्या गंगा-यमुनेच्या प्रवाहात स्वामी स्वरुपानंदांच्या 'सरस्वती'चेही दर्शन होते. हे स्तोत्र पुन्हा पुन्हा म्हणून चित्तशुद्ध होऊ शकते. मनातील क्षुद्र विचार नष्ट होतात. त्रिवेणी संगमात स्नान केल्याचे पुण्य लाभते आणि भगवान कृष्णाचे गीताबोल कानात-मनात घुमत राहतात. कारण

***सर्वही रूपीं रूपवंत जो सर्वांहि नेत्रीं पाहे ।***
***सर्वही देशीं जो राहे तो कृष्णदेव बोले हे ॥ (११३)***

**प्रा. डॉ. ग. वा. करंदीकर**
६/ब, फ्लॅट नं ९/१०, राहुलनगर, कोथरुड, पुणे ४११ ०२९.

# स्वामी स्वरुपानंद यांची ग्रंथनिर्मिती


**श्री. बाळकृष्ण महादेव परांजपे**

*१९७७ मध्ये प्राथमिक शिक्षक म्हणून निवृत्त. ऑगस्ट १९५९ ते सप्टेंबर १९७३ या काळात स्वामी स्वरुपानंदांची सेवा करण्याचे भाग्य. स्वामी स्वरुपानंद सेवा मंडळ पावस - रत्नागिरी या संस्थेचे पहिली १२ वर्षे कार्यवाह.*


श्रीमत् सद्गुरु स्वामी स्वरुपानंद यांनी १९३५ च्या सहा-सात मार्चला (अमृतधारा या ग्रंथात) लिहिलेल्या तीन साक्या खालीलप्रमाणे आहेत.

***मी-तूंपण अस्तवलें आलें साधनेस पूर्णत्व ।***
***कणकण्यांत कोंदलें एकलें एक नित्य सतत्त्व ॥***
***स्थैर्य प्रज्ञेप्रति त्वत्कृपें पूर्ण तपस्या झाली ।***
***त्वदाज्ञेस अनुसरून आतां ठेवुं लेखनीं खालीं ॥***
***जगन्माउली, आज्ञा होतां ती पुनरपि उचलूंच ।***
***भक्त होउनी त्वद्-यशोध्वजा जगीं उभारूं उंच ! ॥***

यातून मार्च १९३५ नंतरचे स्वामी आणि त्यापूर्वीचे स्वामी (श्री. रा. वि. गोडबोले) असे दोन स्पष्ट भाग त्यांच्या जीवनात आणि ग्रंथनिर्मितीत स्पष्ट दिसतात.

पूर्वीच्या त्यांच्या लेखनापैकी त्यांची पत्रे त्यांच्या चरित्र ग्रंथात दिली आहेत. इतर काही स्फुट रचना ऐकिवात आहेत. पण ती उपलब्ध नाहीत. फक्त दोनच ग्रंथ उपलब्ध आहेत. त्यापैकी 'मृत्युपत्र' हे काव्य अद्याप अप्रकाशित आहे. त्यातील काही उतारे चरित्र ग्रंथात घेतले आहेत. दुसरे 'अमृतधारा' हे १६२ साक्यांचे काव्यही आकाराने फार लहान परंतु काव्य गुण आणि अर्थगांभिर्य यांनी फारच महान अशी रचना आहे. यात त्यांचे अलौकिक काव्य गुण, त्यांचे सखोल अध्ययन आणि त्यांचा व्यवहार व परमार्थ या दोन्ही क्षेत्रातील प्रगाढ अनुभव यांचा प्रत्यय कोणालाही येईल. काव्यगुणामुळे रचना इतकी मधुर आहे की कोणीही गुणगुणावी. मात्र त्यातील सखोल अर्थ समजण्यासाठी त्यावर उपनिषद समजून भाष्य होणे आवश्यक आहे, हे त्यांच्या ग्रंथाचे चाहत्यांना एक मोठे आवाहनच आहे.

यातील कित्येक साक्या अर्ध्या संस्कृत तर अर्ध्या मराठी अशा आहेत. त्यात कालिदासाचे रघुवंश आदी काव्ये, महाभारत, गीता यांचे संदर्भ आणि उपनिषदादी ग्रंथांचे त्यांनी केलेले सखोल चिंतन आलेले आहे. तसेच अध्यात्म क्षेत्रातील उत्तम साधकाचे चिंतन आणि अनुभव व शेवटी त्याची पूर्णावस्था याचे दर्शन झाल्यावाचून रहात नाही.

त्यांची काव्यशक्ती फार मोठी होती आणि त्याची पूर्णपणे त्यांना जाणही होती. मात्र अहंकार नव्हता. त्याची झलक खालील साक्यांवरून दिसून येईल -

***पुन्हीं जन्मुनी अभिनव-जीवन-सत्कविवर होईन ।***
***स्वानुभवतः स्फूर्त नवरसीं सत्य-काव्य निर्मीन ॥***
***ही स्वामींची ग्रंथ लेखनाची प्रतिज्ञा आहे.***
***काव्य-सेवका जगदंबेचें असे तुला वर-दान ।***
***ऐकुनि कविता जगत्-रसिकता मुदें डोलवित मान ॥***
***ही त्यांची दृढ-श्रद्धा आहे.***
***क्षणमप्यवतिष्ठते श्वसन् यदि न तु लाभवान् स जन्तुः ।***
***कवि-कुल-गुरू कालिदास सुचवी जीवनमहती हेतु ॥***
***यातील पहिली ओळ पूर्ण संस्कृत आहे.***
***जरि सत्कार्यी गेली जावो पार्थिव नश्वर काया ।***
***दिलीपामुखें तो चि सांगतो यशोदेह रक्षाया ॥***

नभीतो मरणादस्मि केवलं दूषितं यशः - या दिलीप वचनाचा यात निर्देश आहे.

***अखंड अभ्यासाविण साध्य न ती समता चित्ताची ।***
***असे सुकर का समशेरीच्या कसरत धारेवरची ॥***

यातील उत्तरार्धात- 'क्षुरस्यधारा निशिता दुरत्यया दुर्गम् पथस्तत् कवयोवदन्ति ।।' या उपनिषद वाक्याचा हा सरळ अनुवाद आहे.

***वृत्ति अखुंबित जमीं रंगली जगदंबेच्या नामीं ।***
***पुण्य-पाप-संबंध संपुनी नित्य पुनीत तदा मी ॥***

भक्तीने येणारे आत्यंतिक पावित्र्य येथे स्वानुभवाने वर्णिले आहे.

***भजसि ह्या जगद्-रंगभूमिवर जसें विलेंत्वां सोंग ।***
***करीन संपादणी तशी मी राहुनियां निःसङ्ग ॥***
***यात स्वानुभवाने कर्मयोगाचा आदर्श वर्णिला आहे.***
***अवर्णनीय स्वयंसिद्ध तू तुला रूप ना रंग ।***
***परंतु माते, मज बोलविते प्रेमकता निःसंग ॥***

यात परमेश्वराचे सत्य स्वरूप माता म्हणून वर्णिले आहे. स्वामींच्या लेखनात 'जय माताजी जगन्मातर' इत्यादी शब्द येतात. तेव्हा त्यांचे दृष्टीपुढे काय असते ते येथे सांगितले आहे.

***समानता मानव-धर्माचा नसेल भक्कम पाया ।***
***तरी इमारत धर्म-युगाची उठेल मनुजा वाया ॥***
***कां धनिका येकवर बंगला बांधुनियां नवलाची ।***
***पहा उद्यां जिंकील तुला ती गरिबांचीच झलाची ॥***

या दोन साक्यात समाज हिताचे मूलभूत चिंतन दिसते. समाजात जेवढी विषमता असेल तेवढा तो दुर्बळ होतो आणि त्यात कलह पण निर्माण होतो.

मार्च १९३५ नंतर त्यांनी विपुल ग्रंथलेखन केले आहे. मात्र त्यात त्यांची विद्वत्ता, अध्ययन आणि काव्यगुण हे सर्व पार्श्वभूमीसारखे असून श्रीस्वामींची सामान्यजनांविषयी व साधकांविषयी आत्यंतिक करुणा हाच प्रमुख भाग आहे. त्यामुळे या सर्व ग्रंथांतील लेखन वाचकांना सहज समजावे आणि अचूक मार्गदर्शन व्हावे यासाठी भाषा अत्यंत सहज समजेल अशी वापरण्याचा प्रयत्न झालेला आहे.

यात संजीवनी गाथा हा अभंग संग्रह आणि श्रीमद् 'भावार्थ गीता' हा भगवद् गीतेचा साकी वृत्तातील सुबोध अनुवाद हे एक प्रकारे स्वतंत्र ग्रंथ आणि अभंग ज्ञानेश्वरी, अभंग अमृतानुभव, चांगदेव पासष्टी अभंगात्मक हे ज्ञानेश्वरांच्या प्रस्थान त्रयीचे अनुवाद ही मुख्य आहेत.

सामान्य लोकांना आणि साधकांना ज्ञानेश्वरी या मराठीतील सर्वश्रेष्ठ ग्रंथाची ओळख व्हावी आणि त्याबरोबर त्यांच्या तत्त्वज्ञानाचाही थोडक्यात परिचय व्हावा, असा श्रीज्ञानेश्वरीच्या १०९ ओव्यांत सारांश येईल अशी निवड करून श्रीज्ञानेश्वरी नित्यपाठ स्वामींनी तयार केला. हे संपादन इतके अपूर्व आहे की अभ्यासक आश्चर्यमुग्ध व्हावा.

या ज्ञानेश्वरी नित्यपाठाचे गीता-तत्त्वसार या नावे साकी वृत्तातील आणि अभंग ज्ञानेश्वरी सारस्तोत्र या नावाने अभंगात्मक असे अनुवाद स्वामींच्या रचनांतून तयार झालेले आहेत.

वरील तिन्हींचा एकत्र उपयोग करून त्याला गद्य अनुवादाची जोड देऊन 'श्रीज्ञानेश्वरी नित्यपाठ-अभ्यास' या नावाची एक पुस्तिका स्वामी स्वरुपानंद सेवा मंडळाने प्रकाशित केलेली आहे.

आरंभी उद्धृत केलेल्या साकीत म्हटल्याप्रमाणे मध्यंतरी बरीच वर्षे गेल्यानंतर स्वामींचे हे ग्रंथ ईश्वरी आज्ञेने निर्मिले गेले अशी माहिती अभंग-ज्ञानेश्वरी व भावार्थ गीता या दोन्हींच्या प्रस्तावनेतून मिळते.

श्रीमद् अभंग ज्ञानेश्वरी हा ज्ञानेश्वरीचा अभंगात्मक अनुवाद श्रीस्वामींना स्फूर्ती, ईश्वरी आदेश झाल्यापासून दररोज दहा ओव्यांचा अनुवाद या प्रमाणे सुमारे तीन वर्षात लिहिला गेला आणि त्यानंतर सुमारे ५-६ वर्षांनी तो ग्रंथ १९६० मध्ये प्रकाशित झाला.

मध्यंतरीची सुमारे ५ वर्षे त्याची लहान-लहान भागात सुवाच्य प्रत करून त्याचे श्रीस्वामी भेटणाऱ्या कोणाही व्यक्तीबरोबर (त्यात साधक तसेच विद्वानही असत) वाचन करीत आणि वाचणारा, ऐकणारा यांना सुचलेले बदल नोंदीत. त्याचा हेतू मुख्यतः या लेखनात सोपेपणा यावा व अचूकता तर बिघडू नये हा असे.

एखाद्या ठिकाणी दोन शब्द सुचले किंवा अधिक शब्द सुचले तर त्याचा विचार केला जाई आणि त्याप्रमाणे लेखनात दुरुस्ती केली जाई.

मुंबईच्या एका विद्वानाने आस्थापूर्वक स्वामींबरोबर अनेक वेळा विचारविनिमय करून काही दुरुस्त्या सुचवल्या. त्यातील योग्य वाटल्या त्या निवडल्या गेल्या.

स्वामींकडे येणारे सामान्य साधकही केव्हा केव्हा एखादा बदल सुचवित आणि स्वामीही तो बदल सहज स्वीकारीत. लेखकाकडूनही त्यांनी काही शब्द स्वीकारले होते. 'मार्गी अंधासरिसा, पुढे देखणाही चाले जैसा' याचा अनुवाद करताना 'डोळस तो जैसा पुढे चाले नीट, दाखवित वाट आंधळ्यासी' यातील 'नीट' हा शब्द लेखकाने सुचविलेला आहे.

अभंग ज्ञानेश्वरी प्रकाशित करताना त्यात प्रत्येक पृष्ठाखाली काही टीपा आणि ग्रंथाचे शेवटी विशेष शब्दांचे स्पष्टीकरण असा एक कोश जोडलेला आहे. या दोन्हीही सूचना स्वामींनी एका सामान्य साधकाकडून स्वीकारल्या होत्या, याचाही उल्लेख ग्रंथाच्या प्रस्तावनेत आहे.

अशा तऱ्हेने सोपेपणा आणताना अचूकता इतकी साधलेली आहे की, एखादा शब्द कमी-जास्त करून चालत नाही.

ही ग्रंथनिर्मिती आपण करीत आहोत, असा अहंकार स्वामींजवळ बिलकुल नव्हता. जे होत आहे ते जगन्माऊलीच्या इच्छेने आणि आज्ञेने. आपण केवळ निमित्तमात्र असाच स्वामींचा भाव असे. या संबंधी एक आठवण स्मरते. मुंबईच्या एका विद्वानाने अभंग ज्ञानेश्वरी प्रकाशित झाल्यानंतर मूळ ज्ञानेश्वरी आणि अभंग ज्ञानेश्वरी यांची तुलना करून मूळ ज्ञानेश्वरीतील अर्धा चरण अनुवादात आला नाही, असा आक्षेप स्वामींजवळ सांगितला. त्यावर स्वामी म्हणाले, 'अनुवाद झाला तो ईश्वरी इच्छेने. राहिला असेल तर तीही त्याचीच इच्छा.'

अभंग ज्ञानेश्वरी प्रकाशित झाल्यानंतर त्या वेळी काही लोकांनी सुचविल्यावरून स्वामींकडून अमृतानुभवाचाही अभंग अनुवाद केला गेला. त्या वेळची एक आठवण.

अमृतानुभवात 'बोभाटिता' असा शब्द आहे. त्या शब्दाला प्रतिशब्द न सुचल्यामुळे बोभाटिता शब्द कायम ठेऊन प्रथम स्वामींनी अनुवाद लिहिला. लेखकाने हा शब्द लोकांना समजणार नाही असे म्हटले. तेव्हा स्वामी म्हणाले, 'तुम्हाला एखादा शब्द सुचतो का ?'' त्यावर तुकाराम महाराजांच्या आंधळा या रूपक अभंगाची आठवण झाली. त्यात 'उर्ध्वमुखे आळविला सोऽहम् शब्दाचा नाद' अशी ओळ आहे. त्याचा वापर करून स्वामींकडून अनुवाद लिहिला गेला - 'सोऽहम् सोऽहम् ऐसा आळविता शब्द । जरी गेली नीज जीवात्म्याची'.

श्रीस्वामींची काव्यशक्ती विशेष होती. त्याची एक आठवण - एके दिवशी स्वामींना त्यांच्या पूर्वीच्या काळात विशेष संबंधित असलेल्या व्यक्तीच्या मुलाची विवाह आमंत्रण पत्रिका पोस्टाने आली. एक-दोन तासांनंतर लेखक सहज स्वामींकडे आले. तेव्हा स्वामी म्हणाले, 'तुम्हाला वेळ आहे ना ? थोडं लिहायचं होतं.' नंतर एक अभंग सांगितला - आरंभ होता आदरी संसार... इत्यादी आणि नंतर तो आशीर्वाद म्हणून पाठविला गेला. संजीवनी गाथेत तो २३८ व्या क्रमांकाला प्रसिद्ध झालेला आहे. प्रसिद्ध करताना फक्त एकच शब्द अंती याच्याऐवजी सुखे असा बदल केला गेला. एका निमंत्रण पत्राच्या निमित्ताने एक उत्तम सर्वोपयोगी अभंग निर्माण झाला, हे सामर्थ्य केवळ संतांकडेच असते. महाकवींकडे असते. पण ते सर्वोपयोगी होईल असे नाही.

श्रीस्वामींच्या ग्रंथ निर्मितीबद्दल कितीही लिहिले तरी पुरेसे वाटणार नाही. इतके ते ग्रंथ सोपे असूनही विस्तृत अर्थ सांगणारे आहेत. काही

उदाहरणे दिली तर ते अधिक लक्षात येईल.

*या निशा सर्वभूतानां तस्यां जागर्ति संयमी ।*
*यस्यां जाग्रति भूतानि सा निशा पश्यतो मुनेः ॥*

गीतेतील या श्लोकाचा अनुवाद करताना ज्ञानेश्वरीत विनोबांच्या गीताईत आणि इतर सर्वत्र शब्दशः अनुवाद केलेला आहे. भावार्थ गीतेत श्रीस्वामींनी ब्रह्मी आणि विषयी असे दोन शब्द वापरून तो किती सुलभ केला आहे पहा. त्या ओळी अशा -

*प्राणि-मात्र निद्रिस्त ब्रह्मीं तिथें संयमी जागे*
*विषयीं जागृत अज्ञ जन तिथें ज्ञानी मुनि निद्रा घे*

गीतेच्या बाराव्या अध्यायातील बारावा श्लोक याचा अनुवाद करताना तो सहज आणि स्पष्ट अन्यत्र कुठेही आढळत नाही. ज्ञानेश्वरीत त्याचा गोषवारा अगोदरच्या दोन-तीन श्लोकांत मिळून आहे. स्वामींनी भावार्थ-गीतेत चार साक्यांत तो किती सुलभ केला आहे पहा -

*सर्व साधनी हेतु एक हा अहंकार निरसून*
*तुझें स्वभावें चित्त रहावें मद्रूपीं चि जडून*
*अभ्यास असा साध्य जसजसा होय तसतसें ज्ञान*
*प्रकटे साचें मद्रूपाचें, श्रेष्ठ त्याहुनी ध्यान*
*निमग्न होतां ध्यानिं तत्त्वतां तो कर्म-फल-त्याग*
*सहज संभवे तदा स्वभावें शांति सुखाचा भोग*
*त्या शांति-सुखीं त्या मोक्ष-सुखीं त्या भक्तिसुखीं राही*
*धन्य सर्वदा मद्भक्त असा देही असुनि विदेही !*

श्रीस्वामींनी अनुवाद करताना शब्दशः न करता अर्थ अधिक स्पष्ट होईल आणि व्यवहारातही तो बरोबर दिसेल याची कशी काळजी घेतली आहे याचे अभंग-ज्ञानेश्वरीतील एक उदाहरण -

ज्ञानेश्वरीत सतराव्या अध्यायात चौदाव्या श्लोकावर ओवी आहे.

*जन्मतेनि प्रसंगे । स्त्रीदेह शिवणे आंगें ।*
*तेवूनि जन्म अवघें । सोवळें कीजे ॥*

या मूळ ओवीत मुलाच्या लहानपणच्या पोषणाचा स्पष्ट निर्देश नाही. परंतु व्यवहारतः मूल काही महिने तरी मातेच्या दुधावरच जगत असते. हे लक्षात घेणं जरूर आहे. श्रीस्वामींनी अभंग-ज्ञानेश्वरी अध्याय १७ वा अभंग-चरण ३६७ या ओवीचा अनुवाद असा केला आहे -

जन्मतां स्त्रीस्पर्श । बाळपणीं झाला । तेथोनि सोवळा । सर्वजन्म।

'बाळपणीं' एवढाच शब्द वापरून किती व्यापक अर्थ आणला आहे !

स्वामींच्या वाङ्मयातील अचूकता आणि सोपेपणा याची कितीतरी उदाहरणे देता येतील. पण आता इथेच थांबून स्वामींच्या वाङ्मयाचा वाचकांनी स्वतःच आस्वाद घ्यावा अशी विनंती केल्याशिवाय रहावत नाही.

बा. म. परांजपे
८२३-एफ, आरोग्य मंदिरजवळ, शिवाजीनगर,
रत्नागिरी - ४१५६३९

## विनवणी

भाव अंतरीचा माझ्या
जाणूनिया गुरुराया
मजवरी करी कृपा दयाळा
हीच विनवणी तव पाया ॥१॥

आसक्तीचा न लागो बंध
तव बोधाचा राहो छंद
नामस्मरणी होईन धुंद
साक्षात्कारे सेवीन गंध ॥२॥

सोऽहं स्वरूपाचे भजन
व्हावे मम चिंतन मनन
न लगे दुजे पूजा पठण
झाले तीर्थाटन तव चरण ॥३॥

सर्वाभूती तव रूप दिसावे
काया वाचा मन निर्मल व्हावे
मी माझे सारे हरपूनी जावे
तुझ्या स्वरूपी एक चि व्हावे ॥४॥

सौ. सरोज अनंत करंदीकर

# स्वामी स्वरुपानंद - श्रीज्ञानदेवांचे समर्थ भाष्यकार

**डॉ. ज. वा. जोशी**

एम.ए., पीएच.डी., एम.एम.एस., सेवानिवृत्त प्रमुख - तत्त्वज्ञान विद्यापीठ अंमळनेर, प्रपाठक तत्त्वज्ञान विभाग, पुणे विद्यापीठ. शैक्षणिक सन्मान - प्राचार्य शं. वा. दांडेकर शिष्यवृत्ती दक्षिणा फेलोशिप. गुरुदेव रानडे-दामले पारितोषिक. गीता गौरव पुरस्कार गीताधर्म मंडळ, पुणे. धर्म, तत्त्वज्ञान संस्कृती, संतसाहित्य यावर ११ पुस्तके प्रसिद्ध. तसेच लेख व चर्चासत्रांत सहभाग.

स्वामी स्वरुपानंद (इ.स. १९०३-१९७४) हे अर्वाचीन संतसाहित्यात व्यक्त झालेले, भारतीय मोक्षविद्येचे बहुमोल 'हें लेणें ईश्वराचें' आहे. ऋषी आणि संत यांची साधना आणि अनुभूती यामधून हा मोक्षविद्येचा परममंगल भागीरथी प्रवाह प्रवाहित झाला. वेद काळापासून आतापर्यंत तो सर्वांना प्रेरक, मार्गदर्शक ठरला आहे. चतुर्विध पुरुषार्थ संपन्न जीवन जगण्याची, 'बहुजन हिताय । बहुजन सुखाय । आत्मनो मोक्षार्थम् ।' कार्य करण्याची शुभप्रेरणा संतांनी दिली आहे. मध्ययुगीन सर्वकष अधःपतन काळात (Age of Decadence), अंधारयुगात (Age of Darkness) संतांनी अध्यात्मिक क्षेत्रात समतेची जीवनदृष्टी प्रभावीपणे मांडली, 'ईश्वरनिष्ठांची मांदियाळी' उभारली आणि भक्तीच्या व्यासपीठावरून नवे प्रबोधन युग (Age of Renaissance) प्रवर्तित केले. भारताच्या सर्व प्रांतात हे संतकार्य घडले. विशेषतः तत्कालीन महाराष्ट्रात श्रीज्ञानदेवांनी 'मराठीचिये नगरी - ब्रह्मविद्येचा सुकाळू घडवला, 'ज्ञानदेवें रचिला पाया' अशा वैष्णव-वारकरी-भागवत धर्माचे मंदिर संतकार्यातून उभे राहिले. 'ज्ञानदेवातें वाट पुसतूं' बहुतांश सर्व संतांचे धर्मप्रबोधन आहे. अर्वाचीन काळात श्रीगुलाबराव महाराज, श्रीबाबा महाराज आर्वीकर आणि स्वामी स्वरुपानंद यांचे सर्व जीवन, कार्य, साहित्य 'ज्ञानदेवातें वाट पुसतु' व्यक्त झाले आहे. नाथसंप्रदायातील योगसाधना, गुरुभक्ती आणि वारकरी-वैष्णव भूमिकेचा भागवतधर्म हा त्यांचा प्राणस्त्रोत आहे. 'स्वसंवेद्या आत्मरूपा' ची प्रचीती हे या जीवनदृष्टीचे व्यक्तिगत परिमाण आहे. 'जनीं जनार्दन' हे तिचे सामाजिक परिमाण आहे. 'सर्वांभूतीं भगवंत', 'हें विश्वचि माझें घर' हे तिचे विश्वात्मक परिमाण आहे. श्रीस्वरुपानंदांचे जीवन, अंतरंग साधना, अनुभूती मागील योगभक्तीचे वैभव पाहिले, या सर्वांचा त्यांच्या ग्रंथातून प्रगट झालेला उत्कट, प्रभावी आविष्कार पाहिला की, स्वामी आणि ज्ञानदेव यांचे अनुबंध स्पष्ट होतात. 'ज्ञानाचा एका' हे जसे श्रीएकनाथांचे यथार्थ वर्णन आहे, त्याचप्रमाणे 'ज्ञानदेवाचे स्वरूप' हे स्वामी स्वरुपानंदांचे यथार्थ वर्णन ठरते.

श्रीस्वामींचे कार्य, साहित्य यातून 'श्रीज्ञानदेवांचे मनोगत' स्पष्ट झाले आहे. श्रीमद्भगवद्गीता स्वरूपात भगवान श्रीकृष्णांनी आपले हृद्गत प्रिय शिष्य अर्जुनास सांगितले. हे 'देवाचे मनोगत', 'ज्ञानेशो भगवान् विष्णुः' अशा ज्ञानदेवांनी भावार्थदीपिका स्वरूपात ज्ञानेश्वरीत प्रगट केले. ज्ञानदेवांनी या ग्रंथात गीतेचा शब्दार्थ, वाच्यार्थ न मांडता लक्ष्यार्थ, मुख्यार्थ मांडला. त्यादृष्टीने ज्ञानेश्वरीतील दृष्टान्त, सिद्धान्त, गुरुवन्दन, कुंडलिनी योगस्वरूपात गुरुकृपा, भगवद्कृपा रहस्य आणि अभेद-भजन, सहजस्थिती स्वरूपातील ज्ञानभक्ती याकडे पहायला हवे. ते न करता, पंडिती शब्दच्छल केला जातो, त्या वेळी श्रीज्ञानदेवांच्या जीवनदृष्टीचे यथार्थ आकलन न घडता, बुद्धिभेद घडतो.

श्रीस्वामींची 'भावार्थ गीता' हा मूळ संहितेचा शब्दानुवाद नाही, तर ज्ञानेश्वरीच्या आधारे साकी वृत्तांत निबद्ध झालेला भावानुवाद आहे. मूळ गीतेच्या ६ व्या अध्यायात कुंडलिनीचा निर्देश नाही. श्रीस्वामींनी भावार्थ गीता अ. ६ मध्ये ज्ञानेश्वरीच्या आधारे योगसाधनेचे अंतरंग पुढील प्रत्ययकारी शब्दांत स्पष्ट केले आहे.

*रविसम दीप्ति सुवर्णकांति दिसे जणूं नागीण ।*
*कंठावरती उभी ठाकुनी वेढे साडेतीन ॥*
*पृथ्वी जल हीं भूते दोन्ही गिळुनी होई तृप्त ।*
*मग सौम्यपणें तशी सुषुम्नेपाशीं राही स्वस्थ ॥*
*अशी विशुद्धा भेदुनी वरती आज्ञाचक्रीं शिरते ।*
*कुंडलिनी भ्रूमध्य स्थानीं गगनरूप मग होते ॥*

श्रीज्ञानदेवांचे समर्थ भाष्यकार हे श्रीस्वामीकार्याचे महत्त्व लक्षात येण्यास अशी संदर्भ स्थळे उपयुक्त ठरतात.

काव्यदृष्ट्या ओवी-अभंग ही जुळी भावंडे आहेत. श्रीमद्भगवद्गीतेच्या मूळ संस्कृत श्लोकातील देवाचे मनोगत श्रीज्ञानदेवांनी मराठी भाषेतील ओवीतून व्यक्त केले. त्यांच्या या महान कार्यामुळे लोकभाषेत भारतीय मोक्षविद्येच्या भागीरथीचे अवतरण घडले. जनसाधारणांकरता देशीकार लेणे तयार करून श्रीज्ञानदेवांनी प्रमेयाची उद्याने फुलवली. साहित्य सोनियाच्या खाणी उघडल्या. योग सुखाचे सोहळे प्रगट झाले. ज्ञानभक्तीचे रहस्य मांडले गेले. धर्म-अध्यात्म, साधना-साक्षात्कार संदर्भात श्रीज्ञानदेवांचे साहित्य हे मूलस्त्रोत झाले. परंतु सामाजिक स्थित्यंतरे, भाषिक बदल इ. कारणांनी ज्ञानदेवांची यादवकालीन मराठी अवघड वाटायला लागली.

अशा वेळी ज्ञानदेवांचे मनोगत अर्वाचीन मराठीत आणि तेही ओवीप्रमाणे सर्वांना सहजसुलभ अशा अभंग रचना स्वरूपात स्पष्ट होणे अगत्याचे होते. अभंग ज्ञानेश्वरी, अभंग अमृतानुभव, अभंगात्मक अनुवाद स्वरूप चांगदेव पासष्टी अशा ग्रंथांद्वारे श्रीस्वामींनी हे ऐतिहासिक महत्त्वाचे कार्य केले आहे. त्यामुळे मूळ ज्ञानेश्वरांच्या ग्रंथांचे आकलन

तर सुलभ झालेच पण श्रीज्ञानदेवांच्या समग्र जीवनदृष्टीचा भावस्पर्श साधक, उपासक, अभ्यासक यांना घडण्यास बहुमोल योगदान लाभले.

ज्याप्रमाणे भावार्थगीता हा मूळ गीताश्लोकांचा समश्लोकी अभंगानुवाद नाही, त्याचप्रमाणे अभंग ज्ञानेश्वरी या श्रीस्वामींच्या ग्रंथात मूळ ज्ञानेश्वरीतील एका ओवीचे एका अभंगचरणात रूपांतर असे स्वरूप नाही. ज्ञानेश्वरीतील मूळ ओव्यांतील प्रमेय दृष्टी, प्रचीतीचा भावस्पर्श, शब्द-अर्थाचे सौंदर्य नीटसपणे व्यक्त होईल आणि श्रीज्ञानदेवांचे हृद्गत सुलभपणे जनसाधारणांना समजेल याची दक्षता श्रीस्वामींच्या अभंगानुवादात घेतली गेल्याचे जाणवते. उदाहरणार्थ ज्ञानेश्वरी अ. १८ च्या प्रारंभीच्या ओवी क्र. १ ते २७ मध्ये श्रीज्ञानदेवांचे गुरुवंदन, त्यांची उत्कट गुरुभावदृष्टी व्यक्त झाली आहे. या ओव्यांचे अर्थ गांभीर्य आणि अभिजात संस्कृतासारखी शैली यामुळे सर्वसाधारण वाचकांना, साधकभक्तांना त्या ओव्यांचा अर्थ नीट कळेलच असे नाही. श्रीस्वामींच्या अभंग ज्ञानेश्वरीतील या ओव्यावरील ६१ अभंग चरणातून सुलभ, प्रासादिक, भावपरिपूर्ण रीतीने ज्ञानदेवांचे मनोगत स्पष्ट झाले आहे. मूळ ज्ञानेश्वरीतील ओव्या आणि श्रीस्वामींच्या अभंग ज्ञानेश्वरीत घडणारे भावार्थदर्शन यांचा एकत्र, एकात्म आस्वाद आनंददायी आहे -

***जय जय देव निर्मळ । निजजनाखिलमंगळ ।***
***जन्मजराजलदजाळ । प्रभंजन ॥***
***जयजय देव प्रबळ । विदलिता मंगळकुळ ।***
***निगमागमद्रुमफळ । फलप्रद ॥***
***जयजय देव श्रीगुरो । अकल्पनाख्यकल्पतरो ।***
***स्वसंविद्द्रुम बीज प्ररो । हणावनी ॥ - ज्ञानेश्वरी अ. १८, ओ. १-२,१०.***
***जय जय गुरुदेवा । होसी तूं निर्मळ । भक्तांसी मंगल । सर्वांपरी ॥१॥***
***जन्म-जरा रूपी । जें का मेघजाल । होवोनि अनिल । भेदिसी तें ॥२॥***
***जय जय गुरुदेवा । होसी तू प्रबळ । सर्व अमंगळ । निर्दाळिता ॥३॥***
***वेदशास्त्र रूपी । वृक्षाचें तू फळ । होसी सर्वकाळ । फलदायी ॥४॥***
***जय जय गुरुदेवा । कल्पतरू तूं च । अकल्पित साच । वस्तुदाता ॥२४॥***
***आत्मज्ञानवृक्ष । बीज अंकुराया । होसी गुरुराया । भूमि तूंच ॥२५॥***

श्रीस्वामींच्या 'अभंग ज्ञानेश्वरी'मुळे मूळ ज्ञानेश्वरी तर सुलभ होतेच पण श्रीज्ञानदेवांच्या हृद्गताचा भावस्पर्श घडतो. हे लक्षात घेता सर्व साधक, उपासक, अभ्यासक यांनी अभंग ज्ञानेश्वरीच्या सहाय्याने ज्ञानेश्वरीच्या प्रांगणात प्रवेश करणे युक्त ठरेल. विनोबा भावे यांच्या गीताई ग्रंथामुळे सर्वांना गीता आकलन सुलभ झाली. गीता समजण्याचा आनंद लाभला. त्याचप्रमाणे श्रीस्वामींच्या अभंग ज्ञानेश्वरीमुळे सर्वांना मूळ ज्ञानेश्वरी सुलभ झाली. ज्ञानेश्वरी समजण्याचा आनंद लाभला. मूळ संस्कृत काहीच न समजता केवळ संस्कृत प्रेम किंवा संस्कृतचा अहंकारी अभिमान यामुळे गीतेची पारायणे करणेच पुण्यप्रद मानणे जसे विवेकाचे लक्षण नाही; त्याचप्रमाणे ज्ञानेश्वरी समजत नसतानाही, सांप्रदायिक अभिनिवेशाने केवळ ग्रंथपारायणे करत राहणे किंवा मूळ ओव्यांचे भावसौंदर्य न समजता अर्थज्ञान न होताच त्यांची पढीक अवतरणे देत व्याख्यान-प्रवचने देत राहणे हे विवेकाचे लक्षण नाही. संतांचे ग्रंथ हे त्यांचे जीवनभाष्य असते. स्वतःशी, इतरांशी, समाज आणि सृष्टीशी या सर्वांचा मूलस्त्रोत अशा भगवत् सत्तेशी घडणारा संतांचा हृदयसंवाद संतवाणीतून पाझरत असतो. संतग्रंथाचे वाचन, पारायण, चिंतन यातून आपला संतांशी हृदयसंवाद घडायला हवा. अभंग ज्ञानेश्वरी, अभंग अमृतानुभव, चांगदेव पासष्टीचा अभंगानुवाद अशा श्रीस्वामींच्या ग्रंथांमुळे आपला श्रीज्ञानदेवांशी एकूण संत साहित्याशी, संतांच्या भावदृष्टीशी हृदय संवाद घडू शकेल. तशा भूमिकेतून श्रीस्वामींच्या ग्रंथांचे परिशीलन, अनुसंधान होत राहणे हे आपले स्वतःचे परमार्थ मार्गावरील 'पुढचे पाऊल' ठरेल.

श्रीस्वामींचा श्रीज्ञानदेवांशी असणारा, साधना आणि वाङ्मयीन कार्य संदर्भातला निकटचा अनुबंध 'पावसाचा प्रेमदीप' या ग्रंथात स्वामी सत्यदेवानंद सरस्वती यांनी सुस्पष्ट केला आहे -

'श्रीज्ञानेश्वर महाराजांच्या 'प्रस्थानत्रयी'चा अर्थात श्रीज्ञानेश्वरी, अनुभवामृत व चांगदेव पासष्टी या तीन ओवीबद्ध ग्रंथांचा अर्वाचीन, सुबोध अभंग रूपाने अनुवाद आणि या अनुवादापूर्वी बरीच वर्षे श्रीमद् भगवद्गीतेचा साकीबद्ध अनुवाद हे स्वरुपानंद स्वामीजींचे सर्वात थोर 'अक्षर' असे जीवितकार्य आहे.'

ज्ञानेश्वरमहाराजांची गुरुपरंपरा अंतरंगात नाथपंथी सोऽहं उपासनेची असून व्यवहारात भागवतधर्मीय अशी पंढरपूरच्या विठोबाच्या भक्तीची आहे.' - पावसचा प्रेमदीप पृ. ९४, १०५.

श्रीज्ञानदेवांनी ज्ञानेश्वरीच्या समारोपात आपल्या महान गुरुपरंपरेचा, नाथसंप्रदायी साधनेचा निर्देश केला आहे. (अ. १८.१७५०-६१). आदिनाथ शिव हे या साक्षात्कार मार्गाचे प्रवर्तक आहेत. मत्स्येंद्र, गोरक्ष अशा महद् विभूतींच्या द्वारा त्याचा विस्तार झाला. सिद्धान्त-साधना विकसित झाली. गहनीनाथ, निवृत्तीनाथ अशा परंपरेने 'तें शांभव । अद्वयानंद वैभव' श्रीज्ञानदेवांना प्राप्त झाले. वेदवेदान्त परंपरेची अद्वैत ज्ञानदृष्टी हे या मार्गाचे प्रमेयदर्शन आहे. प्रमेयप्रणाली आहे. आगमोक्त तंत्रविद्या, कुंडलिनी महायोगही या मार्गाची अंतरंग साधना आहे. प्रचितीची प्रक्रिया आहे. 'अध्यात्मशास्त्रीं इये । अंतरंगाची अधिकारिये ।' हे श्रीज्ञानदेवांचे उद्गार (पूर्वोक्त ओ. १७४९) महत्त्वाचे आहेत.

शब्दज्ञान, पंडिती विद्वत्ता, केवळ शास्त्रग्रंथांचा अभ्यास निरुपयोगी आहेत. अपरोक्षानुभूती, शेकडो प्रचीती, दिव्यानुभूती याकरता गुरुकृपा, भगवद्कृपा अत्यावश्यक आहे. श्रीज्ञानदेवांच्या अन्य सर्व संतांच्या उद्गारात गुरुभक्तीचे माहात्म्य वारंवार सांगितलेले आढळते. ज्ञानदेवांनी आपल्या सर्व ग्रंथातून गुरुकृपा, गुरुभक्ती यांना परममूल्य दिले आहे.

***म्हणोनि जाणतेनी गुरु भजिजे । तेणें कृतकार्या होईजे ।***
***जैसें मूळ सिंचनें सहजें । शाखापल्लव संतोषती । ज्ञानेश्वरी १.२५***

अशा शब्दांत श्रीज्ञानदेवांनी गुरुभक्ती हा परमार्थाचा प्राणस्त्रोत असल्याचे स्पष्ट केले आहे.

स्वामी स्वरुपानंदही आपल्या रचनांचे श्रेय सद्गुरुंना देतात. आपल्या संप्रदाय परंपरेचा निर्देश करणाऱ्या अभंगात त्यांनी व्यक्त

केलेली गुरुभावदृष्टी ज्ञानदेवदृष्टीशी तादात्म्य दाखवते -

*'आदिनाथ सिद्ध आदिगुरु थोर । त्यासी नमस्कार भक्तिभावें ।*
*तयाचि पासोनी शिवशक्तिबीज । लाधलें सहज मत्स्येंद्राते ॥*
*ऐसे अवतार ऐसे परंपराप्राप्त । सद्गुरु गणनाथ देई मज ।*
*स्वामी म्हणे झाले कृतार्थ जीवन । सद्गुरु चरण उपासितां ॥*

- संजीवनी गाथा : मंगलाचरण.

श्रीस्वामींची साधना आणि साक्षात्कार दर्शन यांचे प्रत्ययकारी चित्रण त्यांच्या प्रत्ययकारी अभंगवाणीत व्यक्त झाले आहे. 'सोऽहं' हा या साधनमार्गाचा प्राणस्रोत आहे. देहभाव, जीवभाव, प्रपंचभाव जेव्हा क्रमशः मावळत जातात त्या वेळी पंचकोश विलक्षण असा आत्मभाव जागृत होतो. स्वसंवेद्य अशा अंतरात्म्याचे दिव्य दर्शन घडते. आतापर्यंतच 'अहं' हा देहाची सुख-दुःखे, जीवदशेतील आधिव्याधी, प्रपंचउपाधी यातच गुरफटलेला असतो. स्थल, काल, व्यक्ती, परिस्थिती यांच्या सर्व सान्त सीमा ओलांडल्या जातात. आत्मभाव, ब्रह्मभाव प्रगट होतो. 'रसो वैसः' या श्रुति सिद्धान्ताची साक्षात् प्रचीती घडते. 'यत्र वाचो निवर्तन्ते अप्राप्य मनसासह' - अशा ब्रह्म रसानुभूतीत, स्वानंदस्थितीत 'अहं उरत नाही. त्या निर्वृत्रिक, निर्विचार, निर्विकल्प अशा आत्मभानाचे सतत अनुसंधान राहते. 'सः अहं-सोऽहं' ही नित्य प्रचीती होते. नाथसंप्रदायाची ही अंतरंग साधना श्रीस्वामींनी उत्कट शब्दांत व्यक्त केली आहे -

*स्वामी म्हणे माझा नाथ संप्रदाय । अवघें हरिमय योगबळें ।'*

- संजीवनी गाथा अ. १२२

अशा शब्दात त्यांनी 'योगभक्ती' चे संप्रदाय अधिष्ठान स्पष्ट केले आहे. ही योगसाधना पातंजल योगदर्शनाची नाही. पातंजल योगदर्शन प्रणीत योगसाधना ही कर्तृभावयुक्त, कष्टप्रद, प्रयत्नसाध्य आहे. शिवसूत्र परिभाषेत ती 'आणवोपाय' स्थिती आहे. ही सकाम, चित्तशुद्धीला उपकारक अशी साधन भक्ती नाही. ही 'स्वरुपानुसंधानं भक्तिरित्यभिधीयते ।' अशी ज्ञानभक्तीची अवस्था आहे. (श्रीमत् शंकराचार्यः विवेकचूडामणी)

नाथसंप्रदायाची योगभूमिका भगवत्कृपा, सद्गुरु कृपा द्वारा आंतरिक दिव्यशक्तीचे जागरण, योगचक्रांचे उन्मीलन आणि क्रमशः महासामरस्य भावस्थिती अशी आहे. या साधनेत आंतरिक प्रगती आणि योगानुभूतींचे वैभव हे देवात्म शक्तीच्या प्रेरणेने प्रगट होत जाते. ही प्रक्रिया शिवसूत्र परिभाषेत 'शाक्तोपाय' भूमिकेची आहे. क्रमशः यातूनच ब्राह्मीस्थिती, शिवशक्ती सामरस्य किंवा 'शांभवोपाय' स्थिती येते. ती स्वरूपस्थिती हे परमपद आहे. भवपाश निर्मूलन आणि स्वरुपस्थितीचा परमानंद ही त्याची लक्षणे आहेत. श्रीस्वामींचे 'स्वरुपानंद' हे नाव त्या परमोच्च जीवन्मुक्त स्थितीचे निर्देशक आहे. ऐहिकाकडून पारलौकिकाकडे, पार्थिवतेकडून परतत्त्वाकडे, शुष्क ज्ञानाकडून विज्ञान स्थितीकडे होणारा हा प्रवास आहे. स्वामींनी या प्रवासात लाभणाऱ्या 'अमृतधारा' प्रगट केल्या आहेत. त्यांचा अमृतधारा ग्रंथ म्हणजे 'जीवन्मुक्ताचे स्वगत' आहे.

*स्वरुपानुसंधान सर्वदा धर्म जगाचा एक ।*
*कळाया हवा तरी पहावा नित्यानित्य विवेक ॥*
*मी-माझें भ्रांतीचें ओझें उतर खालती आधीं ।*
*तरिच तत्त्वतां क्षणात हाता येते सहज समाधि ॥*
*सहजसमाधि संतत साधीं न लगे साधन अन्य ।*

सुटुनी आधि, व्याधि, उपाधि होतें जीवन धन्य ॥ अमृतधारा : साकी १०६, ११०-१११

अशा शब्दांत श्रीस्वामींनी 'अमृतधारा' मागील तत्त्वदृष्टी स्पष्ट केली आहे.

*अंतरांतुनी सहज ध्वनि तो निघतो सोऽहं सोऽहं ।*
*विनाश्रवण ऐकतां तोषतो माझा आत्माराम ॥*
*विनावैखरी होत अंतरीं सोहं शब्दोच्चार ।*
*सहजभजन अभ्यसन जव नसे अद्वैती व्यापार ॥*
*मी-तूं पण अस्तवले आलें साधनेस पूर्णत्व ।*
*कणाकणांत कोंदलें एकलें एक नित्य सतत्त्व ॥ पूर्वोक्त साकी १४८-४९, १६०*

अशा शब्दांत श्रीस्वामींनी साधनेचे अंतरंग आणि त्यामुळे येणारी विश्वात्मभाव ही परमोच्च स्थिती स्पष्ट केली आहे.

अन्य नामस्मरणाप्रमाणे 'सोऽहं' हा वाचिक, उपांशु, मानस जप नाही. ते अनाहत दिव्यनाद श्रवण आहे. ते घडता घडता सर्व चित्तवृत्तींचा लय घडतो. सामरस्यभाव - सोऽहं भाव स्थिर होतो. ती सोहंस्थिती नित्य राहणे ही जीवन्मुक्ती आहे. श्रीस्वामींनी पूर्णत्वाचे प्रवासी म्हणून ही अनंताची आनंदयात्रा स्वतः पूर्ण केली आणि आपल्या अनुग्रहातून, ग्रंथातून, अभंगवाणीतून हे परमार्थ पाथेय सर्वांना प्रदान केले.

आपली 'जीवन्मुक्तीची आनंदयात्रा' श्रीस्वामींनी एका अभंगात प्रत्ययकारी आणि पारदर्शी शब्दांत व्यक्त केली आहे. भारतीय मोक्षविद्येचे, साक्षात्कार साधनमार्गाचे साररहस्य या अभंगात प्रकट झाले आहे -

*विश्वीं विश्वंभर जनीं जनार्दन । मानिलें वचन संतांचें हें ॥१॥*
*सांडोनियां स्वार्थ लोकसेवाव्रत । आचरिलें येथ आवडीनें ॥२॥*
*तोंचि अवचित भेटला समर्थ । स्वामी गणनाथ कृपार्णव ॥३॥*
*पूर्णकृपादृष्टी मातें अवलोकी । ठेवुनी मस्तकीं कृपाहस्त ॥४॥*
*सोऽहं मंत्र गुज सांगितलें कानीं । शब्दाविण ध्वनि ऐकविला ॥५॥*
*'तत्त्वमसि' महावाक्य विवरून । ॐकाराची खूण दाखविली ॥६॥*
*पाहतां पाहतां गेलें देहभान । झाली ओळखण स्वरूपाची ॥७॥*
*स्वरूपीं लागली अखंड समाधी । आटली उपाधि अविद्येची ॥८॥*
*मनाचें उन्मन होतां ध्याता-ध्यान । ध्येयीं चि संपूर्ण मिसळली ॥९॥*
*गेलें मी-तूं-पण एकला अभिन्न । जनीं जनार्दन प्रकटला ॥१०॥*
*स्वामी म्हणे मज ऐसा साक्षात्कार । विश्वीं विश्वंभर कोंदाटला ॥११॥*

- संजीवनी गाथा अ. २१

शास्त्रप्रचिती, गुरुप्रचिती, आत्मप्रचिती यांचा संगम या श्रीस्वामींच्या दिव्य अनुभूतीत आहे. परोक्षज्ञानाकडून अपरोक्षानुभूतीकडे पूर्ण झालेली ही अंतरंग साधना आहे. या साधनेचा शुभारंभ सत्संग, निष्काम स्वधर्माचरण हा आहे. यामुळे आत्मज्ञानाचा अधिकार येतो. त्या वेळीच

भगवत्कृपा, भगवत्कृपा स्वरूप, सद्गुरु अनुग्रह घडतो. सद्गुरुंचे कृपावलोकन, मस्तकी कृपाहस्त हा आंतरिक दिव्यशक्ती जागृतीचा मंगल क्षण आहे. 'शाब्देपरेच निष्णातं, श्रोत्रियं ब्रह्मनिष्ठं' असं समर्थ सद्गुरु श्रृतिरहस्यही सांगतात आणि प्रणववाच्य भगवत्स्वरूपाची ओळख करून देतात. या भगवत सत्तेशी तादात्म्य घडते ते सोऽहंच्या दिव्य अनाहत नाद श्रवणाने. देहाकडून देही चिन्मय स्वरूपाकडे प्रवास घडतो. स्वरूपाची विस्मृती हेच अज्ञान दूर होते. देहतादात्म्य, जीवाचा कर्मबंध, प्रपंच सुखाची आसक्ती दूर होते. त्रिगुण आणि त्रिपुटी यांच्या सीमा संपतात. द्वंद आणि द्वैत यांचा प्रांत ओलांडला जातो. अखंड समाधी, उन्मनी भाव, 'शान्तं शिवं अद्वैतं' स्थिती लाभते. 'यद्गत्वा न निवर्तन्ते' असे परन्धाम ही जीवन्मुक्ताची स्वानंदस्थिती आहे. यापुढचे सारे जीवन हे 'जनीं जनार्दन' वृत्तीने लोककल्याणार्थ व्यतीत होते. विश्वात्मक देवाचे अनुसंधान आणि त्या दिव्य भावस्थितीत अखंड राहणे हाच स्वरूप साक्षात्कार असतो. श्रीस्वामींचे पारमार्थिक आत्मचरित्र म्हणजे हा आणि असे त्यांचे अभंग आहेत. श्रीस्वामींचा अमृतानुभव किंवा अनुभवामृत म्हणजे त्यांची 'संजीवनी गाथा' आहे.

ज्ञानेश्वरी, अमृतानुभव, चांगदेवपासष्टी या ग्रंथांचे श्रीस्वामींनी केलेले अभंगानुवाद ही त्यांची नाथसंप्रदायाची, श्रीज्ञानदेवांची आणि स्वगुरुप्राप्त साधनमार्गाची / इत्येषा वाङ्मयी पूजा आहे. मुमुक्षु, साधक, सिद्ध अशा परमार्थ अवस्थांतून संक्रांत होत श्रीस्वामींनी लोककल्याणार्थ स्वतः श्रीगुरुपद प्राप्त केले आणि भारतीय मोक्षविद्येचे प्रवक्ते अशा ऋषींचा, संतांचा दिव्य वारसा सर्वांना प्रदान केला. त्यांच्या पारमार्थिक जीवनात आर्त, जिज्ञासु, ज्ञानी अशा भक्तांच्या अवस्था उत्कटपणे व्यक्त झाल्या. श्रीगुरु आणि 'श्रीगुरुः सर्वसमष्टीभूता आद्याशक्तीः । (भावन्तोपनिषद), भगवती चित्शक्तीची उपासना हा त्यांच्या अंतरंग जीवनाचा प्राणस्त्रोत आहे. ब्रह्मात्मैक्य, शिवशक्तीसामरस्य, कैवल्य, सहजस्थिती, मोक्ष या समानार्थक अशा विविध साधनमार्गातील संज्ञा आहेत. परिभाषा बदलली, साधनेचे काही तपशील वेगळे राहिले तरी अनुभूती एकच असते. श्रीस्वामींनी हे अनुभवरहस्य आणि तिचे अधिष्ठान असणारी सोऽहं साधना यांचे सर्व स्तरातील लोकांना मार्गदर्शन केले. प्राचीन ऋषींनी, श्रीज्ञानदेवांनी आपल्या ग्रंथातून विशद केलेली मोक्षविद्या श्रीस्वामींचे जीवन, कार्य, साहित्य यातून सजीव, साकार झाली.

श्रीज्ञानदेवांची भावदृष्टी आणि श्रीस्वामींची भूमिका यांचा आंतरिक अनुबंध अनुवादित ग्रंथातील काही संदर्भातून सुस्पष्ट होतो -

***एवं द्रष्य द्रष्टा । दर्शन हीं तीन । झालीं तरी जाण । एकार्थीच ॥***
***परी लोपता तें । त्रिपुटीचें भान । एक चि चिद्घन । आत्मा राहे ॥***
***परमात्मा जैसा । स्वयें सच्चिद्घन । आनंद निधान । परिपूर्ण ॥***
***आपण हि तैसे । व्हावें परिपूर्ण । तद्रूप होवोन । सोऽहंभावे ॥***

- श्रीचांगदेव पासष्टी : अभंगात्मक अनुवाद, ५०.५१, १३०-३१

श्रीचांगदेवांच्या निमित्ताने श्रीज्ञानदेवांनी आत्मसाक्षात्काराचे संविद्रहस्य प्रगट केले. श्रीस्वामींच्या प्रासादिक अनुवादाने ते आकलन सुलभ झाले. श्रीज्ञानदेवांच्या परमार्थ दृष्टीचे सार रहस्य असणाऱ्या या अल्पाक्षरी पण बहुमिती ग्रंथाच्या चिंतनाची फलश्रुती श्रीस्वामींनी हृद्य शब्दांत व्यक्त केली आहे -

***चांगदेवासंगे । ह्यापरी निःशब्द । केला जो संवाद । ज्ञानदेवें ॥***
***तया संवादाचा । अभंगीं सुबोध । झाला अनुवाद । गुरुकृपें ॥***
***गुरुकृपें ऐसें । लाधलें हें ज्ञान । करावें जतन । भक्तिभावें ॥***
***भक्तिभावें ह्याचें । घडतां चिंतन । तुटेल बंधन । प्रपंचाचें ॥***
***प्रपंचाचें बंध । तुटोनिया जीव । लाभेल विसावा । आत्मरूपीं ॥***
***आत्मरूपीं सुख । भोगितां अमूप । व्हावे सुखरूप । स्वामी म्हणे॥***

- पूर्वोक्त - ग्रंथसमारोप, १-५.

चांगदेवपासष्टी ग्रंथात जे अनुभूती रहस्य श्रीज्ञानदेवांनी व्यक्त केले, तेच अमृतानुभव ग्रंथात श्रीज्ञानदेवांनी विस्ताराने सुस्पष्ट केले आहे. सद्गुरु कृपा, अंतरंग साधना याद्वारा प्राप्त स्वतःचे 'अनुभवामृत' त्यांनी प्रत्ययकारी परिभाषेत मांडले आहे.

वस्तुतः ज्ञानेश्वरी आणि अमृतानुभव यांची मांडणी, तपशील, परिभाषा वेगळी वाटली तरी ज्ञानदेव दृष्टीत फरक नाही. दोन्ही ग्रंथातून मूलभूत प्रमेये बहुतांश समान शब्दांत व्यक्त झालेली दिसतात. (अनुभवामृत, संपा. डॉ. वा. दा. गोखले, प्रस्तावना : ज्ञानदेवीतील अनुभवामृताची बीजे, पृ. २७-३०). काही ठळक संदर्भ पुढीलप्रमाणे -

***आतां अज्ञान अवघें हरपे । विज्ञान निःशेष करपे ।***
***आणि ज्ञान तें स्वरुपें । होऊनि जाइजे ॥ - ज्ञानेश्वरी अ. ७***

'सर्व खल्विद ब्रह्म' - हे श्रुतिरहस्य श्रीज्ञानदेवांनी स्वानुभूतीरूपात स्पष्ट केले आहे. किंबहुना चराचर आपण जाहला' अशी अनुभूती प्राप्त जीवन्मुक्ताचे विश्वदर्शन हे अज्ञानी जीवाप्रमाणे जड, द्वैत-द्वन्दयुक्त भेद बुद्धीने ग्रस्त नसते. 'जग असकी वस्तुप्रभा' ही जीवन्मुक्ताची अनुभूती आहे. (अमृतानुभव ७.२७). असेच संदर्भ ज्ञानेश्वरीतही आले आहेत -

***तैसी प्रकृति आत्मप्रभा । अ. १३.१०८१***
***मग वस्तुप्रभाचि पाही । प्रगट होय । अ. १५.८४***

श्रीज्ञानदेवांनी गुरुकृपेने प्राप्त शिवशक्ती सामरस्य प्रक्रिया अमृतानुभव ग्रंथात स्पष्ट केली आहे. 'पूर्णाहंता वेढतों' अशा शब्दांत त्यांनी जीवन्मुक्त अवस्था वर्णन केली आहे. यया परीतें कांहीं । संविद्रहस्य नाही ।' अशा शब्दांत या अवस्थेचे परमोच्च तात्त्विक रूप व्यक्त केले आहे. श्रीज्ञानदेवांचे मनोगत अभंगरूपात श्रीस्वामींनी समर्थपणे सुस्पष्ट केले आहे.

***ह्याचि देहीं ह्याचि डोळां । जीवन्मुक्त । होती ज्ञानी भक्त । ब्रह्मरूप ॥***
***स्वानुभूतीचें हें । अमृतस्वभाव । वाढिलें सज्जनां श्रोतयांसी ॥***
***विश्व जनें आतां । भोगावा अखंड । आनंदे स्वानंद । स्वाभाविक ॥***

- अभंग अमृतानुभव प्र.१०, ग्रंथमहिमा, ४१, ५१, ६९.

श्रीज्ञानदेवांचे मनोगत यथार्थपणे न समजून घेता आपल्याला प्रिय अशा भूमिकांचा अध्यारोप केल्याने अभ्यासकात भेद दृष्टी दिसते. त्यामुळेच एकांगी दृष्टीतून, श्रीज्ञानदेवांची भूमिका शांकरवेदात किंवा काश्मीर शिवाद्वयवाद किंवा नाथसंप्रदायी किंवा केवळ भक्तीला प्राधान्य देणारी वा केवळ कुंडलिनी योग मांडणारी आहे, अशा समीक्षा व्यक्त झालेल्या दिसतात. वस्तुतः श्रीज्ञानदेवांची जीवनदृष्टी समग्र, एकात्म,

समन्वयी भूमिकेतून समजून घ्यायला हवी; कारण भारतीय मोक्षविद्येतील विविध विचारधारांचा हृद्य संगम म्हणजे ज्ञानदेवांचे जीवनदर्शन आहे.

वेदवेदान्त परंपरा, आगमोक्त तंत्रविद्या, पातंजल योगदर्शन, भक्तिसाधना, गुरुमार्ग दृष्टी या भारतीय मोक्षविद्येच्या भागीरथी प्रवाहाच्या प्रमुख धारा आहेत. ब्रम्हात्म्यैक्य, शिवशक्ती सामरस्य, कैवल्य, भगवत्सायुज्य, स्वरूपस्थिती या विविध संकल्पनांची मूळ अधिष्ठाने समजून घेत या भागीरथीचा मूलस्त्रोत पहावयास हवा. तसे न करता मांडली जाणारी आग्रही, पूर्वग्रही प्रतिपादने म्हणजे 'अशुद्ध बुद्धीचे वैचित्र्य ठरते. साधक, उपासक, अभ्यासक यांनी त्यापासून सावध राहणे, साक्षेप राखणे अगत्याचे आहे.

***ज्ञानी इयेतें स्वसंवित्ति । शैव म्हणती शक्ति ।***
***आम्ही परमभक्ति । आपुली म्हणों ॥ - ज्ञानेश्वरी अ. १८.११३३***

अशा शब्दांत श्रीज्ञानदेवांनी विविध विचारधारांची एकविधता स्पष्ट केली आहे. संविद् ही आत्मवाच्य संज्ञा आहे. 'आत्माद्वारे अरे द्रष्टव्यः श्रोतव्यः मन्तव्यः निदिध्यासितव्यः । - हा श्रुतींचा, उपनिषदे किंवा वेदवेदान्त दृष्टीचा अभिप्राय आत्मवाद, ब्रह्मवाद भूमिकेचा आहे. संविद् ही आत्मशक्ती आहे. 'एषाऽत्म शक्तिः । एषा ब्रह्मविद्या (देव्यथर्वशीर्ष उपनिषद्) । हे ज्ञानमार्ग दृष्टीचे अधिष्ठान आहे. अंतरात्म्याची उपासना म्हणजे सर्व वृत्तींचा लय होऊन निर्वृत्तिक अशी 'शान्तं शिवं अद्वैतं ।' स्थिती येणे, त्या स्वानंदसमाधीत निमग्न राहणे होय.

***संविदेव पराशक्तिः नेतरा परमार्थतः ।***
***या पूजा संविदि प्रोक्ता तादुतस्यां मनोलयः ॥***

- सूतसंहिता १.५

हा अभिप्राय महत्त्वाचा आहे. ऋषींना, संतांना, श्रीस्वामींना अभिप्रेत असणारी त्यांनी प्रभावीपणे सुस्पष्ट केलेली 'सोऽहं साधना' ही संविद् स्वरूप आत्मसाक्षात्कार प्रक्रिया आहे.

श्रीज्ञानदेवांनी सुस्पष्ट केलेला 'पंथराज' (ज्ञानेश्वरी अ. ६) ही भगवत्कृपा, गुरुकृपाद्वारा प्राप्त होणारी कुंडलिनी महायोग साधना आहे. आगमोक्त तंत्रविद्या, काश्मीर शैवदर्शन, नाथसंप्रदाय योगोपनिषदे यांमधून तिचं अंतरंग स्पष्ट झाले आहे. हठयोग, लययोग, मंत्रयोग, राजयोग, भगवत्कृपा-गुरुकृपायोग यांचा संगम या साधनेत घडतो. श्रीज्ञानदेवांनी हे कृपारहस्य आपल्या ग्रंथातून स्पष्ट केले. ज्ञानेश्वरीप्रमाणेच अमृतानुभव ग्रंथात, योगपर अभंगात त्यांनी आपल्या दिव्य अनुभूती प्रगट केल्या आहेत. श्रीज्ञानदेव या साधनेविषयी म्हणतात -

***इये अभ्यासी जे दृढ होती । ते परवतोंनि ब्रह्मत्वावेती ।***

- ज्ञानेश्वरी अ. ६.३३०

श्रीस्वामींना लाभलेली गुरुकृपा आणि प्राप्त झालेली ब्राह्मीस्थिती ही 'पंथराज' साधनेची महान फलश्रुती आहे.

मध्ययुगीन आणि नंतरच्या काळात वेदविद्या ही कर्मठ यज्ञसंस्था झाली. वेदान्त पंडिती वादविवादात गुरफटला. योगसाधना, तंत्रविद्या यात पंच मकारांची प्रदूषणे वाढली. अशा वेळी शंकराचार्य, गोरक्षनाथ, श्रीज्ञानदेव यांनी भारतीय मोक्षविद्येचा भागीरथी प्रवाह पुन्हा निर्मल, परममंगल केला. त्यांचे महान जीवन, कार्य, साहित्य यांचे परिशीलन नीटसपणे व्हायला हवे. श्रीस्वामींच्या जीवनदृष्टीत या सर्वांचा प्रयाग संगम आहे.

संतांनी भक्तिसाधनेला प्राधान्य दिले. ही सामान्यजनांची सकाम, कर्तृभावयुक्त साधनभक्ती किंवा गौणी भक्ती नाही. ती परमप्रेमरूपा अमृतरूपा पराभक्ती आहे. श्रीनारद भक्तिसूत्र, शाण्डिल्य भक्तिसूत्र, श्रीमद्भागवत अशा संहितातून तिचे अंतरंग स्पष्ट झाले आहे. भागवतधर्माचा हा प्राणस्त्रोत आहे. श्रीज्ञानदेवांच्या 'विरहिणी' म्हणजे उत्कट प्रेमभक्तीचे सहजोद्धार आहेत. भगवद्विरहाची वेदना आणि भगवद्भेटीचा आनंद (Agony and Ecstacy) यांनी संतांचे जीवन भावविभोर होते. संतांची अभंगवाणी हा अशा परमभक्तीचा उत्कट भावाविष्कार आहे. श्रीस्वामींच्या अभंगातूनही अशा प्रेमभक्तीचे पाझर आहेत -

***उच्चारितां नाम आनंदलें मन । दाटले लोचन प्रेमाश्रूंनी ॥***
***घामेजली काया झाली रोमांचित । थरारे कंपित होवोनिया ॥***
***कंठ सद्गदित स्तब्ध झाले चित्त । होती विगलित सर्व गात्रे ॥***
***स्वामी म्हणे अंती गेलें देहभान । प्रेमें होतां लीन आत्मरूपीं ।***

- संजीवनी गाथा अ. २०६.

श्रीस्वामींचे अंतर्जीवन भगवतीच्या उपासनेतून पाझरणाऱ्या 'अमृतधारां'नी समृद्ध झाले. उत्कट गुरुभक्तीचे चांदणे त्यांच्या भावजीवनात पसरले. सोऽहं साधनेतून पूर्णत्व प्राप्त असे त्यांचे परमार्थ जीवन म्हणजे ब्रह्मरसानुभूतीच्या सुगंधाने डवरलेले ब्रह्मकमळ झाले. आपली जीवन्मुक्त स्थिती वर्णन करताना श्रीस्वामी म्हणतात -

***स्व-रूपीं विश्व-रूप देखिलें । विश्व-रूपीं स्व-रूप सामावलें ।***
***स्व-रूपा विश्व-रूपामुळे । नित्यतत्त्व ॥*** - नवरत्नहार

***आता आत्मरूप झालें त्रिभुवन । हारपलें भान त्रिकालाचें ॥***
***स्वामी म्हणे मन होता चि उन्मन । लाधले निधान स्वानंदाचें ॥***

- संजीवनी गाथा अ. २५९

***आतां मजलागीं काय उणें जगीं । आवडीनें भोगी शांतिसुख ॥***
***झालें अंतर्बाह्य देवाचें दर्शन । स्थिरावलें मन देवापायीं ॥***
***स्वामी म्हणे सुख भोगिता अमूप । आलों सुखरूप आपोआप ।***

- पूर्वोक्त अ. २००

ऑक्टोबर १९७० च्या शेवटच्या आठवड्यात पावस येथे श्रीस्वामींची समक्ष भेट झाली. त्या काळात त्यांचे सक्रिय मार्गदर्शन सुरू होते. समक्ष भेटीत मी आणि माझ्या सुविद्य पत्नी डॉ. सौ. सुमीता जोशी यांना सोऽहं साधनेचे मार्गदर्शन लाभले. भावार्थ गीता आणि अमृतधारा ग्रंथातील काही भागावर श्रीस्वामींचे दिव्यभाष्य श्रवण करता आले. पुढे 'अर्वाचीन संतगाथा' ग्रंथाचे संपादन करताना (कॉन्टिनेन्टल प्रकाशन, १९९०) श्रीस्वामींचे समग्र वाङ्मय, अभंगवाणी यांचे अध्ययन घडले. श्रीस्वामींची भेट, मार्गदर्शन म्हणजे परमार्थ साधनेतील, अनुभूतींच्या अंतरंग आनंदयात्रेतील अमृतधारांचे परममंगल भागीरथी स्नान आहे.

आज परमार्थ क्षेत्रात विदारक स्थिती आहे. होतकरू अभ्यासक, गाढे विद्वान, शब्दवेल्हाळ वक्ते, ह. भ. प., बुवा, गुरु, महंत,

महाराज यांची भाऊगर्दी दाटली आहे. भगवत्सत्ता, गुरुतत्त्व, संप्रदाय श्रेष्ठता यांच्यापेक्षा स्वतःचे महत्त्व, प्रतिष्ठा, लोकप्रियता वाढविण्याची प्रवृत्ती वाढते आहे. अशा प्रदूषणग्रस्त परमार्थक्षेत्राकडे पाहून 'न च कश्चित् श्रृणोतिमाम्' - आमचे कोणी ऐकूनच घेत नाही, हा 'व्यासांचा आक्रोश' हे संतांचे प्राक्तन झाले आहे. 'देवासाठी संसार' अशा शुद्ध परमार्थ दृष्टीऐवजी 'संसारासाठी देव' अशा वृत्तीने धर्म, परमार्थ, साधना वाढत आहे. 'हे विश्वचि माझें घर' अशा श्रीज्ञानदेवांना अभिप्रेत विश्वात्मक आत्मौपम्य दृष्टी ऐवजी 'हें विश्व माझेचि घर' अशा स्वार्थ वृत्तीने सर्व जीवनव्यवहार घडत आहेत.

'जेणें धरिला शुद्ध परमार्थ' अशा साधक उपासकांनी वस्तुतः
मार्गाधारें वर्तावें । विश्व हें मोहरे लावावें ।
*अलौकिक नोहावें । लोकाप्रती ॥ - ज्ञानेश्वरी अ. ३.१७१*

हे श्रीज्ञानदेवांचे मार्गदर्शन समोर ठेवून सर्व जीवन व्यवहार पूर्ण करावयास हवेत.

आज ज्ञानाचा विस्तार होत आहे. पण आत्मस्वरूपाविषयीचे अज्ञान वाढते आहे. बाह्य समृद्धी वाढते आहे. पण आंतरिक जीवन भावशून्य होत आहे. त्यामुळे 'गर्दीत एकाकी' आणि 'श्रीमंतीत दरिद्री' अशी माणसाची अवस्था आहे. अशा वेळी श्रीज्ञानदेवांचे 'पसायदान' आणि श्रीस्वामींची 'वरप्रार्थना' सर्वांना प्रेरक, मार्गदर्शक ठरते.

'स्वरूप पत्रमंजूषा' मधील एका पत्रात (क्र. ५७) श्रीस्वामींनी आजच्या माणसास हितकारक विद्येची लक्षणे स्पष्ट केली आहेत. अज्ञान-अंधकार दूर करणारी, शाश्वत सुखाचा मार्ग दाखवणारी, चित्तास शांतता देणारी, अहंकार दूर करून चित्त प्रसन्न करणारी विद्या इष्ट आहे. त्यामुळेच व्यक्ती, समाज आणि विश्व यांचे खरे हित साधू शकेल. सध्याचे युग माहिती स्फोट, माहिती तंत्रज्ञान यांचे आहे. जीवनास सार्थकता देणारी, दिशा आणि ध्येय देणारी, आत्मबल वाढवणारी आणि जीवनाची आनंदयात्रा सफल संपूर्ण करणारी विद्या आवश्यक आहे. श्रीज्ञानदेवांचे जीवन, कार्य, साहित्य यांचे ते प्रयोजन आहे.

*आनंदी जन्म जी घेते । आनंदें विश्व कोंदते ।*
*आनंदी लीन जी होते । ती विद्या मिळवूं इथे ॥*

श्रीस्वामींचे सदर पत्रातील हे आवाहन हा उद्याच्या मानवतेचा धर्म आहे. तशा जीवनाचे पथदर्शन हे श्रीस्वामींचे महान योगदान आहे. श्रीज्ञानदेवांचे समर्थ भाष्यकार म्हणून त्यांचे हे योगदान समजून घेणे आणि त्या दृष्टीने वाटचाल करणे हीच त्यांना खरी आदरांजली आहे. श्रीस्वामींचे जीवन, कार्य, साहित्य यातून सर्व साधक उपासकांना स्वस्वरूपाचे ज्ञान प्राप्त होवो; सोऽहं साधनेचे विज्ञान प्राप्त होवो; स्वानंद समाधीचे प्रज्ञान प्राप्त होवो; 'धन्य मी कृतार्थ मी ।' अशी स्थिती प्राप्त होवो; आणि पूर्णत्वाचे प्रवासी म्हणून सर्वांची जीवनयात्रा सफल संपूर्ण होवो, ही श्रींचरणी प्रार्थना !

**डॉ. अ. बा. जोशी**
'संवाद', २८/३२७, गंगानगर, प्राधिकरण,
निगडी, पुणे ४११ ०४४.

# गुरु मंत्र मजसि मिळाला

आज माझ्या जीवनात    एक स्वप्न साकारलं
मला माझ्या गुरुदेवांचं    आज दर्शन घडलं ॥
आजवरी माझ्या मनी    स्वप्न ऐक मी चिंतील
तेच आज माझ्यासाठी    खर खर प्रकटलं ॥
आजवरी संसारात    सारं जीवन गुंतलं
राग लोभ मोह आज    याना पार दूर केलं ॥
मन प्रसन्न प्रसन्न    फार आनंद दाटला
आज माझ्या गुरुदेवांनी    मला गुरुमंत्र दिधला ॥
"मनी वसला आहे राम    हेच मानवा भूषण
खरा गुरु आहे मन    तेच देते शिकवण ॥
तोच गुरु मानवाचा    तोच धर्म अखिल जनांचा
असे सर्वांनी वागावे    असा संदेश संतांचा ॥
ध्यानी, मनी, उठता बसता    राम नाम उच्चारावे
सदाचार सुविचार    जीवनात आचरावे ॥
दासबोध गाथा आणि    हेच सांगे ज्ञानेश्वरी
साऱ्या जीवनाचे सार    जगी आहे खरोखरी ॥
नको उपास तापास    नको प्रायास आयास
खरा मानवता धर्म    नित्य आचारावा खास"॥
आज धन्य मी जाहले    गुरु मंत्र मजसि मिळाला
असा माझा मानविजन्म    नीट सार्थकी लागला ॥

**सौ. कमला दातार**

# प्रगटले श्रीस्वामी

दूरवर दिसला मला अग्निबाण ।
तेजःपुंज आणि दैदिप्यमान ॥
प्रखर प्रकाश उजळला त्या गगनी ।
मी मोहूनी गेले त्यास पाहूनी मनी ॥
त्यातून प्रगटले श्रीस्वामी स्वरुपानंद ।
मज मनी जाहला खूप अत्यानंद ॥
श्रीस्वरूप म्हणे तू नको करू अविचार ।
स्वच्छ नीट तू ठेव तुझे आचार ॥
श्रीस्वरूप म्हणे तू नको माजवू स्तोम ।
ध्यानी मनी म्हण तू सो हम्, सोहम् सोहम् ॥

**सौ. मृणाल सुहास थोरात**

# श्रीमद् भावार्थ गीता : एक अध्ययन

प्रा. डॉ. सौ. शैलजा कात्रे

*प्राध्यापिका, संस्कृत विभाग, स. प. महाविद्यालय, पुणे.*

भारतीय तत्त्वज्ञानात उपनिषदे, ब्रह्मसूत्रे आणि श्रीमद्भगवद्गीता या 'प्रस्थानत्रयींना' अतिशय महत्त्व आहे. या प्रस्थानत्रयींमध्येही भगवद्गीता या ग्रंथावर सर्व भाषांमधून सर्वात जास्त टीका व भाष्यग्रंथ निर्माण झाले आहेत. भगवद्गीतेच्या या लोकप्रियतेमुळे संस्कृत भाषेत तसेच इतर भाषांमधूनही अनेक गीताकाव्ये निर्माण झाली आहेत. तरीही श्रीमद्भगवद्गीतेचे एकमेवाद्वितीयत्व मात्र अबाधितच राहिले.

भगवद्गीतेतील तत्त्वज्ञान जनसामान्यांपर्यंत पोहोचविण्याच्या उद्देशाने संतश्रेष्ठ श्रीज्ञानेश्वरांनी ज्ञानेश्वरी हा ओवीबद्ध ग्रंथ तत्कालीन मराठी भाषेत लिहिला. अमृतातेही पैजा जिंकणाऱ्या आपल्या रसाळ वाणीने ज्ञानोबांनी गीतेतील तत्त्वज्ञानाचा खजिना ज्ञानेश्वरीच्या रूपाने मराठी माणसांपुढे रिता केला. 'भाष्यकाराते वाट पुसत' ज्ञानेश्वरांनी गीता-तत्त्वज्ञानाला 'मराठीचिये नगरीत' मोठ्या दिमाखाने निरनिराळ्या वेषांनी सजविले. 'शके बाराशते बारोत्तरे' या काळात लिहिलेली ज्ञानेश्वरी पुढे कालांतराने भाषेतील बदलामुळे अवघड बनली. त्यामुळे ज्ञानेश्वरीवरही मराठीत 'टीका' निर्माण झाल्या.

हीच परंपरा एकोणीस-विसाव्या शतकातील नाथ परंपरेचे पाईक असणाऱ्या सद्गुरु स्वामी स्वरुपानंदांनी पुढे चालविली. ज्ञानेश्वरीबद्दल 'दुजी सृष्टी, निर्माण झाल्याचे धन्यतापूर्वक वर्णन ज्ञानेश्वरांनी केले आहे. भावार्थदीपिका अर्थात् ज्ञानेश्वरी ही गीतेवरील टीका जशी 'दुजी सृष्टी' त्याचप्रमाणे स्वामी स्वरुपानंदांनी केलेले गीतेवरील भाष्य 'श्रीमद्भावार्थदीपिका' म्हणजे ही एका अर्थी दुजी सृष्टीच होय. गीता व ज्ञानेश्वरीतील विचार 'ज्ञानोबाते वाट पुसत' अभिनव मराठीच्या शैलीने साकी वृत्तातून स्वामींनी मोठ्या रसाळपणे मांडले आहेत. स्वामींच्या या भावार्थ गीतेमुळे गीता व ज्ञानेश्वरीच्या या काळातील भक्तांना व अभ्यासूंना त्या ग्रंथांचे अध्ययन करण्याची नवीनच वाट दाखविली.

स्वामी स्वरुपानंदांची श्रीमद्भावार्थगीता ही भगवद्गीतेप्रमाणेच अठरा अध्यायांची आहे. श्रीस्वामीक्षेत्र पावस, जिल्हा रत्नागिरी येथील देसाई बंधूंनी स्वामी स्वरुपानंद सेवा मंडळ, पावस या प्रकाशक मंडळाद्वारा शके १८७३ मध्ये ही गीता प्रकाशित केली. आतापर्यंत त्याच्या आठ आवृत्त्या निघाल्या. स्वामींच्या भक्तांना हे पुस्तक म्हणजे मोठी पर्वणीच ठरली आहे. याची प्रचीतीच जणू या पुस्तकाच्या मागणीवरून येते. महामहोपाध्याय दत्तो वामन पोतदार यांनीही या पुस्तकाला लिहिलेल्या पुरस्कारामध्ये 'स्वामींच्या या अनुवादाने थोडक्यात ज्ञानेश्वरीचाही रसांश आपल्याला चाखता येतो' असे म्हटले आहे.

ग्रंथाच्या सुरुवातीस प्रकाशकांनी या भावार्थ गीता निर्मितीची सांगितलेली कहाणी मोठी उद्बोधक आहे, ते लिहितात -

स्वामी नित्याप्रमाणे गीतेच्या दुसऱ्या अध्यायातील 'दुःखेष्वनुद्विग्नमनाः सुखेषु विगतस्पृहः' (गीता २.५६) या स्थितप्रज्ञाच्या लक्षणाचे मनन करीत असताना पुढील काव्यपङ्क्ती त्यांना सहजासहजी स्फुरल्या –

*'अंगावरती जरि कोसळती डोंगरही दुःखाचे*
*असे अढळ मन सदा जयाचे नाव न उद्वेगाचे*
*आणि सुखाची हाव जयाच्या नाही अंतःकरणी*
*संगरहित निर्भय अक्रोधी स्थितप्रज्ञ तो मौनी'*

आणि याच वेळी समग्र गीतेचा प्राकृतात अनुवाद करावा अशी त्यांस प्रेरणा झाली. त्या दिवसापासून रोज दोन-चार श्लोक मननासाठी घेऊन त्यांचा अनुवाद त्यांनी लिहिला आणि अशा प्रकारे श्रीमद्-भावार्थ-गीता उदयाला आली.

भगवद्गीतेचे निरनिराळे पाच-सहा समश्लोकी पद्यानुवाद सध्या उपलब्ध असले तरी मुख्यत्वे ज्ञानेश्वरीच्या आधारे केलेला विवरणात्मक असा हा पद्यमय अनुवाद असल्यामुळे स्वामींची श्रीमद्भावार्थ गीता वैशिष्ट्यपूर्ण साकारली आहे. शिवाय स्वामीजींच्या साक्या स्वयंस्फूर्त असल्याने गीतेतील श्लोकांचा नेमका भाव यात उतरला आहे. याची अनेक उदाहरणे भावार्थ गीतेत जागोजागी आढळतील. येथे वानगीदाखल एक श्लोक पाहू :

*तस्मादसक्तः सततं कार्यं कर्म समाचर ।*
*असक्तो ह्याचरन्कर्म परमाप्नोति पूरुषः । (गीता. ३-१९)*
*या श्लोकावरील स्पष्टीकरणात ज्ञानेश्वर म्हणतात –*
*'म्हणौनि तू नियतु । सकळ कामरहितु ।*
*होऊनिया उचितु । स्वधर्मे रहाटे ॥*
*जे स्वधर्मे निष्कामता । अनुसरले पार्था ।*
*ते कैवल्यपद तत्वतां । पातले जगी ॥' (ज्ञानेश्वरी ३.-१५०-१५१)*

स्वामींनी एकाच साकीत तो सर्व भाव सहजपणे वाचकांपर्यंत पोहोचविला तो असा –

*'तरी नित्य तू निःसंगपणे निज-कर्तव्य करावे ।*
*कर्मे करुनी अलिप्त नर तो कैवल्य-पदा पावे ॥*

(भावार्थ गीता - ३.५१)

अशा रीतीने बऱ्याचदा गीतेच्या एका श्लोकासाठी एक साकी

असा जरी सर्वसाधारण क्रम असला तरी पुष्कळ वेळा श्लोकातील नेमका अर्थ समजण्यासाठी निरनिराळ्या उपमा सांगणाऱ्या साक्या स्वामींनी रचल्या आहेत. अशा वेळी ज्ञानेश्वरांची दृष्टांत देण्याची पद्धत स्वामींनी अवलंबिली आहे असे वाटते.

पहिल्याच अध्यायातील अठ्ठाविसाव्या श्लोकाचे स्पष्टीकरण करताना स्वामींनी अनेक उदाहरणे देऊन अर्जुनाची संमोहावस्था समर्पक वर्णिली आहे.

*'रणात करुणावृत्ति अंतरी होता स्थानापन्न ।*
*रणस्वामिनी वीर-वृत्ति ती गेली त्वरित निघून ॥*
*अपमानास्पद असे दृश्य ते कसे बरे पाहील ?*
*कोण मानिनी स्वपति लंघिता दुजीस ती साहील ?॥*
*निष्ठुर होता भ्रमरहि भेदी काष्ठ कोरडे कठीण ।*
*परी गुंतुनी मृदुल-कमलिनीमाजी वेची प्राण ॥*
*तेवि गुंतला स्वजनस्नेही पार्थ तो यशोधवल ।*
*अति कोमल परि कठिण तुटाया स्नेहबंध हे नवल ।*
*हृदय बावरे कारुण्य-भरे शौर्य लोपले सारे*
*दीन होऊनी श्रीकृष्णाते म्हणे 'पहा कंसारे' ॥*

(भावार्थ गीता १.३७-४१)

सहाव्या अध्यायातील ध्यानयोगाचे विवरण करताना योगिराज ज्ञानेश्वरांनी गीतेच्या मूळ ४७ श्लोकांसाठी एकंदर ४९७ ओव्या रचिल्या. स्वामी स्वरुपानंदांनी मात्र गीता आणि ज्ञानेश्वरीतील हा ध्यानयोग आपल्या १२१ साक्यांमध्ये सामावला आहे. यातीलच योगाभ्यासाला योग्य अशा स्थानाचे वर्णन आलेल्या सात साक्या ज्ञानेश्वरीलाच अनुसरून आहेत.

*शुची देशे प्रतिष्ठाप्य... (गीता ६.११)*
*याचे तपशीलवार वर्णन करताना स्वामी म्हणतात -*
*'तरी असावे पवित्र बरवे निर्मळ ऐसे स्थान*
*जिथे बैसता सहजे उपजे प्रसन्नतेची खाण ॥*
*साधक वसती परि न च दिसती जिथे लोक सामान्य*
*न च उपद्रवा शुक भ्रमर वा देई श्वापद वन्य ॥*
*सदा वाहते निर्मळ जळ ते जिथे निर्झरातून*
*पवन हि खेळे मंद कोवळे ऊन अधून-मधून ॥*
*मधुर फळ-भरे वृक्ष वाकले जिथे बहुत घनदाट*
*वाटसरूंच्या पायरवाने जिथे न रुळली वाट ॥*
*मठ एखादा निगूढ किंवा शिव-मंदिर पाहोनी*
*तिथे रचावे आसन भावे मग एकांत-स्थानी ॥*
*भूमीवरती सरळ कोवळे दर्भ तुकडा रचावे*
*मृगचर्म वरी आणि त्यावरी धूतवस्त्र पसरावे ॥*
*आसन ते अति उंच नसावे तसे नसावे सखल*
*अचल असावे जिथे स्वभावे शरीर न च डोलेल ॥*

(भावार्थ गीता ६.२९-३५)

स्वामींनी केलेल्या या वर्णनावरून ध्यानयोगास लागणाऱ्या बाह्य साधनांची सकारण ओळख अगदी सहजच पटते. परमेश्वर प्रसादाने, अवघड असा योगही सहजसाध्यच आहे हेच जणू स्वामींनी या अध्यायाच्या शेवटच्या साकीत म्हटले आहे –

*'धरुनी श्रद्धा भजे सर्वदा माते अंतर्निष्ठ*
*योग्यामाजी तोचि मानितो योगी सर्वश्रेष्ठ (२.१२१)*

नवव्या अध्यायातील भक्तिमार्गाची महती आणि सुलभता सांगणाऱ्या गीतेतील

*मां हि पार्थ व्यपाश्रित्य येऽपि स्युः पापयोनयः ।*
*स्त्रियो वैश्यास्तथा शूद्रास्तेऽपि यान्ति परां गतिम् ॥(९.३२)*

या श्लोकासाठी स्वामींनी एकंदर तेरा साक्या रचल्या आहेत. विस्तारभयास्तव त्या सर्व येथे सांगता येत नाहीत तरी अत्यंत योग्य दृष्टांताद्वारा श्लोकातील भाव कसा पटवून दिला आहे यासाठी गजेन्द्रमोक्षाच्या साकीचा दिलेला दाखला पाहू –

*नक्रे धरिला गजेन्द्र आला शरण जेधवा माते*
*संकटातुनी तया तारुनी नेले परमगतीते ॥*
*काय तयाचा देह पशूचा आला मोक्षाआड ?*
*तरे मूढ हि माझ्या पायी ठेवुनि निष्ठा गाढ ।*

(भावार्थगीता ९.११४-११५)

तसेच स्त्री, शूद्र इ. नरजातीतील भेद हे भक्तीत उरत नाहीत हे वृक्षांतील भेदांच्या दाखल्याने किंवा ओहोळ, नदी अशा पाण्याच्या साठ्याला मिळणाऱ्या निरनिराळ्या नावांनी स्पष्ट केले आहे.

*वहाळ ओहळ नदी नद असे दिसती भेद अमूप*
*गंगे मिळता ती स्वभावता होती गंगा - रूप ॥*
*खैर - चंदनादिक ते नाना भेद तोंवरी काष्ठी*
*एक-रूप ती सर्वहि होती शिरता अग्निप्रान्ती ॥*
*स्त्री-शूद्र-वणिक-पश्वादिक ह्या तव चि वेगळ्या जाती*
*करुनी भक्ती जंव न पावती मज एकाते जगती ॥*

(९.१२३-२५)

यावरून जो विषय सर्वांना उपयुक्त असेल, ज्याचे विस्ताराने स्पष्टीकरण करणे आवश्यक असेल तर तिथे स्वामींनी विस्तारभयाने हात आखडता न घेता मुक्तपणे साक्या रचिल्या आहेत; हेच यावरून दिसते. विशेषतः भक्तीची महती व त्याचे स्वरूप सांगणाऱ्या या साक्या वाचून कोणाच्याही मनात भक्तीच्या भावना बहरल्याशिवाय राहणार नाहीत याचीही खात्री पटते. अशा प्रकारची अंतःप्रेरणा स्वामींच्या या सहजस्फूर्त रसाळ साक्यांमधून सहजच मिळते.

बाराव्या अध्यायाच्या सुरुवातीला असलेल्या अर्जुनाच्या प्रश्नाचे - सगुणोपासना करणारा आणि निर्गुणाचे ध्यान करणारा यापैकी कोणता भक्त श्रेष्ठ ? - याचे विवेचन दहा साक्यांमधून स्वामींनी अत्यंत रसाळपणे केले आहे. यापैकी शेवटच्या दहाव्या साकीत मूळ गीतेतील श्लोकाचा (एवं सततयुक्ता : ये... (गीता १२-११) भाव आला असला तरी सुरुवातीच्या 'एवं सततयुक्ताः' याचे स्पष्टीकरण पहिल्या नऊ साक्यांमध्ये स्वामींनी समर्थपणे केले आहे.

पंधराव्या अध्यायातील पुरुषोत्तम योगामधील अश्वत्थवृक्षाचे वर्णनही स्वामींनी सविस्तर केले आहे. मूळ संस्कृत २० श्लोकांसाठी ज्ञानेश्वरीत ५९९ ओव्या आल्या आहेत, तर स्वरुपानंदस्वामींनी ६७ साक्यांमधून हे गूढ व गहन शास्त्र पटवून दिले आहे.

अशा प्रकारे गीतेतील सर्वच अध्यायांचा ज्ञानेश्वरी व भावार्थ गीता यांच्या सहायाने अभ्यास केला तर मोठा उद्बोधक तसेच रंजकही ठरतो. हे वाचत असताना तिघांच्याही समोरील श्रोता वेगवेगळ्या मनोवृत्तीचा आहे हे जाणवते. त्याला अनुसरूनच त्या त्या गोष्टीचे विवेचन त्यांनी केले आहे हे लक्षात येते. येथे कोणालाही उच्च-नीच, श्रेष्ठ ठरविण्याचा उद्देश नाही. प्रस्तुत लेखात हे सर्व सांगणे केवळ अशक्य म्हणून मोजक्या उदाहरणांद्वारा वाचकांना सांगण्याचा प्रयत्न केला आहे. स्वामींच्या साक्या या समजण्यास अतिशय सोप्या व आजच्या मराठीतीलच असल्यामुळे त्याचा अर्थ वा विवेचन केलेले नाही.

अठराव्या अध्यायातील 'ईश्वरः सर्वभूतानां', या एकसष्ठाव्या श्लोकापासून तो 'मन्मना भाव मद्भक्तो' या पासष्ठाव्या श्लोकांपर्यंतचा स्वामींनी केलेला अनुवाद वाचताना ज्ञानेश्वरीतील महत्त्वाचा भाग लक्षात येण्यासारखा आहे. स्वामी म्हणतात -

***पार्था पाहे ईश्वर राहे सर्वभूत ह्रदयात ।***
***निज मायेने तोचि खेळवी जगत्सूत्र निभ्रांत ॥***
***माळुनि यंत्री माया-सूत्री तो परमेश नियंत्री***
***भूते सगळी जशी बाहुली सूत्रधार कळसूत्री ॥***

(भावार्थ गीता १८.१०७-१०८)

तसेच 'नष्टो मोहः...' (गीता १८.७३) या मूळ श्लोकावरील स्वामींनी रचिलेल्या पाच साक्या म्हणजे जणू एका अर्थी गीता-तत्त्वज्ञानाचे सारच होय. यातून भगवंतांनी आतापर्यंत अठरा अध्यायांतून अर्जुनाला केलेला उपदेश त्याला कसा समजला हे अत्यंत सोप्या शब्दांत स्वामी सांगतात –

***'अर्जुन बोले, 'त्वत्कृपाबळे ज्ञान लाभले पूर्ण***
***मोह पळाला संशय गेला सर्वथैव निरसून ॥***
***असशी कर्ता तूचि करविता सर्वत्र तुझी सत्ता***
***रिता तुजविना ठाव दिसेना आला अनुभव पुरता ॥***
***जगच्चालका, विश्वपालका, नटुनि अणुअणुतून***
***तूचि आपणासवे खेळसी विश्वरूप लेवून ॥***
***'मी' पण गळले मज आकळले विश्व तुझ्या आधीन***
***म्हणुनि सर्वथा झालो आता तुजमाजीच विलीन ॥***
***वाक्य तव खरे त्याहुनि दुसरे न च पाहे कंसारे***
***भक्त तव असे सांगसी तसे आचरेन निर्धारे ॥***

(भावार्थ गीता १८.१२९-३३)

अशा प्रकारे ७०० श्लोकी श्रीमद्भगवद् गीतेचे विवरण स्वामींनी एकंदर १६१९ साक्यांमध्ये केले आहे. दहाव्या अध्यायातील त्यांनी वर्णिलेला विभूतियोग वाचताना तसेच अकराव्या अध्यायातील विश्वरूप दर्शनाचे त्यांनी केलेले वर्णन वाचताना त्यांच्या साक्षात्कारित्वाची साक्ष पटते. म्हणूनच की काय मूळचा ५५ श्लोकांचा असलेला हा अकरावा अध्याय स्वामीजींच्या १३८ रसाळ साक्यांमधून वर्णिला गेला आहे.

स्वामींची भावार्थगीता वाचत असताना आपणास जाणवते ते गीता व ज्ञानेश्वरीच्या तत्त्वज्ञानावर चिंतन, मनन व अनुभूती यांद्वारा त्यांनी मिळविलेले प्रभुत्व ! पण हे प्रभुत्व दाखविण्याचा सोस मात्र त्यांना नाही. तर लोकांनी हे जाणून घ्यावे याविषयीची त्यांची कळकळ आहे. सहजस्फूर्त अशा साक्यांमधून त्यांच्या कवित्वाचीही प्रचीती येते पण त्यांच्या काव्यात कवित्वाचा अभिनिवेश नाही. तसेच कविश्रेष्ठ बनण्याची आकांक्षाही नाही. कर्तृत्वाचा भाग आपला नसून तो जगन्माऊलीचा आहे, हीच स्वामींची प्रथमपासूनची धारणा आहे आणि तिच्याच कृपेने निर्माण झालेले सत्काव्य तिचे तिलाच अर्पण करण्यात स्वामींना धन्यता वाटते. या भावार्थगीतेचा कर्ताही 'हृदयस्थ जनार्दन' असेच ते मानतात.

भावार्थगीतेनंतर ज्ञानेश्वरांच्या ग्रंथरूपी कृपाप्रसाद अभिनव मराठीच्या पात्रातून आपल्या भक्तांना वाटण्याचाच जणू स्वामींनी विचार केला. ज्ञानेश्वरी, अमृतानुभव आणि नंतर चांगदेव पासष्टी या ज्ञानदेवांच्या प्रस्थानत्रयींवर विसाव्या शतकातील मराठीतून पद्यमय भाष्य करून जणू स्वामींनी आपले आचार्यत्व सिद्ध केले आहे.

स्वामींची काव्यसंपदा ज्ञानोबांप्रमाणेच अत्यंत रसाळ आहे. ज्ञानेश्वरांच्या शब्दात सांगावयाचे तर

***साच आणि मवाळ । मितले आणि रसाळ ।***
***शब्द जैसे कल्लोळ । अमृताचे ॥ (ज्ञानेश्वरी अ. १३.२०)***

पण त्याचे श्रेष्ठत्व या रसभरितेवर अवलंबून नाही तर त्यातून परतत्त्वस्पर्श जाणवतो म्हणून स्वामींची काव्यसंपदा श्रेष्ठ ठरते. स्वामींच्या शब्दात सांगायचे तर

***'किंवा वाचेलागी । कवित्व बरवे । कवित्वी शोभावे । रसिकत्व।***
***रसिकत्वी परतत्त्वाचे वर्णन । दिसावे सुलीन । मग जैसे ॥'***

हा परतत्त्वस्पर्श स्वामींच्या भावार्थगीतेतच नाही तर त्यांच्या इतरही काव्यांतून, संजीवनी गाथा, अमृतधारा तसेच त्यांच्या स्फुट रचनांमधूनही जाणवतो. अमृतधारा या काव्याच्या सुरुवातीच्या साक्यांमधून काव्यनिर्मितीबाबतचा त्यांचा मनोदय स्पष्ट होतो. 'जगी जन्मुनी अभिनव-जीवन-सत्कविवर होईन ।
***स्वानुभवान्तःस्फूर्त-नवरसी-सत्यकाव्य निर्मीन ॥'***

यावरून त्यांची अमर्याद काव्यस्फूर्ती त्यांच्या अंतरातून उफाळत आहे हे स्पष्ट होते. अंतःस्फूर्त काव्याची प्रेरणा होऊनच थांबली नाही तर तिचा स्वच्छंद विलासच त्यांच्या या वाङ्मयरूपाने प्रकटला आणि याद्वारा :

***'जगी जन्मुनि जगदंबेचे दास होऊनी राहू ।***
***विश्व-बांधवांसहित सर्वदा भक्तिसुधारस सेवू ॥'***

ही त्यांची मनोकामनाच जणू पूर्ण झाली. याच अमृतधारेतील शेवटची धाराही कवी स्वामींचा हाच मानस पुन्हा व्यक्त करते.

***'जगन्माऊली आज्ञा होता ती पुनरपि जन्मूच ।***
***भक्त होऊनी तव् यशोध्वजा जगी उभारू उंच ॥'***

स्वामींच्या भक्तांना त्यांच्या नित्य वाचनातून स्वामींची ही विचारधारा रोजच प्रत्ययाला येत असेल. श्रीस्वामींच्याच चरणी हा लेख अर्पून त्यांना मनोभावे वंदन करते.

**प्रा. डॉ. सौ. शैलजा काळे**
केतकी सदन सोसायटी, २१६ नवी पेठ, पुणे ३०

# स्वामी स्वरूपानंदांचे जन-प्रबोधन

**डॉ. सौ. रजनी पतकी**

*एम. ए. इंग्रजी, पीएच.डी., संस्कृत विषय - Concept of Upasana in Sanskrit Literature. संत वाङ्मयावर व्याख्यान, प्रवचन, अनेक लेख प्रसिद्ध. २-३ पुस्तके प्रकाशित. राष्ट्रीय आणि आंतरराष्ट्रीय सेमिनारमध्ये २५-२६ निबंध वाचन - विषय Sanskriut Vedic and Classical Sant Sahitya, Vastu Shastra. काही निबंध प्रकाशित*

"उपदेशायोग्य अधिकारीपण । तरी प्रबोधन जना होय ।" असे स्वामी स्वरूपानंदांनी म्हटले आहे. लोकांचे प्रबोधन करण्यासाठी उपदेश देण्याचा अधिकार असावा लागतो. उपदेशकर्त्याच्या शब्दाला सामर्थ्य येण्यासाठी त्याचे व्यक्तिमत्त्व तपःपूत व्हावे लागते. सुदैवाने आपल्या भारत देशात अशा तपःपूत संतांची मांदियाळी निर्माण झाली आहे, होत आहे. या मांदियाळीत महाराष्ट्रातील संत प्रसिद्ध आहेत. अशाच संतमालिकेतील, गुरुपरंपरेने थेट ज्ञानेश्वर माऊलींशी जोडले गेलेले परशुरामाच्या पावन भूमीतील संत स्वामी स्वरूपानंद हे 'आधी जेणे केले मग सांगितले' अशा पठडीतील अधिकारी गुरु आहेत. यद्यपि स्वामींचा जीवनकाल १५ डिसेंबर १९०३ ते १५ ऑगस्ट १९७४ असा लौकिकार्थाने असला तरी सद्गुरु हे अमर असतात. 'नास्ति येषां यशःकाये जरामरणजम् भयम्'' अशा अलौकिक कायेमध्ये ते वावरत असतात; म्हणून येथे 'गुरु आहेत' असा वर्तमानकालीन शब्दप्रयोग योजला आहे. सद्गुरु हे फक्त मोक्षाचीच वाट दाखवितात व दैनंदिन सामाजिक जीवनाशी त्यांच्या उपदेशाचा काही संबंध नसतो, असा समज आजही आहे. तथापि सद्गुरुंचे लौकिक जीवन व कार्य यांचा नीट अभ्यास केल्यास असे दिसून येते की संत सद्गुरुंनी समाजासाठी अथक काम केले आहे. किंबहुना समाज सेवा, समाज प्रबोधन हे त्यांचे एक महत्त्वाचे कार्य आहे. स्वामी स्वरूपानंदांनीही हे कार्य केले आहे. त्यांचे अभंग आजही प्रबोधनाचे काम करताहेत. त्यांच्या या कार्याचा अल्पसा आढावा घेण्याचा प्रयत्न येथे केला आहे.

स्वामी स्वरूपानंदांना 'स्वामीत्व' मिळण्यापूर्वीचे त्यांचे जीवन हे सामान्य तरुणांपेक्षा वेगळे होते. विद्यार्जन करीत असता महात्मा गांधींच्या सत्य, अहिंसा, प्रेम या विचारांनी त्यांना आकृष्ट केले होते व देशाच्या कल्याणासाठी आपल्या सुखावर तिलांजली देण्याची त्यांची तयारी होती. त्या ध्येयानुसार 'स्वावलंबनाश्रम' चालवून काही विद्यार्थीही त्यांनी तयार केले होते. असा ध्येयवेडा तरुण पुढे 'स्वामी' पदी पोहचल्याने अर्थातच समाज व त्याची उन्नती याचा विचार त्यांनी प्रगल्भतेने केलेला आहे. हा विचार करताना ते 'सामान्य जीव' या पातळीवरून 'विश्व पातळीवर' पोहोचले होते, याची साक्ष त्यांच्या अभंगातून मिळते, तो अभंग असा-

***असो कोणी थोर असो कोणी सान । तो चि दिसे देव मजलागी ॥१॥***
***उंच-नीच सान-थोर दुष्ट-सुष्ट । ऐसा झाला नष्ट भेद भाव ॥२॥***
***नाम रूप वर्ण हारपली पूर्ण । राहिलो भरून आत्मरूप ॥३॥***
***स्वामी म्हणे आता कैचे जगद्भान । रंगलेले मन आत्मारामी ॥४॥***

(संजीवनी गाथा १९९).

स्वामींनी स्वतः उद्धरून जगाला उद्धाराचा मार्ग दाखविला आहे. त्यांच्या मते विश्वाचा उद्धार भक्तीने होतो व ही भक्ति फक्त संतच शिकवू शकतात. स्वामी म्हणतात -

***बोलती संतांनी बुडविला देश । भक्तीचा उपदेश करोनिया ॥१॥***
***कार्य-कारणाचा संबंध जोडिती । आपुलाल्या मती जैसा तैसा ॥२॥***
***भक्तीने साचार विश्वाचा उद्धार । ऐसा साक्षात्कार मज आला ॥३॥***
***स्वामी म्हणे धन्य साधु-संत-जन । तयाशी शरण जाता भले ॥४॥***

(संजीवनी गाथा - १०).

स्वामी विश्वउद्धार करणाऱ्या संतांना शरण गेले आहेत. ज्या संतांचे ध्यान त्यांनी केले त्यांची नामावली त्यांनी आपल्या अभंगात दिली आहे, ती अशी - ज्ञानदेव, एकनाथ, तुकाराम, रामदास, रामकृष्ण परमहंस, शारदामाता, स्वामी विवेकानंद, मथुरबाबू, मेहरबाबा, उपासनी महाराज, ख्रिस्त, बुद्ध, महात्मा गांधी, जे. कृष्णमूर्ति, गौरांग प्रभू (सं. गा. - ४४) या संतांची नावे पाहिली की त्यांच्या कार्याची ओळख वेगळी सांगावी लागत नाही. तेव्हा या संतांना मानणाऱ्या स्वामींना समाजोद्धाराची तळमळ असणारच. स्वामी महात्मा गांधींना आदर्श मानत असत. त्यांचे नाव स्वामींनी संतमालिकेत विणले आहे. साहजिकच महात्मा गांधींच्या विचाराचा प्रचार त्यांनी आपल्या अभंगातून स्वाभाविकतेने केला आहे. त्यांच्या अभंगात सत्य, अहिंसा, प्रेम याचे गुणगान येते. काही अभंग पाहा -

***लोक-सेवा-व्रत आचरिती भावे । तयांते मानावे भाग्यवंत ॥१॥***
***लोक-सेवेसाठी सत्याते स्मरून । करिती ते दान सर्वस्वाचे ॥२॥***
***त्याचि सेवा-व्रते तोषे जगन्नाथ । शुद्ध करी चित्त सेवकाचे ॥३॥***
***स्वामी म्हणे तेणे लाभे आत्म-ज्ञान । जनी जनार्दन प्रकटतो ॥४॥***

(संजीवनी गाथा - ६१).

प्रस्तुत अभंगात मोक्ष प्राप्तीसाठी चित्तशुद्धी लागते. चित्तशुद्धीसाठी लोकसेवा व सत्यव्रत आचरावे लागते असे म्हणून स्वामी समाज व स्वतः उपासक दोहोंचीही काळजी घेत आहेत. साधक, उपासक हाही समाजाचाच एक घटक आहे. समाजात राहूनच त्याला चित्तशुद्धी करायची आहे, याचे भान ठेवले गेले पाहिजे. शुद्ध चित्ताचे लोक जेवढे जास्त तेवढा समाज शुद्ध होणार आहे. महात्मा गांधींच्या विचारांची अध्यात्माशी

सुरेख सांगड घातली गेली आहे. आणखी एका अभंगात स्वामी म्हणतात, 'जीवनाचे ध्येय म्हणजे 'सत्याचे संपूर्ण दर्शन घडावे' हे होय. यासाठी प्रेम, अहिंसा व लोकसेवा यांचे व्रत घ्यावे. दुष्टांचा प्रतिकार शस्त्राशिवाय करावा, प्राण गेला तरी माघार घेऊ नये. अशा पुरुषास शांती प्राप्त होते.' (संजीवनी गाथा - ६२). स्वामी पुढे सांगतात, सत्याचे व्रत आचरण्यासाठी मनोधैर्य लागते. यासाठी प्रथम भीतीचा त्याग केला पाहिजे. बुद्धीचा निश्चय केला पाहिजे. स्थिर बुद्धीने, निर्भय मनाने सत्याचरण केले पाहिजे. (संजीवनी गाथा - ८०).

स्वामी जरी समाजापुढे आदर्श विचार मांडत असले तरी असे आदर्श अंगी बिंबवणे किती अवघड आहे, याची त्यांना पूर्ण कल्पना होती. झपाट्याने होणाऱ्या यांत्रिक प्रगतीने आसुरी संस्कृती मानव्याची माती करते आहे, अशी खंत त्यांनी आपल्या अभंगात व्यक्त केली आहे. ते म्हणतात, ' 'बुद्धिवंत जरी 'मानवाला सुख देण्यास यंत्रयुग आले आहे' असे म्हणत असले तरी मुत्सद्दी लोक तोंडाने शांति-पाठ म्हणतात. पण इकडे दुसऱ्यावर हल्ला करण्याची जय्यत तयारी करतात. स्फोटके, रणगाडे, विमाने, जल अस्त्रे इत्यादींची निर्मिती करून, सेना सज्ज करतात. या त्यांच्या हल्ल्यांनी गुरे-ढोरे, घरे-दारे, सुरम्य नगरे क्षणार्धात भस्मसात होतात. असे यंत्रयुग काय कामाचे ?'' (संजीवनी गाथा - १५). स्वामींच्या या अभंगाने नुकत्याच होऊन गेलेल्या कारगील संघर्षाची आठवण होत नाही कां ? आणखी एका अभंगात स्वामी म्हणतात, ''या यंत्रयुगात आकाशात उड्डाण करता येते. सागराच्या पोटात विहार करता येतो, विना-तारा संदेश देता येतो. मानवाच्या कल्याणासाठी वैज्ञानिक शोध लावताहेत, पण याचा उपभोग घेणार कसे आहेत ? त्यांच्या अंतरंगी 'सद्भाव' आहे का ? तरच यंत्रे जन-कल्याण करतील अन्यथा त्यांच्यामुळे अहितच होईल.'' (संजीवनी गाथा - ८१). यंत्रांमध्ये जन प्रबोधन करण्याचे सामर्थ्य नाही, हे उघड आहे. त्यामुळे दुर्जनांच्या हातात शस्त्रे पडली तर काय आकांत होतो ते सांगताना स्वामी म्हणतात - शास्त्रज्ञांचे शोध उन्मत्त लोकांच्या हातात पडतात, त्यांचा उपयोग ते दुर्बलांचा घात करण्यासाठी करतात. त्याच्या यशाने उन्मत्त आणखीच अहंकारी होतो. नीतीधर्माला थारा रहात नाही. पाशवी संस्कार वर उठतात. माणुसकीची गंगा नुसती अपवित्रच नव्हे तर लुप्त होते. त्यामुळे नुसत्या शास्त्रज्ञांचा प्रबोध हा जगाचे कल्याण करू शकत नाही तर 'स्वरूप' जाणणारे तत्त्वज्ञ संत समाजाला आवश्यक आहेत. (संजीवनी गाथा - २३०). यंत्रयुगाने बाह्य सुखाची चटक वाढवली आहे, अंतरीचे सुख हरवले आहे. तथापि क्रांतिकारी सत्याग्रही पुनःश्च कंबर कसून 'सत्य' दर्शविणारे आहेत व सत्यच विजयी होणार आहे.' (संजीवनी गाथा - २२९).

स्वामींना अपेक्षित असलेले क्रांतिकारी सत्याग्रही हे दुसरे-तिसरे कोणी नसून देवभक्त आहेत. संत आहेत. तथापि 'संत' म्हणजे नेमके कोण ? असा प्रश्न मनात येतो. त्याचे उत्तर देताना स्वामी म्हणतात -

***आणिकांचे सुख देखोनि जो सुखी । होय धन्य लोकी तो चि संत ॥१॥***
***आणिकांचे दुःख देखोनिया शोका । येई कळवळा तो चि संत ॥२॥***
***आणिकांचे दोष आणिना जो मनी । गुणाते बाखाणी तो चि संत ॥३॥***
***लोक कल्याणार्थ वेची जो जीवित । संत तो महंत स्वामी म्हणे ॥४॥***

(संजीवनी गाथा - ८६).

असे संत, देवभक्त 'जगाचे कल्याण' हा एकच हेतु मनात धरून कार्य करतात. स्वामी म्हणतात, 'भक्त विश्वाचा संसार करतो, पण मनात अहंकार धरत नाही. विश्व रूप होऊन जगाचे कल्याण करतो. भक्तिमार्ग दाखवून 'मोक्ष' संपत्ति जनांच्या हातात देतो.' (संजीवनी गाथा - १३). तथापि संतांजवळ जाऊन आत्मकल्याण कसे करून घ्यावे हे देखिल उमजायला हवे. याबाबत देखिल स्वामी मार्गदर्शन करतात. ते म्हणतात - 'सद्भावाने संतांना प्रणिपात करून आत्महिताच्या चार गोष्टी विचाराव्यात. विरक्ति कशी असते, आत्मस्थिती कशी असते, ज्ञानाची प्रचीति कशी येते, हरि-भक्ती कशी असते. शरणागती म्हणजे काय ? नामाचे माहात्म्य काय इत्यादी प्रश्न विचारावेत. म्हणजे मग संत ज्याची त्याला बरोबर खूण सांगतील. (संजीवनी गाथा - १७८).

संतसंग मिळाला, सद्गुरुंनी खूण दाखविली तरी तेवढ्याने भागत नाही. मनुष्य समाजात वावरतो तेव्हा नुसता उपदेश ऐकून चालत नाही. तर त्याने त्या प्रमाणे आचरण करावे लागते तेव्हाच समाजाचे प्रबोधन झाले आहे, हे कळते. तरी हे आचरण कसे करावे तेही स्वामी कृपाळूपणे सांगत आहेत. लोकसेवा व सत्याचरण हे तर स्वामी सांगतातच पण त्याचबरोबर स्वधर्माचरणावर त्यांचा भर आहे. जीवनात सुखी व्हायचे असेल तर लाभ-हानि, प्रिय-अप्रिय समान मानले पाहिजेत. स्वधर्म पाळून अर्थ व काम पुरुषार्थ भोगावेत. प्रपंचामध्ये सारासार विचार करावा, सावधचित्त रहावे, हर्ष-शोकात फार बुडून जाऊ नये, लोभ धरू नये. स्वधर्मानुसार वर्तन करावे, गीतेतील भगवंताच्या उपदेशानुसार फलाशा सोडून स्व-कर्म करावे, त्याने चित्तशुद्धी होते, विठ्ठलाचे नामसंकीर्तन करावे इत्यादी आचरणाचे नियम स्वामींनी घालून दिले आहेत. (संजीवनी गाथा - २४,७७,९७,१४९).

स्वधर्माचरणाबरोबर सर्व ठिकाणी समता पाहण्यास स्वामींनी सांगितले आहे. ते म्हणतात सर्व विश्व एकरूप जाणावे, द्विज, गज, गाय, श्वान, हीन, चांडाळादी वर्ण, नर, नारी, सखा, वैरी, मृत्तिका, पाषाण हे सर्व समानतेने पहावे. भेदाभेद करू नये. (संजीवनी गाथा - २५). लोकांना चमत्काराची ओढ असते. जो चमत्कार दाखवतो त्याला नमस्कार केला जातो, पण हे चराचर ज्याने निर्मिले आहे, मनुष्य देहासारखी अनमोल रचना ज्याने केली आहे, मानवी मेंदू ज्याने निर्माण केला आहे, अशा भगवंताचा जयजयकार मात्र कोणी करत नाहीत. तरी माणसाने कृत्रिमाकडे न पहाता स्वाभाविक गोष्टींकडे लक्ष द्यावे. (संजीवनी गाथा - ५५). ढोंगीपणापासून सावध रहाण्यास स्वामी सांगतात. तसेच त्यांच्या भक्तांनी अथवा समाजातील कोणीही ढोंगीपणा करू नये अशी शिकवणही देतात. ते म्हणतात, बाह्यात्कारी संसार त्याग करून, वेष पालटला पण अंतरंगात मात्र 'मी, माझे' असे ओझे बाळगले, ब्रह्मज्ञानाचे व्याख्यान देऊन पांडित्याचा अभिमान बाळगला, स्वानुभवाशिवाय समजल्यासारखी मान डोलवत राहिले तर तो ढोंगीपणा होतो. पोटात भूतदया नाही आणि शास्त्रे मात्र पाठ आहेत; अंगात

नम्रता नाही आणि विद्या, धन, मान मिळवला; नीती नाही, आचारधर्म पाळला नाही पण कलाकार म्हणवून घेतले; क्षमा करण्याची वृत्ती नाही, सत्ता व अधिकार मात्र आहे; बलवान आहे, पण दुर्बळांचा सांभाळ करण्याचे मनात येत नाही, तर मग त्या व्यक्तीचा काय उपयोग आहे ? अशाने त्याला समाधानही मिळणार नाही व लोकादरही प्राप्त होणार नाही. (संजीवनी गाथा -४६,९९,१२६). या अभंगातून स्वामींनी कोणत्या गुणांचा उपयोग कशासाठी केला गेला पाहिजे हे सहजगत्या प्रकट केले आहे. संतांच्या समाज प्रबोधनाचे हे वैशिष्ट्य आहे की, ते आपण कोणी मोठे आचार्य आहोत, असे काडीमात्र दर्शवित नाहीत, पण ओघवत्या भाषेत, अत्यंत प्रेमाने मार्मिक गोष्टी बोलतात. यातून जो धडा घेतो तो सुखी होतो व आजूबाजूचे वातावरणही प्रसन्न करतो.

सर्वसामान्य लोकांच्या जीवनाचे ध्येय साधारणतः 'खाऊन-पिऊन सुखी रहावे' एवढेच असते. प्रत्येकाला काही मोक्षाची आस नसते पण शांतपणे जीवन व्यतीत करावेसे वाटते. तथापि मनुष्याचा स्वभाव, आजुबाजूची परिस्थिती व प्रारब्ध या तीन गोष्टींमुळे त्याला हवे तसे जगता येत नाही. या तीन गोष्टीतील एकही गोष्ट बदलण्याचे सामर्थ्य सामान्य जीवात नाही. त्याला आपला स्वभाव बदलता येत नाही. 'बाळा ते जन्मकाळा', 'जित्याची खोड मेल्याशिवाय जात नाही', 'स्वभावो दुरतिक्रमः' इत्यादी म्हणी प्रसिद्ध आहेत. आजूबाजूच्या परिस्थितीत आप्त-स्वकीयांचे स्वभाव, जन्माने जोडले जाणारे संबंध, बदलती नैतिक मूल्ये, जीवन शैली, राजकीय स्थित्यंतरे, वाढती महागाई, तरुण पिढी व मागील पिढी यांच्याशी मिळते-जुळते घेण्यात मनाची झालेली ओढाताण आदि अनेक विषय येतात. यातील एकही गोष्ट मनुष्याच्या हातात नसते. आपल्या बाजूने व्यवस्थित वागण्याचा प्रयत्न प्रत्येक जण करतो, पण त्याचे व्यवस्थित वागणे कोणाच्या तरी हितसंबंधाच्या आड येते व त्याने सर्वजण दुःखी होतात. प्रारब्धाच्या बाबतीतही तेच आहे. एखादी साधीशी वाटणारी गोष्टी असा काही भयंकर परिणाम करून जाते की, 'आपलं नशीब' असे म्हणून डोक्याला हात लावला जातो. कित्येक बुद्धिवादी नशीब अथवा प्रारब्ध मानत नाहीत पण कार्यकारण भाव मानतात. तथापि अमुक एका कारणाने अमुकच कार्य घडेल याची तेही खात्री देऊ शकत नाहीत. एकूण काय तर पुढील घटनांची पक्की माहिती कोणालाच नसते व त्यामुळे आजचे निर्णय कधी फायदेशीर होतात तर कधी तोट्यात जातात. मग अशा परिस्थितीत सुखी होण्याचा कोणताच मार्ग नाही का ? तर जरूर आहे व तो संतांनी स्वानुभूतीतून काढला आहे. स्वामी स्वरूपानंदही साक्षात्कारी संत असल्याने आपल्या अनुभूतीतून 'मनुष्याने सुखी होण्यासाठी कोणत्या मार्गाने जावे', ते आपल्या अभंगातून स्पष्ट करतात. तथापि उपदेश करण्याचा त्यांचा आविर्भाव नाही, पण आत्मीयतेने मार्गदर्शन करण्याचा भाव आहे. सर्वांबद्दल सद्भाव असल्याने अत्यंत सोप्या शब्दात ते सांगतात, 'आपले मन दुःखी, कष्टी, खिन्न का होते, ते आपल्या बुद्धीलाच विचारावे. इन्द्रिय विषयांचा सहवास हे दुःखाचे कारण आहे. त्यासाठी म्हणजे इन्द्रियांना सतत विषयात गुंतू न देण्यासाठी थोडावेळ एकांतात रहावे; लोकांशी कामापुरते बोलावे. इतरांची निंदा ऐकू नये; परस्त्रीच्या ठिकाणी मातृ-भाव ठेवावा; मनात दया असावी, परद्रव्याची आस धरू नये व त्यासाठी ते द्रव्य ज्याचे आहे, त्याचा हेवा करू नये; आपल्या कामात दक्ष रहावे; उपाशी राहू नये, फार खाऊही नये तर मिताहार घ्यावा; फार झोपू नये तसे फार जागरण करू नये; फार बोलू नये पण अगदी मौनही नको तर संयमी रहावे; शरीर हे देवाचे मंदिर आहे असे समजून ते निर्मळ ठेवावे; मन-बुद्धी हे देवाच्या पूजेचे साधन आहे असे मानून त्याची शुद्धता ठेवावी; चित्त हे देवाचे पूजा-पात्र आहे असे जाणून ते पवित्र ठेवावे; सर्वाभूती भगवंत आहे हे ओळखून मी-पणा सोडून द्यावा." (संजीवनी गाथा -११५, ४८, ११६,१३६). स्वामी पुढे म्हणतात की, सर्व ठिकाणी समत्त्व पाहिले की मन स्तुतीला भाळून जात नाही. निंदेने खिन्न होत नाही. मन हेच बंधु अथवा वैरी असते. आपणच सर्वाभूती असू तर कोणाचा द्वेष करायचा व कोणावर लोभ ठेवायचा ? (संजीवनी गाथा - १६९). मनाने सर्व ठिकाणी समत्त्व पहाण्यासाठी त्याला स्वतःला शिकवावे लागेल. ते कसे शिकवायचे हे सांगताना स्वामी म्हणतात, 'दुर्जन संगतीत हे मना जाऊ नकोस. पाखंडी लोकांत वावरू नकोस, अ-भक्तांच्या गोष्टी ऐकू नकोस संतसंग धर, भक्ति-प्रेम भावना वाढव. पोटात काम-क्रोध असतील तर ते काढून टाक. मनात काम-क्रोधांना थारा देऊन पूजा-अर्चा केली तर काही फायदा नाही. घर-दार, वस्त्र, पत्नी, सुत, धन असावे. पण त्या सर्वांची हाव नको. देह व मन आरोग्य संपन्न असले पाहिजे.' (संजीवनी गाथा - १९५, १९६, २०५, २०७).

मनाला कितीही शिकवले तरी ते आपले ऐकेलच असे नाही. तर त्यासाठी त्याला आधी शांत करावे लागते. ही शांतता ध्यानाने प्राप्त होते. म्हणून स्वामी म्हणतात, "बैसोनी एकांती करी सोऽहं ध्यान । तेणे तुझे मन स्थिरावेल ।।' (संजीवनी गाथा २१६). याच बरोबर भुकेल्यास अन्न द्यावे, सत्पात्री दान द्यावे म्हणजे ज्याच्या जवळ जे कमी आहे ते त्याला द्यावे म्हणजे एकमेकातील हेवे-दावे कमी होतील. (संजीवनी गाथा - १११). विश्वाचे कल्याण झाले की मगच स्वतःला समाधान होते. (संजीवनी गाथा २०७)'.

विश्वाच्या कल्याणाची चिंता करणारे स्वामी गुरुपरंपरेने पसायदान मागणाऱ्या ज्ञानेश्वर महाराजांशी जसे जोडलेले आहेत, तसेच त्यांच्याही मागे जाता गोरक्षनाथांशीही जोडलेले आहेत. स्वामींनी आपल्या अभंगात आपल्या गुरुपरंपरेचा स्पष्ट उल्लेख केला आहे. या संदर्भात जर गोरक्षनाथांच्या कार्याचा थोडा विचार केला तर समाज प्रबोधनाची तळमळ त्यांच्या परिवारातील संतांमध्ये कशी आली ते लक्षात येईल. गोरक्षनाथांनी आदिशंकराचार्यांप्रमाणे आसेतु हिमाचल भ्रमण करून त्या काळातील समाजात ज्या अनिष्ट प्रथा पडल्या होत्या, त्या नष्ट करण्याचा प्रयत्न केला. त्या काळी शैव व शाक्त पंथाचा बराच प्रसार होता. शाक्त पंथातील अघोरी, वामाचारी क्रिया समाज आरोग्याच्या दृष्टीने घातक बनत चालल्या होत्या. वर्ण व्यवस्था कडक होत चालली होती. या सर्वांवर निर्बंध घालणे जरूर होते, पण ते कोणालाही न दुखवता करावे लागणार होते. हे अवघड काम गुरु गोरक्षनाथांनी केले. त्यांनी उपनिषदातील अद्वैत तत्त्वज्ञानाचे अधिष्ठान ठेऊन शिव व

शक्ति यांचे 'अद्वय' कसे आहे ते दर्शविले. वामाचारी योगी व योगिनी यांना सिद्धींच्या दर्शनाद्वारा आपलेसे करून प्रसंगी हरवून मुद्रा, बंध, प्राणायाम व सोऽहम् जप ही चतुःसुत्री घालून नाथ संप्रदायाचा प्रसार केला. नाथ संप्रदायाची उपासना वर्णातीत ठेवली. सर्व वर्णाच्या उपासकांना आपल्यात घेतले. समाज सुसंघटित करण्याचा मोठा प्रयत्न केला. पुढील काळात तीन-चारशे वर्षांनी पुन्हा श्रीसंत ज्ञानेश्वर महाराजांना वर्ण व्यवस्थेची झळ बसली. त्यांनी ज्ञानेश्वरीद्वारा 'कुळ जाती वर्ण हे आघवेची गा अकारण' (ज्ञानेश्वरी - ९.४५६) असे म्हणून 'भक्तीने' सर्व वर्ण ईश्वराची उपासना करून विश्वात्मक होऊ शकतात, हे दर्शविले. त्यानंतरच्या सर्व संतांनी भक्तिमार्गाचा प्रसार केला. तथापि ज्ञानेश्वरांचा जो नाथ संप्रदाय, त्या संप्रदायानुसारही एक परंपरा चालत राहिली. त्या परंपरेतील स्वामी स्वरूपानंद आहेत. त्यामुळे समाज कल्याणाची तळमळ त्यांच्या उपासनेतच परंपरेने आलेली आहे. अद्वैताचे अधिष्ठान, शिव-शक्ति सामरस्य व भक्ति यांची सांगड स्वामींच्या लेखनातून प्रकट होते. या सर्व वैचारिक बैठकीला अनुसरून स्वामींनी आपल्या अभंगातून लोकांना मार्गदर्शन केले आहे. त्यांची ग्रंथसंपदा म्हणजे भावार्थ गीता, अभंग-ज्ञानेश्वरी, अभंग-अमृतानुभव, चांगदेव पासष्टी, तीन प्रवचने, स्वरूप-पत्र-मंजुषा आदि आहे. तथापि त्यांच्या अंतरीची तळमळ जशी ग्रंथांतून आली आहे, तशीच ते एकाच खोलीत वास्तव्य करून रहात असताना त्यांच्या भेटीला येणाऱ्यांना ते जे मार्गदर्शन करीत असत त्यातूनही दिसून येते. प्रत्येकाच्या अडचणी वेगवेगळ्या असतात व त्या सोडविण्याचे उपायही वेगवेगळे असतात. परंतु सर्वांना आपापल्या अडचणींतून बाहेर पडता यावे म्हणून स्वामींनी एक मार्गदर्शिका दिली आहे. ती अशी -

***कर्म तैसे फळ लाभते केवळ । आणिकांते बोल लावू नये ॥१॥***
***पेरोनिया साळी गव्हाचे ते पीक । घ्यावया निःशंक पाहू नये ॥२॥***
***उत्तरासारखे येते प्रत्युत्तर । करावा विचार आपणाशी ॥३॥***
***पहावे ते दिसे दर्पणी साचार । आपुला आचार ओळखावा ॥४॥***
***स्वामी म्हणे होसी सर्वैव जाण । तुझा तू कारण सुख-दुःखा ॥५॥***

(संजीवनी गाथा - ३५)

मनुष्य जन्माला आल्यानंतर प्रत्येकाने आपले जीवन धन्य करावे, अशी स्वामींची इच्छा आहे. ते म्हणतात, 'बळी तो कान पिळी' असे आचरण मनुष्येतर प्राण्यांसाठी ठीक आहे. पण माणसांनी तसे वागले तर मग 'मानवधर्म' तो काय राहिला ? मानवाच्या बुद्धीचे 'मनुष्यधर्म सोडणे' हेच लक्षण आहे का ? तर मनुष्याने असे वागू नये. ते म्हणतात, "स्वामी म्हणे ज्याचे ध्येय सर्वोदय । धन्य तो चि होय मानवात ॥" (संजीवनी गाथा - १८४).

सर्वांचा उदय व्हावा, भाग्य उजळावे म्हणून स्वतःच्या जीवनात ज्यांनी अथक प्रयत्न केले व पुढील पिढीला मार्गदर्शक तत्त्वे घालून दिली अशा संतरत्न पूज्य स्वामी स्वरूपानंदांना शतशः प्रणाम !

**डॉ. सौ. स्वाती पतकी**
१२, 'मधुबन', बी, ३८/२, कर्वेनगर, पुणे - ५२. फोन - ५४६०८१५

# काय देवा मागू

सुख सर्वांना सांगावे
दुःख मनात ठेवावे
फुले वेचता वेचता
काटे उरात जपावे ॥१॥

जरी सोबतीला सारे
परि वाट एकट्याची
कडू गोड आठवांच्या
संगे साठून जाण्याची ॥२॥

प्रारब्धाचा खेळ सारा
दोष नाही रे कुणाचा
गतजन्मीच्या खेळाचा
उत्तरार्ध आहे साचा ॥३॥

उभ्या जन्मीचे संचित
राखू पुढल्या जन्मीला
आज वैशाख वणवा
श्रावण फुलेल उद्याला ॥४॥

अव्यंग शरीर आणि शुद्धमती
संसारी लाभली सुख समाधान शांति
आणि काय देवा मागू तुझ्या पायी
तुझीच आठवण राहो माझ्या ठायी ॥५॥

**सौ. माधुरी चंद्रकांत पेंडसे**

- *वागावे धर्माने मालवता धर्म दिपक ज्योती*
  *दुर्गममार्ग समस्तही संसारिया तमोमजी होती*
- *जेवर्ततात धर्मे कर्मे करितात ईश्वरा स्मरूनी*
  *ते नर इतरासही तारती तरूनी*
- *कष्टे संपादावे, आनंदाने बसोनिया खावे*
  *राखूनी ठेवूनी काही, सत्पात्री देववेल ते द्यावे*

**सौ. शालिनी देशपांडे**

# स्वामी स्वरुपानंदांचे नामविषयक अभंग

**सौ. आशाताई परांजपे**

*एम. ए. एल. एल. बी. चिन्मय मिशन हाँगकाँग येथे ६-७ वर्षे मिशनचे काम केले. पूजा मासिकात गेले ६-७ वर्षे नियमित लेखन. भक्तिमहिमा हे इंग्रजी गोष्टीरूप पुस्तक लहान मुलांसाठी प्रसिद्ध. सध्या नामदेव अध्यासनात श्री. गोंदवलेकर महाराज यांचेवर संशोधनपर लेखन सुरू आहे.*

ज्ञानदेवापासून अगदी आजकालचे संत, परमेश्वराची भक्ती नामस्मरणाच्या माध्यमातून करताना दिसतात. भक्तिमार्गाचा पुरस्कार करणाऱ्या वारकरी संप्रदायाचा उदय ज्ञानेश्वरांपासून झाला. ज्ञानेश्वरांचे गुरु, निवृत्तीनाथ यांना गहिनीनाथांकडून भक्तिमार्गाचा प्रसार करण्याचा आदेश मिळाला व तोच आदेश निवृत्तीनाथांनी ज्ञानदेवांना केला असे मानले जाते. ज्ञानदेवांनी नाथपंथाच्या अद्वैत तत्त्वज्ञानाबरोबर भक्तिमार्गाचाही प्रसार केला. ज्ञानेश्वरांनी भक्तियोगाला एक नवीन अर्थ प्राप्त करून दिला. पंढरीच्या विठ्ठलाची सगुण भक्ती व त्याचबरोबर हृदयस्थ नारायणाची निर्गुण भक्ती याचा अपूर्व संगम ज्ञानेश्वरांनी केला व लोकांना भक्तिमार्गाची नवी दिशा दाखविली. परमेश्वर प्राप्तीसाठी त्यांनी इतर मार्गाप्रमाणेच नामस्मरण हे महत्त्वाचे साधन मानले आहे. हरिपाठातून त्यांनी नामभक्तिचा उदोउदो केला आहे. 'ज्ञानदेव म्हणे हरिजप करणे । तुटेल धरणे प्रपंचाचे' या ओवीतून त्यांनी नामाच्या अपूर्व शक्तीचे वर्णन केले आहे. ज्ञानदेवांप्रमाणे इतर काही नाथसंप्रदायी व वारकरी संप्रदायी संतांनी नामभक्तिचा आग्रह धरला व हरिनाम हेच साधनेचे वर्म आहे असे आवर्जून म्हटले आहे. अर्वाचीन संतांपैकी श्रीगोंदवलेकर महाराजांनी 'नामसाधना' हे परमेश्वर प्राप्तीचे प्रमुख साधन मानले आहे. पावसचे संत प. पू. स्वरुपानंद महाराज हे अगदी अलीकडचे नाथ संप्रदायातील लोकप्रिय संत आहेत. त्यांच्या साधनेचा भर ध्यानयोगावर असूनही त्यांनी त्याबरोबर भक्तिमार्गही अवलंबिला व भक्तांना तसा उपदेशही केला.

स्वामी स्वरुपानंदांच्या अनेक अभंगातून त्यांनी विश्वव्यापी हरिरुपाचे वर्णन केले आहे. जेव्हा विश्वातील प्रत्येक गोष्टीतून भगवंत जाणला जातो तेव्हाच भक्ताला समदृष्टी प्राप्त होते. भक्तीचे खरे वर्म हेच आहे, असे स्वामी मानतात. याच उद्देशाने त्यांनी 'रामकृष्ण हरि' हा सिद्ध मंत्र आपल्या साधकांना सांगितला. चालता, बोलता, खाता, पिता, उठता, बसता, आसनी, शयनी, हरि आठवावा असे स्वामी सांगत. 'रामकृष्ण हरि' या मंत्राच्या नित्य जपाने देव व भक्त यांची गळामिठी होते असे स्वामी म्हणतात.

*देव भक्त आणि नाम । झाला त्रिवेणी संगम*
*भेदभाव अमंगळ । दूर सारु या सकळ*
*रामकृष्ण हरि मंत्र । उच्चारुया अहोरात्र*
*देव भक्त एकांती । स्वामी म्हणे पडे मिठी (सं. गा. १९)*

इतर संतांप्रमाणेच रामनामाने जीव उद्धरून जातो ही ग्वाही स्वामींनी दिली आहे. त्यासाठी त्यांनी वाल्या कोळी, अजामिळ, पिंगला यांचे दाखले दिले आहेत. नामस्मरणाने पापांचे डोंगर जळून जन्म-मरणाचे चक्रही थांबू शकते. स्वामी म्हणतात -

*हरिनाम सार हरिनाम सार । तेणे चि भवपार पावतील*
*स्वामी म्हणे अंती हरिनाम एक । तारील निःशंक तुजलागी।(४२)*

जीवाला मुक्ती मिळावी म्हणून शास्त्रात यज्ञ, याग, जप-तप, तीर्थयात्रा व इतरही कर्मकांडे सांगितली आहेत. स्वामींनी त्या कर्मकांडांचा धिक्कार केला आहे.

*'नको कर्मकांड नको ब्रह्मज्ञान । नको न्यावा प्राण ब्रह्मांडाते*
*नको वेदाभ्यास करावा सायास । उपास तापास देहदंड ।*
*नको धूम्रपान पंचाग्नि साधन । नको तीर्थाटन काशी गया।(७१)*
*चित्तशुद्धीचा उपाय । सदा चिंतावे हरिपाय ।*

हरिच्या नामस्मरणासाठी जाती, वर्ण, कुळ यांचे बंधन नाही हा इतर संतांचाच विचार स्वामी सांगतात.

*असो यतिहीन असो मतिहीन । सर्वांसी तारण हरिनाम ।*
*असो हरिजन की असो ब्राह्मण । जाय उद्धरून हरिनामे ।*
*स्वामी म्हणे कुळ वर्ण अकारणे । हरिसी प्रमाण भावएक ।(१०१)*

नामस्मरण भक्तीने षड्रिपु आपोआप ताब्यात येतात असे संत म्हणतात. नामस्मरणाने विवेक जागा होतो, मन शुद्ध होते व साधकाला योग्य मार्ग दिसू लागतो. मनाला छळणाऱ्या शत्रूसाठी नामस्मरण हा निर्वाणीचा बाण आहे, असे स्वामी मानतात.

*"विश्वासे करावा हरिनामोच्चार । होता अनावर कामक्रोध*
*स्वामी म्हणे हाचि निर्वाणीचा बाण । तेणे निर्दाळिण षड्रिपूंचे ॥" (१६४)*

नामस्मरण हे वरवरचे असू नये. त्यात नामीबद्दल नितांत प्रेम, भक्ती, विश्वास असला पाहिजे. तरच ते नाम हृदयस्थ नारायणापर्यंत पोहोचते असा संतांचा सांगावा आहे. हरिनामाचा छंद मनाला लागून त्याचे नित्य अनुसंधान राहिले पाहिजे हीच स्वामींची इच्छा आहे. अनुसंधान म्हणजे साधनेचा प्राण असे गोंदवलेकर महाराज म्हणत. नित्य अनुसंधानाने भगवंताचे नामस्मरण अंतर्यामी पोहोचते व भगवंत सर्वव्यापी आहे हे जाणवते.

स्वामी म्हणतात,

*नित्य हरिचे दर्शन । तेचि आत्मपर कल्याण ।*

*स्वामी म्हणे चराचरी । हरि अंतरी बाहिरी । (७१)*

नामाचा जप श्वासोच्छ्वासाइतका सहजी झाला पाहिजे. म्हणजेच नामाचे सतत अनुसंधान राहिले पाहिजे. स्वामी सांगतात :

*श्वासोच्छ्वासी वेळा रामनाम जप । होतो आपोआप अखंडित ।*
*तेथे रात्रं-दिन ठेवी अनुसंधान । सांडुनी मी पण सोहंभावे ।*
*राम नामी चित्त रंगत स्वानंदे । सुखे हाता चढे तत्त्व बोध॥(२४८)*

विश्वासाने, प्रेमाने केलेल्या नित्य स्मरणाने काय साध्य होत नाही ? जीवाला आत्मज्ञान प्राप्त होऊन मन सुख-दुःखाच्या झोक्यापलीकडे जाते. चिरकाल टिकणाऱ्या आनंदाच्या लहरी साधकाच्या आयुष्यात येत राहतात. ज्ञानेश्वरांनी अशा आनंदाला 'आनंदाचा डोह' म्हटले आहे. स्वामींच्या मते अशा आनंदाची परिणती ध्यानात झाली पाहिजे. ते म्हणतात,

*अंतरी भजन चाले रात्रंदिन । तेणे समाधान अनिर्बाध्य ।*
*नित्य नामजप होतो आपोआप । तया सुखा माप कोण करी ।*
*शब्दाविण ध्वनी करोनि श्रवण । ठेवी अनुसंधान आत्मरूपी ॥ (१७१)*

नामस्मरण म्हणजे फक्त वैखरीने चालणारे नाम नव्हे तर अंतर्यामी परेपाशी होणारे नामानुसंधान होय. नामाने होणाऱ्या आत्मानंदाचे वर्णन स्वामींनी यथायोग्य केले आहे.

*'उच्चारिता नाम आनंदले मन । दाटले लोचन प्रेमाश्रुंनी ।*
*घामेजली काया झाली रोमांचित । भरारे कंपित होवोनिया ।*
*कंठ सद्‌गदीत स्तब्ध झाले चित्त । होती विकसित सर्व गात्रे ।*
*स्वामी म्हणे अंती गेले देहभान । प्रेमे होता लीन आत्मरूपी ॥ (२०६) ॥*

ध्यानयोगाच्या उच्चस्तराला पोचलेल्या साधकाचे हे वर्णन आहे. काही अभंगातून स्वामींनी नामस्मरणाद्वारे आलेली आत्मानुभूतीही वर्णन केली आहे.

*राम येता कानी । होय पातकांची धुनी ।*
*राम नाम येता वाचे । होय सार्थक देहाचे ।*
*रामनामाचे स्मरणे । होता चुके जन्म मरण ।*
*उच्चारिता राम नाम । स्वामी झाला पूर्ण काम ॥ (१८१) ॥*
*काम क्रोध लोभ निमाले संपूर्ण । झाले समाधान अनिर्बाध्य*
*स्वामी म्हणे आता बैसलो निवांत । हरिपायी चित्त लावोनिया ॥ (१८३) ॥*

रामनामाने या मानवी जीवनात जे काही साधावयाचे आहे ते सर्व साधून जाते हा संतांचा अनुभव आहे. नामभक्तीची अंतिम अवस्था म्हणजे ध्यानातीत निवांत अवस्था होय.

रामनामाने साधलेल्या या अवस्थेचे आत्मानुभावी वर्णन स्वामी करतात

*रामनामी रंगे मन । कैची भूक कैची तहान ।*
*कैचा राहे देह भाव । उरे त्रिकालासी ठाव ।*
*कैची आधि कैची व्याधि । अवघी संपली उपाधि ।*
*नित्य निवांत निर्भय । स्वामी झाला राममय । (२६१)*

संजीवनी गाथेतील काही अभंगाद्वारे स्वामींनी नामाचे महत्त्व सांगितले आहे. नामस्मरणाने काय साधले जाऊ शकते याचेही विवेचन त्यांनी केले आहे. स्वामींची अभंगनिर्मिती उत्स्फूर्त आहे. त्यात कष्ट नाहीत. त्यामुळे ती कोणाच्याही सहजी पचनी पडते. स्वामींचे नामसाधनेविषयीचे विचार हे इतर संतांपेक्षा वेगळे नाहीत. इतर संतांप्रमाणेच त्यांनी नामसाधनेद्वारे भगवंताचे दर्शन होते हे मानले आहे. हरिपायी शरण आलेला भक्त पूर्ण समाधानी होतो. त्याचा संसार आत्मरूप होतो व याची देही त्याला विदेही अवस्था प्राप्त होते. तिथे ध्येय-ध्याता-ध्यान ही त्रिपुटीच नाहीशी होते. साधकाला सर्व विश्वात हरिरूप दिसू लागते. जळी, स्थळी, त्याला आनंद दिसतो; येवढेच नाहीतर सागराच्या गर्जनेतूनही त्याला 'सोऽहम्' भावाचा आविष्कार होतो, असे स्वामी मानतात. स्वामींची 'सोऽहम्' साधना ही शब्दसाधना, नादसाधना आहे म्हणजेच ती नामसाधनाही आहे असे म्हटल्यास गैर वाटत नाही.

**सौ. आशाताई परांजपे**
ए-२२, अभिमानश्री सोसायटी, पाषाण रोड, पुणे - ४११ ००८.

## स्वामीजींनी लिहिलेले पत्र

*॥ जय माताजी ॥ दि. ५-५-५७*

*प्रिय श्री 'राम' यांसी सप्रेम आशीर्वाद.*

*ईशकृपेने इकडील सर्व क्षेम. तुमचे ६।४।५७ चे पत्र व रुपये सहा (६) मनीऑर्डरने पाठविलेत ते दोन्हीहि मिळाली.*

*कोणती हि गोष्ट करणे ती विचारपूर्वक करावी. आईवडिलांना दुःखदायक होईल अशी कोणतीहि गोष्ट करू नये. त्यांचे मनाविरुद्ध वागूनहि सुख मिळेलच असे तरी कोणी सांगावे ! नाहीपेक्षा "सुख पाहतां जवा पाडें । दुःख पर्वता एवढें " अशी स्थिति व्हायची.*

*त्यापेक्षा "ठेविलें अनंतें तैसें चि रहावें । चित्तीं असों द्यावें समाधान." हें बरें.*

*समाधान टिकत नसेल तर पुनः पुनः मनोभावें ईश्वराला शरण जाणें, त्याची प्रार्थना करणें व आपल्या नित्याचे उद्योगाला लागणे हेच होय.*

*सुखदुःख जे काही आपल्या वाट्याला आले असेल ते धैर्याने सहन करणे यात हि जीवाची उन्नतिच होत असते.*

*रवीन्द्रनाथ टागोरांनी ईश्वराची एके ठिकाणी अशी प्रार्थना केली आहे की*

*"विपत्तीमध्ये तूं माझे रक्षण कर. ही माझी प्रार्थना नाही. विपत्तीमध्ये मी भिऊ नये म्हणजे झाले."*

*"मी दुःखावर विजय मिळवू शकावा म्हणजे झाले."*

*"हे ईश्वरा, तुझ्याबद्दल मी केव्हाही शंकित होऊ नये."*

*तो चि कृपाविधि वारील सांकडें ।*

*सर्वत्रांस आशीर्वाद - कळावे*

आपला
स्वरूपानंद

# अनुबंध दोन परमहंसांचा !

**सौ. केतकी मोडक**

*एम. ए. (मराठी) एम. एड. सोऽहं साधना या विषयावर पीएच.डी. करीत आहेत. गरवारे कॉमर्स कॉलेजमध्ये लेक्चरर. संत साहित्यावर वृत्तपत्र व मासिके मधून लेख प्रसिद्ध होतात.*

''आधुनिक काळातील ज्ञानेश्वर'' या शब्दामध्ये स्वामी स्वरुपानंदांचा परिचय करून दिला जातो हे सर्वश्रुत आहे. ज्ञानदेवांच्या समग्र वाङ्मयाचा आधुनिक मराठी भाषेत स्वामी स्वरुपानंदांनी ओवीबद्ध अनुवाद केला. या दृष्टीने वरील विधान यथार्थच आहे. परंतु स्वामी स्वरुपानंद आणि रामकृष्ण परमहंस यांच्या जीवनातील अंतर्गत साम्य पाहिले असता मन आश्चर्यचकित होते. स्वामींनी ज्ञानेश्वरांच्या साहित्याचा अनुवाद केला, तो अनुवाद मूळ साहित्याइतकाच कसदार झाला आहे, हे कोणाच्याही लक्षात येण्यासारखे आहे. हा अनुवाद जसा यथातथ्य आहे, तसाच आणखी एक अनुवाद स्वामींनी केलेला आढळतो. तो अनुवाद कोणत्या कागदावर लिहिलेला नाही तर स्वतःचे जीवन हाच अनुवाद बनविला, कोणाचा ? तर श्री रामकृष्ण परमहंस यांच्या आयुष्याचा अनुवाद स्वामी स्वरुपानंदांनी आपल्या आयुष्यात केला असे म्हणावे लागेल इतके साधर्म्य दोघांच्या जीवनपद्धतीत आहे.

स्वतःच्या सद्गुरुं व्यतिरिक्त स्वामींची जी आदरस्थाने होती त्यामध्ये सर्वात वरचा क्रमांक हा रामकृष्ण परमहंस यांचा होता. आपल्या खोलीमध्ये सद्गुरुंच्या फोटो शेजारीच रामकृष्ण परमहंसांचा फोटो त्यांनी लावलेला होता. या फोटोबाबतही ते विलक्षण भावुक होते, हे एका प्रसंगावरून लक्षात येते. या फोटोची फ्रेम बदलण्यासाठी गेलेल्या व्यक्तीला ती घेऊन ठरलेल्या वेळी परत आणण्यास उशीर झाला तेव्हा ते विलक्षण अस्वस्थ झाले होते. हा प्रसंग त्यांच्या चरित्रात पाहावयास सापडतो. रामकृष्ण परमहंसांचा एक नवीन आणलेला फोटो पाहून स्वामी ''रामकृष्ण रामकृष्ण'' म्हणत भावसमाधीत गेले, हाही प्रसंग या संदर्भात लक्षणीय आहे.

स्वामींच्या आध्यात्मिक आयुष्याच्या घडणीच्या काळात रामकृष्ण परमहंस आणि विवेकानंद यांच्या बद्दलच्या वाचनामुळे, अभ्यासाने स्वामी विलक्षण भारावून गेले होते. त्यांच्या अभ्यासामुळेच भारतमातेबद्दलची आध्यात्मिक प्रतिमा स्वामींच्या अंतःकरणात रुजली होती. आणि पुढे त्यांच्या हातून घडलेल्या देशभक्तीला असा आध्यात्मिक संदर्भ प्राप्त झाला होता.

आधुनिक शिक्षणपद्धतीचे कोणतेही संस्कार न झालेली उपजत बुद्धिमत्ता आणि त्यामुळे कोणत्याही पुस्तकी बौद्धिकतेच्या प्रभावावाचून असलेली शुद्ध आध्यात्मिकता ही रामकृष्णांच्या ठिकाणी स्वामी स्वरूपानंदांना आढळून आली. आणि आपल्या जीवनाशी असलेले हे साधर्म्य लक्षात आल्यामुळे स्वामी रामकृष्णांकडे अधिक आकृष्ट झाले असावेत असे वाटते. रामकृष्णांप्रमाणेच स्वामींचेही लौकिकार्थाने पदवीचे शिक्षण झालेले नव्हते. दोघांचाही विद्येबाबतचा विचार किती समान होता हे पुढील विधानांवरून लक्षात येईल. रामकृष्णांनी आपल्या वडील बंधुंना सांगितलेली ही गोष्ट इतिहासात प्रसिद्ध आहे. ''भाजी-भाकरी मिळविण्याची विद्या मला नको. मला अशी विद्या पाहिजे की, जिने हृदयात ज्ञानाचा उदय होऊन मनुष्य कृतार्थ होतो.''

***दाविते ज्ञान-भानूते । अज्ञानतम नाशिते ।***
***सुख शाश्वत जी देते । ती विद्या मिळू इथे ।***

या शब्दामध्ये स्वामी स्वरुपानंदांनीही आपल्या शिक्षण विषयक दृष्टिकोन व्यक्त केला आहे.

आणि यातून पुढे शास्त्र, पोथ्या पुराणे यांच्या पढिक पांडित्यापेक्षा आपल्याला ईश्वराची भक्ती अधिक मोलाची वाटते या विचाराचा उदय झालेला आढळतो. पुस्तकी वाचनातून येणाऱ्या ज्ञानापेक्षा भक्तीतून उदित होणारे ज्ञान अधिक मोलाचे आहे, असा विचार दोघांच्याही ठिकाणी समानत्वाने आढळतो.

''चांगल्या शास्त्री पंडितांच्या तोंडून वेदवेदान्त, पुराण ऐकले आहे. त्यांच्यातले सार समजून घेतल्यावर त्या पोथ्या-पुराणांची एक माळ करून ती आईच्या गळ्यात घालून म्हणालो, आई, ही घे तुझी शास्त्रे पुराणे, मला फक्त तुझी शुद्ध भक्ती दे.'' असे रामकृष्ण म्हणतात.

रामकृष्णांची हीच भावना स्वामी स्वरुपानंदांच्या साहित्यातून अशा प्रकारे प्रकट होताना दिसते की -

***प्रसन्न होता माता, हाता चढले सोहं सार ।***
***हवा कशाला मला आता, हा वृथा शास्त्र संभार ॥***

कालिमाता ही रामकृष्णाचे सारसर्वस्व होती; हे सर्वश्रुत आहेच. या भक्तितूनच कालिमातेचे साक्षात् दर्शन घडावे अशी व्याकुळता त्यांच्या अंतःकरणात निर्माण झाली होती. याबद्दल रामकृष्णांनी आपला अनुभव एकदा सांगितला तो असा - ''आईचे दर्शन झाले नाही म्हणून हृदयात भयंकर वेदना उत्पन्न झाल्या. एखादे भिजलेले वस्त्र जसे पिळावे, तसे माझे हृदय जणूकाही कोणी पिळून काढीत आहे की काय, असे वाटू लागले. आईचे दर्शन कधीच होणार नाही की काय, या विचाराने प्राण घाबरा झाला व असे वाटले की, तर मग आता जिवंत राहून तरी काय करावयाचे आहे ? देवीच्या पायापाशी प्राण द्यावा म्हणजे झाले.

इतक्यात त्या गाभाऱ्यात एक तलवार होती तिच्याकडे एकदम नजर गेली. त्याबरोबर तिच्या एका घावाने जिवाचा निकाल करून टाकावा म्हणून एखाद्या उन्मत्तासारखा तिच्याकडे धावलो व ती हातात घेऊन आता भोसकणार इतक्यात आईचे अपूर्व अद्भूत दर्शन झाले."

स्वामी स्वरुपानंदांची श्रीविष्णूदर्शनासंबंधीची व्याकुळता आपल्याला चरित्रावरून ज्ञात आहे. परंतु मातेच्या दर्शनासाठीही ते रामकृष्णांप्रमाणेच व्याकूळ झालेले होते, हे त्यांच्या बाह्य जीवनात जाणवले नाही तरी अंतरंगातून ती ओढ किती तीव्र होती याची साक्ष 'अमृतधारा'मधून मिळते. ते म्हणतात -

*काय न झाली अजुनि, माऊली मत्कर्माची राख ।*
*धावी पाऊले भक्तवत्सले, मीद आपुले राख ॥*
*अनन्यभावे कळवळूनि जै, उडी घेतली खाली ।*
*भक्त-वत्सला माऊली, मला फुलासारखी झेली ॥*

कालीमाता ही रामकृष्णांच्या दृष्टीने दगडी मूर्ती नव्हती तर ती त्यांच्या दृष्टीने, "She was a 'living reality' to him as a mother of kind and effulgent love." स्वामी स्वरूपानंदांचा जगदंबेकडे पाहण्याचा दृष्टिकोनही काही यापेक्षा वेगळा नव्हता. अमृतधारा या पुस्तकातून या म्हणण्याची साक्ष पटते. संपूर्ण अमृतधारा या पुस्तकातून स्वामी स्वरुपानंद आणि जगदंबा यांच्या वात्सल्यपूर्ण संबंधांची, आपापसात होणाऱ्या सुखसंवादाची, आणि जगदंबेच्या जित्याजागत्या अस्तित्वाची कल्पना येते.

कालीमातेकडे मातृत्वाचे मूर्तिमंत रूप म्हणून पाहणे त्याचप्रमाणे प्रत्यक्ष पत्नीकडेही माता या स्वरुपातच पाहणे हा रामकृष्णांच्या जीवनाचा एक वैशिष्ट्यपूर्ण असा भाग आहे. 'कामविरहित प्रेमभाव' हे त्यांच्यातील परस्पर संबंधाचे सूत्र होते.

स्वामी स्वरुपानंदांचा जीवनप्रवाह अजून पूर्णत्वाने आध्यात्मिकतेकडे वळला नव्हता अशा काळातील एक प्रसंग आहे. स्वामींचा एका तरुणीशी परिचय दृढावून त्याची परिणती परस्पर प्रेमात झाली होती. विवाह करून संसारात पदार्पण करावे अशा विचारात स्वामी होते. त्या काळात एक प्रेमकाव्य त्यांनी लिहिले आहे. तिच्या हातातील सुवर्णकंकण पाहून स्वामींच्या मनात अनेक उत्तमोत्तम कल्पना निर्माण झाल्या आहेत. पुढील तीन साक्या त्यांच्या प्रेमाच्या स्वरुपाची कल्पना देणाऱ्या आहेत. ते प्रेम कोणत्या स्तरावरचे होते, हे त्यातून लक्षात येते.

*की लक्ष्मण-सीता देवीते संरक्षावे म्हणूनी ।*
*सुवर्ण-कंकण-सीमा-रेषा असे आखिली कोणी ॥*
*पापविकारे कर निरखावा विचार जो मनि यावा ।*
*पापघ्नाच्या परि त्या तेजे सहजे नेत्र दिपावा ॥*
*अन् प्रेमाची निर्मल हृदयी ज्याच्या जळती ज्योत ।*
*तयेच प्राणिग्रहणास्तव की पुढे करावा हात ॥*

कालवशात् स्वामींच्या आयुष्याचा सारा जीवनौघच बदलला आणि विवाहाची शक्यता पार धुळीला मिळाली. परंतु जर त्यांच्या आयुष्यात हा प्रसंग आला असता तर त्यांचे पत्नीप्रेम हे कामविरहित प्रेमभाव या मार्गावरूनच गेले असते असे म्हणण्याला पुष्कळ वाव आहे. "आणि तियेच्या सौंदर्यावर नाही ठेविला डोळा । अंतरंग दर्शनार्थ झाले पंचप्राणही गोळा ॥" हे स्वामींचे या संदर्भातील उद्‌गारही याचीच साक्ष देणारे नाहीत का ?

या दोन्हीही विभूती रुढ अर्थाने संसारी नव्हत्या, परंतु संसारी माणसांना लाजवील अशी व्यवहारदक्षता, नीटनेटकेपणा, काटकसरी वृत्ती दोघांकडेही होती. 'सदासर्वकाळ ईश्वरचिंतनात मग्न असूनसुद्धा, त्यांना सर्व प्रकारच्या लहान-सहान गोष्टींचीसुद्धा शुद्ध असे. स्वतःच्या सर्व जिनसांची व्यवस्था ते स्वतः पाहत. त्यांच्या खोलीतील सर्व वस्तूंची मांडणी अगदी रेखीव असे. प्रत्येक वस्तूची जागा ठरलेली असून ती वस्तू तिथेच ठेवायची, असा त्यांचा शिरस्ता असे आणि त्याचप्रमाणे ते दुसऱ्यालाही वागावयास लावीत. त्यांना घाणेरडेपणा, गबाळेपणा बिलकुल खपत नसे." रामकृष्ण चरित्रातला वरील उतारा वाचताना आपण नेमके कोणाचे चरित्र वाचत आहोत ? स्वामी स्वरूपानंदांचे तर नाही ना ? असा संभ्रम पडावा इतके या बाबतीत दोघांच्याहीमध्ये साम्य आहे.

आता दोघांच्या आध्यात्मिक जीवनपद्धतीतील साम्याचा थोडा विचार करू. रामकृष्णांनी आपल्या आयुष्यात विविध धर्म, पंथ, संप्रदाय यांच्या वेगवेगळ्या साधना पद्धतींचा अवलंब करून पाहिला आणि धर्माधर्मातील भेद हा वरवरचा आहे, कृत्रिम आहे हे जगाला सांगण्याचा त्यांनी जीवनभर प्रयत्न केला. धर्माधर्मातील वरवरच्या कृत्रिम भेदाकडे लक्ष न देता स्वधर्माकडेच स्वामींनीही लक्ष केंद्रित केलेले दिसते. एका मुसलमान शिष्याला धर्माची व्याख्या सांगताना स्वामी म्हणाले होते, "स्व-रुपी राहणे हाच स्वधर्म."

या दोघांचेही असंख्य शिष्य सर्वत्र पसरलेले आहेत. अध्यात्माला ललामभूत होतील अशी शिष्यमंडळी दोघांनीही निर्माण केली आहेत. पण हे करण्यासाठी त्यांनी खूप मोठी प्रवचने दिली आहेत, असा भाग त्यांच्या आयुष्यात आढळत नाही. दोघांचीही शिष्य प्रबोधनाचीही पद्धत एकच होती असे लक्षात येते. ती म्हणजे आलेल्या व्यक्तीला आधी स्नेहाने आपलासा करून घेणे आणि नंतर अगदी मोजक्या शब्दात समोरच्या व्यक्तीच्या शंकेचे निरसन करणे. पुढेपुढे तर देहाची क्षीणता अधिक जाणवू लागल्यावर पुस्तकातूनच योग्य तो बोध समोरच्या शिष्याला मिळेल अशी व्यवस्था स्वामी करत असत.

*जो ज्ञाननिष्ठा अतिसंपन्न । सदा स्वरुपी रंगले मन ।*
*कदा न मोडे अनुसंधान । परमहंसासमान हो हंस ॥*

असे एकनाथ महाराजांनी भागवतामध्ये परमहंस या अवस्थेचे वर्णन केले आहे. या परमहंस स्थितीप्रत दोघेही जाऊन पोहोचले होते, नव्हे त्या अवस्थेत ते कायम स्थिर होते. रामकृष्ण व परमहंस असे शब्द एकत्रच उच्चारले जातात. यातून रामकृष्ण 'परमहंस' या अवस्थेशी किती निगडीत होते हे लक्षात येते आणि स्वामी विद्यानंदांनाही आपल्या सद्गुरुंच्या चरित्रालाही 'परमहंस ऑफ पावस' असेच नाव सुचावे

यातूनही हीच गोष्ट अधोरेखित होत नाही का ?

सदा स्वरुपानुसंधानातच मग्न असल्यामुळे त्या भावावस्थेतून भौतिकामध्ये प्रवेश करण्यासाठी दोघांनाही कष्ट पडत असत. रामकृष्ण परमहंसांनी शारदामातांना त्यासंबंधी सूचना दिल्या होत्या. त्यांच्या शरीराला स्पर्श करावा आणि ठराविक मंत्र म्हणावा असे त्यांनी त्यांना सांगितले होते, असे वाचनात आलेले स्मरते. स्वामी स्वरुपानंदांचीही तीच अवस्था होती. दर्शनार्थी व्यक्ती खोलीत प्रवेश करण्यापूर्वी स्वामींच्या खोलीतील सेवेकरी त्यांच्या शरीराला हलकासा स्पर्श करीत असत आणि मग ते व्यावहारिक भानावर येत असत, अशा आठवणी त्यांचे सेवेकरी सांगतात.

महासमाधी घेण्यापूर्वी आधी काही दिवस एक दिवस रामकृष्णांनी नरेंद्राला आपल्या खोलीत बोलवून ध्यानस्थ बसण्यास सांगितले. त्याप्रमाणे ध्यानाला बसल्यावर नरेंद्राचे बाह्य जगाचे भान हरपले. काही वेळाने ध्यान विसर्जन झाल्यावर पाहिले तर समोर रामकृष्ण बसले होते आणि त्यांच्या नेत्रातून अश्रू वाहत होते, श्रीरामकृष्ण त्याला पाहून म्हणाले, "नरेंद्र, मजजवळ होते नव्हते तेवढे सर्व तुला देऊन, आता मात्र मी खराखरा फकीर झालो."

अगदी यासारखेच म्हणता येणार नाही पण या प्रसंगाशी साधर्म्य दाखवणारी घटना स्वामींच्या आयुष्याच्या उत्तरार्धातही दिसते. "स्वामींच्या डोळ्यांवर शेवटी शेवटी पट्ट्या ठेवलेल्या असत. एक दिवस सर्वांना दर्शन देऊन झाल्यानंतर स्वामींनी प्रामाण्यपुरुष सत्यदेवानंदांना एकट्याला आत त्यांच्या खोलीत बोलाविले. त्यांना आपल्या डोळ्यावरील पट्टी काढण्यास सांगून त्यांना आपल्या समीप बसविले व सरळ एकटक आपल्या डोळ्यात दृष्टी लावण्यास सांगितले. स्वामींच्या अवघ्या शरीरातून एका दैवी शक्तीचे प्रारण होत होते. हे प्रारण होताच स्वामींना हायसे वाटून त्यांच्या चेहऱ्यावर आनंद उमटला. थोड्या वेळाने सत्यदेवानंद स्वामींच्या खोलीच्या बाहेर येऊन बसले. ध्यानसमाधी लागल्याप्रमाणे ते नंतर बराच वेळ बसून होते."

या दोघांच्या साधर्म्याचा एवढा विचार झाल्यानंतर एक अगदी बारीकसा असा साम्याचा मुद्दा नोंदविण्याचा येथे मोह आवरत नाही. दोघांचीही बसण्याची पद्धत पाहण्यासारखी आहे. ताठ बसून दोन्ही हातांची बोटे एकमेकांत जुळवून बसलेली त्यांची कृश आकृती या मध्येही विलक्षण साम्य आहे. हा मुद्दा बाह्य साधर्म्य दाखविणारा अगदी लहानसाच मुद्दा आहे तरी स्वामी आपल्या आदरस्थानाशी किती तादात्म्य पावले होते, याची साक्ष देणारा आहे.

स्वामींचा आपल्या सद्गुरुंवर दृढ विश्वास असला तरी त्यांचा वैयक्तिक पिंडमात्र रामकृष्ण परमहंसांशी अधिक मिळताजुळता होता आणि म्हणूनच

***मनात येते मनात माझ्या रामकृष्ण होऊन ।***
***काळीमाते सवे असावे दर्शन-सुख भोगून ॥***

अशी आस स्वामींनी आयुष्यभर बाळगली आणि त्या ध्यासातूनच ते आपल्या आराध्य दैवताशी असे व इतके एकरूप झाले. आयुष्याच्या अखेरच्या काळात स्वामींनी आपल्या स्वमुखानेच याची पावती दिली.

रामकृष्ण परमहंसांनी विवेकानंदांच्या मनातील शंका निरसन करताना महासमाधीच्या अगोदर उद्‌गार काढले होते, "पक्के लक्षात ठेव की, जो राम आणि जो कृष्ण झाला होता तोच आता रामकृष्ण होऊन आला आहे तुझ्या वेदान्ताच्या दृष्टीने नाही तर प्रत्यक्ष !" आणि स्वामी स्वरूपानंदांनीही आपल्या महासमाधीच्या आधी "ओम् राम-राम तो मी, ओम् कृष्ण-कृष्ण तो मी, ओम रामकृष्ण - रामकृष्णपरमहंस तो मी" अशी निःसंदिग्ध ग्वाही दिली होती.

आणि म्हणूनच स्वामी स्वरुपानंदांनी रामकृष्ण परमहंस यांच्या "आयुष्याचा अनुवाद" केला असे म्हणण्याचा मोह अनावर होतो.


संदर्भ - ग्रंथ सूची

१) स्वात्मतृप्त - स्वामी विद्यानंद विशेषांक
२) परमहंस ऑफ पावस - स्वामी विद्यानंद
३) पावसचा पूर्ण पुरुष - अनुवादक, श्री. शेरे भा. ग.
४) रामकृष्ण चरित्र - रामकृष्ण मठ, श्री. परांजपे.
५) स्वामी स्वरुपानंद जीवन चरित्र व तत्त्वज्ञान - श्री. रा. य. परांजपे
६) एकनाथी भागवत
७) अमृतधारा - स्वामी स्वरुपानंद
८) स्वामी स्वरुपानंद स्मृतिसौरभ.



**सौ. केतकी मोडक**

२४३/८, शुक्रवार पेठ, पुणे ४११ ००२.


पुनर्मुद्रित सौ. केतकी मोडक यांचे सौजन्याने

# आम्हा लाभो छत्र छाया

चैतन्याचा निर्झरु नित निर्मळ अंतरु ।
उत्साहासी बहरु सदा असे ।
संसारी दक्ष स्वामी चरणी लक्ष ।
धरी न्यायाचाच पक्ष सत्वगुण असे ।
कर्तव्याची कास सचोटीचा ध्यास ।
प्रगतीची आस मनी वसे ।
अंतरीची माया धरी वात्सल्याची छाया ।
आम्हा लाभो छत्रछाया कृपा असो स्वामीराया ।

**सौ. मंजिरी मोहन रानडे**

# श्रीस्वामी स्वरुपानंदांची काही अप्रकाशित पत्रे

**डॉ. सौ. सुनीता सदानंद तांबे**

*एम.ए., एम.फिल. विषय रत्नाकर मातकरींच्या एकांकिका. पीएच.डी. श्रीएकनाथपंचक एक विवेचक अभ्यास. २४-२५ लेख व लघुकथा प्रकाशित. काही कथा बक्षीस पात्र.*

**॥ आरंभिक ॥**

रविंद्रनाथ टागोर यांनी ईश्वरास एके ठिकाणी केलेल्या प्रार्थनेतील पुढील पंक्ती, श्रीस्वामी स्वरुपानंदांनी आपल्या एका साधक शिष्यास लिहिलेल्या पत्रातून उद्धृत केलेल्या आहेत. अर्थातच त्या स्वामींच्या अप्रकाशित पत्रातीलच आहेत; ज्यांचा येथे विचार करण्यात आलेला आहे. रविंद्रनाथ म्हणतात -

***"विपत्तीमध्यें तू माझे रक्षण कर, ही माझी प्रार्थना नाही !***
***विपत्तीमध्यें मी भिऊ नये, म्हणजे झाले !***
***मी दुःखावर विजय मिळवू शकावा, म्हणजे झाले !***
***हे ईश्वरा, तुझ्याबद्दल मी केव्हाही शंकित होऊ नये ! (पत्र क्र. ७)***

श्रीस्वामींनी आपल्या मित्रांना, गुरुबंधुंना, सुहृदांना, शिष्यांना, चाहत्यांना व इतरही अनेकांना वेळोवेळी जी पत्रे पाठविली त्यातून स्वामींचा त्यांच्याविषयीचाच नव्हे तर एकूणच मानवजातीविषयीचा कळवळा, जिव्हाळा व प्रेम प्रकटत राहते. या पत्रांमागे असलेले श्रीस्वामींचे मन हे अतिशय पारदर्शी, ईश्वरनिष्ठ, पारमार्थि आणि परतत्त्वस्पर्शी असल्याचे जाणवते. 'कर्म हेच जीवन जाणा. सतत कर्मरत रहा. कर्मातच ईश्वर पहा.' अशी मूल्यवान शिकवण त्यांची पत्रे देत राहतात तेव्हा लोकांना ती निश्चितच प्रेरणादायी ठरतात. आपल्या जीवनात श्रीस्वामींच्या विचारांचा मागोवा घेत जाणारी अशी असंख्य माणसे महाराष्ट्रात आहेत; की ज्यांची जीवने त्यांच्या मार्गदर्शनाने, उपदेशामृताने कार्यरत होऊन उल्हसित-आनंदीत बनलेली आहेत. कार्यरत होऊन कृतार्थ झालेली आहेत. या पत्रांतून श्रीस्वामींचे 'एक लोकोत्तर विभूती' म्हणून जनमानसातील स्थानही लक्षात येते.

या ठिकाणी श्रीस्वामींच्या अशाच काही अप्रकाशित पत्रांचा अभ्यास मांडण्याचा प्रयत्न केलेला आहे. प्रथम त्यांच्या आजवर प्रकाशित झालेल्या पत्रांविषयीची थोडक्यात माहिती करून घेणे संयुक्तिक ठरेल.

**॥ श्रीस्वामींची प्रकाशित पत्रे ॥**

आजवर श्रीस्वामींनी लिहिलेल्या पत्रांची 'स्वरुप-पत्र-मंजुषा' व 'पत्र-बोध' अशी दोन संकलने प्रसिद्ध झालेली आहेत. पैकी 'स्वरुप-पत्र-मंजूषा' हा ओवीबद्ध पत्रसंग्रह इ. स. १९७१ च्या जुलै महिन्यात स्वामी सत्यदेवानंद सरस्वती यांनी संपादित केलेला असून १९५१ ते १९६३ या कालखंडात स्वामींनी पद्यात लिहिलेल्या पासष्ट उद्बोधक पत्रांचा हा संग्रह आहे. कर्मयोगसिद्धी, सगुण उपासना, तत्त्वज्ञान-प्रबोधन, श्रीसंत-सद्गुरु भजन महिमा, या सांप्रदायिक सन्मार्ग प्रकाश व प्रासंगिक बोध-सुधा अशी क्रमशः त्यात मांडणी केलेली आहे. 'पत्रबोध' हा इ. स. १९९५ मध्ये स्वामी स्वरुपानंद सेवा मंडळाच्या अभ्यास समितीने संकलित केलेल्या पत्रांचा संग्रह आहे. ती पत्रे अनेकांना सहज-सुलभ बोध करून देणारी, प्रासादिक व प्रेमभावनेने ओथंबलेली अशी आहेत. या प्रातिनिधिक पत्रात विषयांचे वैविध्यही आहे. त्याचप्रमाणे श्रीस्वामींनी १९३४ पूर्वी लिहिलेल्या पत्रांपैकी जी पत्रे उपलब्ध झाली ती 'स्वामी स्वरुपानंद : जीवन चरित्र व तत्त्वज्ञान' या डॉ. रा. य. परांजपे यांनी लिहिलेल्या चरित्रग्रंथात समाविष्ट आहेत.

**॥श्रीस्वामींची अप्रकाशित पत्रे ॥**

पावस, रत्नागिरी येथील सद्गुरु स्वरुपानंद स्वामी यांनी लिहिलेल्या सर्वोद्बोधक अशा चोवीस अप्रकाशित पत्रांचा या ठिकाणी विचार करावयाचा आहे. ही पत्रे स्वामींनी खामगांव निवासी त्यांचे सत्शिष्य श्री. रामभाऊ गोडबोले यांना इ. स. १९५३ ते १९७३ अशा वीस वर्षांच्या काळात लिहिलेली आहेत. तसे पाहता ही पत्रे वैयक्तिक स्वरुपाची-कौटुंबिक स्वरुपी आहेत. तरीही सर्व स्वामी भक्तांनाच नव्हे तर समाजातील तत्सदृश्य परिस्थितीत सापडलेल्या इतरही अनेकांना ती मार्गदर्शक होतील असे वाटते. चिंचवड येथील सौ. उज्ज्वला गोखले यांच्या सौजन्याने ही प्रथमच या ठिकाणी प्रकाशात आणण्यात येत आहेत.

या पत्रांपैकी काही श्रीस्वामींनी स्वतः लिहिलेली, काही आपल्या सेवकांकडून लिहून घेतलेली तर काहींत सेवकांनीच श्रीस्वामींचा आशय कळविलेली अशी आहेत.

**॥ पत्र विषय ॥**

ही अप्रकाशित पत्रे, त्यावरील दिनाङ्क व सन जुळवून कालानुक्रमाने अभ्यासण्यात आलेली असून त्यातील बोधामृतासाठी ती महत्त्वाची ठरावीत. नामस्मरणाचे महत्त्व, ईश्वर शरणागती, संसाराचे स्वरूप, त्यात घ्यावयाची दक्षता, उत्कृष्ट गृहस्थाश्रम, दिनचर्या कशी

असावी, विद्येचे महत्त्व, उद्योगशीलता, श्रमप्रतिष्ठा असे विषय यात असून त्यासंबंधी स्वामींनी वेळोवेळी केलेले मोलाचे मार्गदर्शन त्यातून आढळते. या पत्रातील 'कुणाचेही न चले बळ । कर्म तैसे भोगी फळ ।' हा आशय घ्या अथवा भाव अंतरी यथार्थ । देव देणार समर्थ ।।' हा आशयही अत्यंत मोलाचा आहे. भक्तांना दिलासा देणारा आहे.

## ।। पत्रारंभ व समारोप ।।

श्रीस्वामी स्वतः लिहीत असलेल्या पत्रांचे आरंभी, मधोमध 'जय माताजी' असे लिहीत असल्याचे या पत्रांतही दिसते. त्यानंतर काही पत्रे त्यांनी अंतर्देशीय पत्रांप्रमाणे वापरलेली आहेत. त्यावर डाव्या बाजूस 'स्वरुपानंद' मध्ये ॐ आणि उजव्या कोपऱ्यात मु. पो. पावस, रत्नागिरी असे छापलेले आहे.

प्रत्येक पत्राच्या आरंभी 'प्रिय श्री. रामभाऊ गोडबोले यांसी, हरिस्मरणपूर्वक अनेक आशिर्वाद विशेष' असा उल्लेख आलेला आहे. जी पत्रे स्वामींनी स्वतः सांगून आपल्या सेवकांकडून लिहवून घेतली आहेत ती बहुतांश छापून घेतलेल्या लेटर हेडवर लिहिलेली आहेत. आणि त्यात 'इकडील सर्व क्षेम. तुमचे दि – चे पत्र पोहोचले. माझी प्रकृती साधारण बरी आहे. तथापि क्षीणतेमुळे बहुतेक सर्व वेळ अंथरुणावर स्वस्थ पडून असतो. लिहिणे-वाचणे होत नाही' इत्यादी मजकूर मुद्रित आहे. शेवटी 'तुम्हा सर्वास आशिर्वाद.' असे लिहिलेले आहे. त्याचप्रमाणे दि. २।९।६३ ते ६।३।६८ या काळातील पत्रात आपला स्वरुपानंद

आणि दि. २।९।६९ ते दि. ६।३।७३ पर्यतच्या पत्रात

आपला / तुमच्या सर्वांचा

आत्मतृप्त

स्वरुपानंद

या नावाने स्वाक्षरी करून पत्राचा समारोप करण्यात आलेला आहे.

## ।। पत्रातील आशय ।।

श्रीस्वामींनी लिहिलेल्या पत्रांतून विविध विषय आलेले आहेत. अर्थातच विषयानुसार त्यातील आशयही साधकांसाठी तितकाच महत्त्वाचा असतो आणि या पत्रांमधून तो स्पष्टपणे प्रकटतो. नामजपाचे महत्त्व प्रतिपादिणारी पत्रे या अप्रकाशित पत्रांत संख्येने अधिक आहेत. पत्र क्रमांक ४, ६, ८, ९, १०, १३, १४, १५, १७, १८, १९ आणि २१ अशा बारा पत्रांतुन स्वामींनी नामजपाचे / नामस्मरणाचे महत्त्व काही अभंगांद्वारे वा ओव्यांतून प्रकटविले आहे. त्यातील प्रातिनिधिक म्हणता येईल अशा एका पत्रात ते म्हणतात -

*''नामजपे जाय जळोनिया पाप । होय आपोआप चित्तशुद्धी ।।१।।*
*नामजपे जाय काम क्रोध भय । होय मनोजय अनायासे ।।२।।*
*जपा हरिनाम जपा हरिनाम । मार्ग हा सुगम वैकुंठीचा ।।३।।*
*स्वामी म्हणे आम्ही जाणोनि सकळ । कापे कळिकाळ आम्हा पुढे ।।४।।''*

नामजपाने पाप जळून जात असल्याने चित्ताची शुद्धता आपोआप होऊन जाते. नाम सतत जपत गेल्यास कामक्रोधादि षड्रिपुंचा नाश होतो व आपोआप मनोजप घडत जातो. सतत हरिनाम जपा. वैकुंठीचा तोच सुगम-सोपा असा मार्ग आहे. स्वामी म्हणतात, 'आम्ही नामस्मरणशक्ती जाणत असल्याने काळही आम्हापुढे थरथरत उभा राहतो.'

नामजपाप्रमाणेच स्वामींनी श्रमाने प्रतिष्ठा प्राप्त होते. जगात नावलौकिक होतो असे म्हटले आहे. त्यांना असणारा श्रम प्रतिष्ठेविषयीचा आदर पत्र क्रमांक १, २, ३, ४, ९ व १० अशा सहा पत्रांमध्ये प्रकटतो. स्वामी लिहितात, 'तुम्हाला एकच गोष्ट पुनः पुन्हा लिहावीशी वाटते ती हीच की प्रस्तुत सकाळपासून संध्याकाळपर्यंत किंबहुना रात्रंदिवस शक्य तेवढे श्रम करून, मिळेल तिथे मिळेल तसले काम स्वीकारून किंवा स्वतःच काही योग्य व्यवसाय शोधून काढून दररोज चार पैसे, दोन आणे, रुपया दोन रुपये काय मिळविता येतील तेवढे मिळविणे. स्वतःचे आणि कुटुंबाचे पोषण करणे हीच ईश्वरसेवा समजावी. या पलीकडे पोथ्या, पुस्तके वाचण्याची तादृश गरज नाही. शक्यतो घटकाभरही उद्योगांवाचून राहू नये. जरूर तेवढीच विश्रांती घ्यावी. एक तास काम करून दोन पैसे मिळविले तरी पुरे. परंतु वेळ व्यर्थ बसून दवडू नये.''

व्यवसाय अथवा उद्योगधंदा करण्याविषयीची स्वामींची पत्रे क्र. १,२,३,५ आणि ६ अशी एकूण ५ आहेत. ते लिहितात, 'सायंकाळी प्रार्थनेच्या वेळी प्रत्यही तुमची आठवण होत असतेच. सध्या तुमचा तिकडे काय व्यवसाय आहे ? चरितार्थापुरता उद्योगधंदा कोठे काही मिळाला का ? धाकटे बंधू राजश्री लक्ष्मणराव कोठे असतात ? काय करतात ? चरितार्थापुरता उद्योगधंदा कोठे काही थोडा फार शोधून काढायला हवा. ज्याला समंजसपणे संसार करता येणार नाही, त्याची परमार्थातही तितकीशी प्रगती होणार नाही. किंबहुना कोणी प्रपंचाला वैतागून परमार्थ साधून जाईल तर त्याच्या काहीच हाती लागणार नाही.' (पत्र क्र. ३) या पत्रातून श्रीस्वामींना आपल्या शिष्यांने अथवा साधकाने स्वस्थ न बसता, नोकरी नसेल तर काही व्यवसाय वा उद्योगधंदा करावा असे वाटते. उद्योगी माणूसच आपले जीवनमान उंचावू शकतो. परमार्थही साधू शकतो, असे सांगणारे हे पत्रही प्रातिनिधिक म्हणता येईल.

ईश्वर शरणते विषयी श्रीस्वामींनी पत्र क्र. ७ व ९ मध्ये काही विचार प्रकटविले आहेत. त्यांच्या मते कोणतीही गोष्ट करायची झाल्यास ती विचारपूर्वकच करायला हवी. आई-वडिलांना दुःख होईल अशी कोणतीही गोष्ट करू नये. त्यांच्या मनाविरुद्ध वागूनही सुख मिळेलच असे तरी कोणी सांगावे ? नपेक्षा 'सुख पाहता जवापाडे । दुःख पर्वताएवढे' अशी स्थिती व्हायची. त्यापेक्षा ठेविले अनंते तैसेचि रहावे । चित्ती असो द्यावे समाधान ।' हे बरे. समाधान टिकत नसेल तर पुनः पुन्हा मनोभावे ईश्वराला शरण जाणे, त्याची प्रार्थना करणे व आपल्या उद्योगास लागणे हेच योग्य' (पत्र. क्र. ७)

"प्रारब्ध" विषयक स्वामींनी पत्र क्र. १, ४, ७ व १७ अशी चार पत्रे रामभाऊंना लिहिली. 'ईश्वर प्रत्येकाला योग्य तीच परिस्थिती देत असतो. प्रतिकूल प्रारब्ध आजच्या सत्कृत्यांनी अनुकूल करून घेता येते.' असा दिलासा त्यांनी दिलेला आहे. आपल्या हातून पूर्वी (पूर्वजन्मी) काय पाप घडले ? काय दोष घडले हे जीवाला कळत नाही. पण या जन्मी नामस्मरण करीत यथाशक्ती सदाचरणात दिवस घालविण्याने पुढे अनुकूल प्रारब्ध निर्माण होणारच असा विश्वास ते देतात.

पत्र क्रमांक नऊ मध्ये श्रीस्वामींनी विद्येचे महत्त्व पटवून दिलेले आहे. ते लिहितात -

*'दावी ज्ञान भानू ते । अज्ञान-तम नाहीते ॥*
*सुख शाश्वत जी देते । ती विद्या मिळवू इथे ॥ १ ॥*
*दैन्य दुःख लया नेते । शोक ताप निवारिते ॥*
*चित्तास शांतता देते । ती विद्या मिळवू इथे ॥२॥*
*आनंदी जन्म जी घेते । आनंदे विश्व कोंदिते ।*
*आनंदी लीन जी होते । ती विद्या मिळवू इथे ॥३॥'*

ज्ञानरूपी सूर्याचे दर्शन घडवून अज्ञानांधःकाराचा नाश करते आणि शाश्वत सुखाची जी प्राप्ती करून देते ती विद्या आपण इथे प्राप्त करून घेऊ. दैन्य दुःख नाहीसे करून शोक तापही जी निवारिते आणि चित्तास शांतता देते ती विद्या आपण इथे प्राप्त करून घेऊ. आनंदातून जी जन्मते आणि सारे विश्व आनंदाने कोंदून टाकून अखेर आनंदातच जी विलीन होते अशी विद्या आपण इथे प्राप्त करून घेऊ या, असे स्वामींनी येथे उपदेशिले आहे.

'संसारी जीवास केलेला उपदेश' श्रीस्वामींच्या पत्र क्र. २, ३, ८, ९ अशा चार पत्रांतून केलेला आढळतो. पैकी पत्र क्र. ८ प्रातिनिधिक म्हणता येईल. स्वामी लिहितात, 'ईश्वराचे स्मरण ठेवावे. त्याला हात जोडावे. त्याला शरण जावे व आपले नित्य व्यवसाय करीत असावे. प्रयत्न करणे आपले काम. ईश्वराला काय द्यायचे ते तो देईल. प्राप्ती पाहून खर्च करावा. त्यातच मीठ-भाकर जी काय मिळेल ती संतोषाने खावी. श्रम करावे. मिळेल त्याने निर्वाह करावा. कुटुंबसंस्था चालवावी. आपण आपले कर्तव्य करीत आहोत, एवढे समाधान मनाला निश्चित रहायला, स्थिर ठेवायला पुरे आहे. आपणच सगळा भार किती वेळ घ्यावा ? दिवसातून घटकाभर तरी सर्व भार ईश्वरावर सोपवून मनात चिंतन, नामस्मरण, स्तोत्र पठण, प्रार्थना अशासारख्या जुळेल त्या साधनेत निश्चितपणे काळ दवडावा.'

पत्र क्रमांक बारमध्ये श्रीस्वामींनी कर्माचरणावर भर दिलेला आहे. ते लिहितात 'ईश्वराचे स्मरण ठेवून आपला उद्योगधंदा, व्यवसाय आमरण करीत राहणे एवढेच आपले काम ! तो ज्या परिस्थितीत ठेवील ती त्याची कृपाच मानावी. अन्य जन्मार्जित दोषांचे परिमार्जन वावग्या उपायांचा अवलंब करून होत नाही. ईश्वराचे नामचिंतन करीत प्रारब्ध भोगून संपवावे लागते.

*'म्हणोनि तें उचित । आणि अवसरेंकरूनि प्राप्त ।*
*तें कर्म हेतुरहित । आचरें तू ॥'*

प्रपंचातील कर्तव्ये यथाशक्ती, ईश्वराचे स्मरण ठेवून-त्याला हात जोडून करीत जावी. विनाकष्ट धनप्राप्ती होऊन प्रपंचाचे प्रश्न सुटतील असे समजू नये. कष्ट करून मिळेल ती अर्धीपुरी मीठभाकरी संतोषाने खावी व पुन्हा निर्धाराने आणि उमेदीने उद्योगधंद्याला लागावे. निष्ठापूर्वक प्रयत्न करणे आपले काम ! देवाच्या इच्छेस येईल ते तो देईल.... योग्य दिशेने पावले टाकावयाची. सत्य संकल्पाचा दाता भगवान !' हे पत्र छोटेसे असले तरी त्यातील बोध फार व्यापक आहे.

श्रीस्वामींच्या या अप्रकाशित पत्रातील दोन पत्रे त्यांनी गोडबोले बंधूंच्या सांत्वनासाठी पाठविलेली आहेत. त्यांच्या वडिलांच्या निधनानिमित्ताने पाठविलेल्या या पत्रातून स्वामींनी, त्या दोघा बंधूंनी एकविचारे वागून प्रापंचिक जबाबदारी चांगल्या प्रकारे पार पाडावी व त्यातच साधेल तेवढे परमार्थसाधन करावे, असे उपदेशिले आहे. (पत्र क्र. २०-२२).

श्रीस्वामींच्या मते व्यवहारातही दक्षता असावी म्हणजे तीच दक्षता हरिचिंतनास उपयोगी पडते. ते लिहितात, 'ईश्वरावर दृढ निष्ठा ठेवून आपापला व्यवसाय करीत असावे. अनुकूल-प्रतिकूल परिस्थिती त्याला जी काय द्यायची असेल ती तो देईल.

*'संपत्ती अथवा विपत्ती । जैसी पडेल काळगती ।*
*नामस्मरणाची स्थिती । सोडूच नये ॥'*

त्याची कृपा होईल तर सर्वकाही अनुकूलच घडून येईल. तो सर्व शक्तिमान ! त्याला अनन्यतेने शरण जाणे एवढेच आपले काम !

यापुढे स्वामींनी ज्ञानेश्वरांच्या गुरुकृपेविषयीच्या ओव्या दिलेल्या असून सद्‌गुरुचे महिमान गायीले आहे. त्या ओव्या अशा -

*'देव करी तरी काय न होई । दगडाचे नि नई तरिजेल ॥१॥*
*सूर्यकिरणांवरी मुंगीयांची हारी । अग्नीच्या पाठारी पीक होय ॥२॥*
*फुटोनिया पाय चालतील भिंती । मेरु महाक येती सम तुका ॥३॥*
*ज्ञानदेव म्हणे अघटित घडे । गुरु कृपे जोडे परब्रह्म ॥४॥' (पत्र क्र. १०)*

या अप्रकाशित पत्रांमधून तत्त्वज्ञानाचा असा स्वतंत्र विषय आलेला नाही. गृहस्थधर्मी साधकास ही पत्रे लिहिलेली असल्याने आणि त्यातही आर्थिक ओढग्रस्तीने चिंतीत असलेल्या साधकास ती पाठविलेली असल्याने त्या पत्रांमधून त्यांना आधी कार्यप्रवृत्त करावे-कर्मप्रवण बनवावे आणि स्वस्थ चित्त झाल्यावर अध्यात्माची, परमार्थाची अधिक गोडी त्यास लावावी असा विचार त्यामागे असू शकेल. प्रपंचव्यवहारात अडचणी-संकटे आली तरी जीव जर उपासक असेल, कोणा सत्पुरुषाच्या चरणी शरण असेल तर त्याच्या कृपेने हळूहळू सत्त्व वाढून ज्ञानप्राप्ती होत जाईल व परमशांतीचा त्यास अनुभव येईल असाही विचार तत्त्वज्ञानविषयक पत्रे न पाठविण्यामागे असावा. मात्र सगुण-निर्गुण उपासना, त्यांचे अद्वैत (पत्र क्र. १७) सद्‌गुरु कृपा (पत्र क्र. १०) ईश्वर शरणागती (पत्र क्र. ७-९) नामजप (पत्र क्र. ४, ६, ८ आणि इतर) या विषयींचा विचार अथवा उपदेश या पत्रांमधून स्वामींनी केलेला आढळतो.

ज्या रामभाऊ व लक्ष्मण गोडबोले या बंधुद्वयाला स्वामींनी ही

पत्रे पाठविली त्यांनी स्वामींच्याच कृपेने वा मार्गदर्शनानुसार दूध-दुभत्याचा व्यवसाय-उद्योगधंदा आरंभिला. स्वामींना त्यांनी त्याविषयी कळविल्यानंतर स्वामींनी त्यांना उलट टपाली जे पत्र पाठविले (पत्र क्र. ९) त्यातही स्वामींनी लिहिले, 'तुम्ही आपला उद्योगधंदा - (दूध) चिकाटीने, लक्ष लावून चालवावा व मिळेल पैसा तो अगदी काटकसरीने खर्च करावा. संसार दक्षतेने करावा. सर्वांशी मिळूनमिसळून वागावे. वडील माणसांना संतोष होईल असे वर्तन ठेवावे. म्हणजे गरिबीचा संसारही सुखाचा होतो व मीठभाकर ही गोड लागते. 'कर्ता करविता एक ईश्वर आहे' अशी दृढ बुद्धी असावी. मनात नामस्मरणाची ओढ असावी. नामस्मरणाने अंतःकरणावरील मळ जसजसा दूर होईल तसतसा आनंदाचा-स्वानंदाचा अधिकाधिक प्रत्यय येत जाईल.'

वरील मजकुराच्या पुढे स्वामींनी त्यांना जे सुचविले आहे ते प्रत्येक सुशिक्षित-सुसंस्कृत व्यक्तीनेही ध्यानात घेण्याजोगे आहे. स्वामींनी लिहिले, 'येत्या फेब्रुवारी महिन्यापासून माझ्यासाठी दरमहा आठ आणे (रुपया) जेवढी शक्य होईल तेवढी रक्कम वेगळी काढून ठेवावी. हा क्रम सतत दोन वर्षेपर्यंत चालावयाचा आहे. दर सहा महिन्यांनी जमेल ती रक्कम माझे नावे मनिऑर्डरने पाठवीत जावे. सदर रकमेचा विनियोग 'श्रीमत् अभंग ज्ञानेश्वरी' या ग्रंथाच्या प्रकाशनाकडे होणार आहे. त्यासाठी काही परिचित मंडळीस लिहीत आहे. सर्वांनी आपापला वाटा उचलल्यास सहजी काम होणार आहे.' यावरून ग्रंथ हेच गुरु, सद्ग्रंथाचे वाचन-मनन हा अभ्यास, ग्रंथसंग्रह हीच घरातील संपत्ती, यासाठी प्रसंगी काटकसर करावी लागल्यास तीही करणे कसे आवश्यक वा महत्त्वाचे असते या सर्वांचा जणू वस्तुपाठच स्वामींनी इथे देऊन ठेवलेला आहे.

एवंच, या अप्रकाशित पत्रांमधून स्वामींचे व्यवहारज्ञान, समाजसन्मुखता, ईश्वरनिष्ठा, सद्गुरु कृपा, सगुण-निर्गुणांचे ऐक्य, नामजपाचे महत्त्व, संसाराचे स्वरूप, त्यात घ्यावयाची दक्षता, श्रमप्रतिष्ठा, उद्योगशीलता, प्रारब्ध, पूर्वसंचित, विद्येचे महत्त्व आणि कर्मसिद्धी इत्यादी विषयांवरील विचार प्रकटले आहेत. प्रत्येक पत्रातून त्यांनी मुख्य विषयासंदर्भात अभंग, ओव्या अथवा अवतरणेही दिलेली आहेत. ती पत्राचा आशय नेमकेपणी उमगण्यास मदतरूप ठरतात.

## ॥ निष्कर्ष ॥

स्वामी स्वरुपानंदांच्या अप्रकाशित पत्रांचा येथवर विचार केल्यानंतर काही निष्कर्श हाती येतात ते असे -

१) चिंचवड येथील सौ. उज्ज्वला गोखले यांच्या सौजन्याने पावस-रत्नागिरी येथील स्वामी स्वरुपानंदांची काही अप्रकाशित पत्रे आम्हास उपलब्ध झाली.

२) या पत्रांचा अभ्यास येथे प्रथमच मांडण्यात आला आहे.

३) स्वामींनी ही पत्रे खामगाव निवासी आपले शिष्य रामभाऊ गोडबोले व त्यांचे बंधू लक्ष्मणराव यांना उद्देशून लिहिली आहेत.

४) या अप्रकाशित पत्रांची संख्या २४ इतकी असून दिनांक व सन जुळवून कालानुक्रमाने त्यांचा विचार केलेला आहे.

५) यापूर्वी श्रीस्वामींच्या पत्रांच्या 'स्वरुप-पत्र-मंजुषा' हा ओवीबद्ध पत्रसंग्रह स्वामी सत्यदेवानंद सरस्वती यांनी संपादित केलेला असून १९५१ ते १९६३ या कालखंडातील पासष्ट उद्बोधक पत्रे त्यात आलेली आहेत. 'पत्रबोध' या १९९५ मध्ये संकलित केलेल्या पत्रांचा संग्रह स्वामी स्वरुपानंद सेवा मंडळाच्या अभ्यास समितीने प्रकाशात आणलेला आहे. तर १९३४ पूर्वी स्वामींनी लिहिलेल्या पत्रांपैकी उपलब्ध पत्रे डॉ. रा. य. परांजपे यांनी आपल्या 'स्वामी स्वरुपानंद : जीवन चरित्र व तत्त्वज्ञान' या ग्रंथात समाविष्ट केलेली आहेत.

६) हाती आलेल्या या पत्रात आरंभी मध्यावर 'जय माताजी' असे लिहिलेले असून काही पत्रे अंतर्देशीय पत्रांप्रमाणे वापरलेली आहेत. त्यावर डाव्या बाजूस 'स्वरुपानंद' मध्ये ॐ आणि पत्राच्या उजव्या कोपऱ्यात मु. पो. पावस, रत्नागिरी असे छापलेले आहे !

७) प्रत्येक पत्रारंभी 'प्रिय श्री. रामभाऊ गोडबोले यांसी हरिचरणपूर्वक अनेक आशिर्वाद विशेष' असा उल्लेख असून पत्रांचा समारोप 'आपला स्वरुपानंद' अथवा 'आपला आत्मतृप्त स्वरुपानंद' अशा सहीने केलेला आहे.

८) पत्रातून नामस्मरण, ईश्वरशरणता, व्यवहारज्ञान, उद्योगनिष्ठता, श्रमप्रतिष्ठा, कार्यप्रवणता, उत्कृष्ट गृहस्थाश्रम, दिनचर्या कशी असावी, सांत्वन, विद्येचे महत्त्व, संसारात घ्यावयाची दक्षता असे विविध विषय आलेले आहेत.

९) या पत्रांतील आशय प्रामुख्याने 'भाव अंतरी यथार्थ । देव देणार समर्थ ।।' अथवा 'जपा हरिनाम जपा हरिनाम । मार्ग हा सुगम वैकुंठीचा ।।' अशा व्यापक स्वरूपाचा आहे. त्याचप्रमाणे ज्याला समंजसपणे संसार करता येणार नाही त्याची परमार्थातही प्रगती होणार नाही अथवा उद्योगाखेरीज, कष्टाखेरीज भाकरी नाही. उद्योगी माणूसच आपले जीवनमान उंचावू शकतो. कुटुंबाचे पोषण करू शकतो आणि परमार्थही साधू शकतो या विचारांनी स्वामींनी साधकास मार्गदर्शन केलेले आहे. उपदेश केलेला आहे आणि त्याचे जीवन उजळून टाकिले आहे.

**डॉ. सौ. सुनीता तांबे**
२, आसावरी, गणेश खिंड रोड,
औंध, पुणे ४११ ००७.

[redacted]

# "स्वरुपवेधी" ज्ञानेश्वरी सारस्तोत्र महिमा

डॉ. सौ. शुभदा शरदचंद्र कोशे

ग्रंथश्रेष्ठ ज्ञानेश्वरीच्या ओव्यांची संख्या ९०३४ असून सर्वच ओव्या रसाळ आहेत. त्यातून जर कोणी अतिशय उत्तम ओव्यांची निवड करा म्हणून सांगितले तर ते काम मात्र अतिशय अवघड आहे. परंतु हे अवघड कामही सोपे करून दाखवले आहे, ते एका सत्पुरुषाने, म्हणजे सर्वांनाच परिचित असलेले क्षेत्र पावस येथील संतश्रेष्ठ परमपूज्य स्वामी स्वरुपानंद यांनी. ज्ञानेश्वरीचे सार म्हणून १०९ ओव्या निवडून त्यांनी त्याचा 'श्री ज्ञानेश्वरी नित्यपाठ' नावाचा एक स्तोत्र-ग्रंथ संकलित केला. त्यांनी ओव्यांची संख्या १०९ च का घेतली असावी ? कारण असेही सांगता येईल की स्वामींनी या ओव्या एकत्रितपणे गुंफून भक्तांसाठी मेरुमणीसह जपमाळच तयार केली ! या १०९ ओव्यांच्या द्वारे साधकांनी नित्य ज्ञानेश्वरीचा जप करावा अशी स्वामींची इच्छा असावी. श्रीमद्भगवद गीतेत 'यज्ञानां जपयज्ञोऽस्मि' असे म्हणून भगवंतानीच जपाचे महत्त्व सांगून ठेवलेले आहे.

कोणत्याही धार्मिक ग्रंथाप्रमाणे या ग्रंथाची सुरुवातही मंगलाचरणाने झालेली आहे. आदितत्त्व-श्रीगणेश-शारदा व सद्गुरु अशा क्रमाने मंगला चरणाची पूर्ण झालेली शृंखला मनमोहक तर आहेच पण भाविकाला नतमस्तक करणारी आहे. वरील सर्व प्रेरणास्त्रोतातून निर्मिती झालेल्या या ग्रंथात आलेली नंतरची ओवी आहे ती आत्मानुभूतिविषयक ! या उपाधिरूप असलेल्या जगतामध्ये सर्वव्यापक असे चैतन्यतत्त्व गूढपणे-गुप्तपणे भरून राहिले आहे. तसेच जे ज्ञानी तत्त्वज्ञ-संत आहेत त्यांनी या तत्त्वाला ओळखून त्याचा स्वीकार केलेला आहे.

चैतन्य रूप आत्मतत्त्वाविषयी सांगून झाल्यावर या जगताविषयी विचार केला आहे. तसेच एकदा या जगतामध्ये जन्म तर प्राप्त झाला आहे, अशा वेळी मनुष्याची वागणूक कशी असावी या विषयीच्या ओव्यांची मांडणी पुढे आली आहे. या जगातील म्हणजे जन्म-मृत्यूच्या फेऱ्यात सापडलेल्या मनुष्याने वागावे तरी कसे ? यासाठी सांगितले आहे ते असे - जर आपण सरळ मार्गाने जाऊ लागलो तर कोणताही अपाय होत नाही. अंधारातून जात असता दिव्याच्या उजेडाचे साह्य घेतल्यास आपण अडखळत नाही. त्याचप्रमाणे मनुष्याच्या जीवनामध्ये 'स्वधर्म' हा त्याचा वाटाड्या आहे. स्वधर्माचे आचरण करून त्यानुसार वर्तन केल्याने सर्व इच्छांची पूर्तता होते. परंतु इच्छापूर्ती झाली तरीही प्रफुल्लित होऊ नये. तसेच दुःख प्राप्त झाले तरी खेद मानू नये. लाभ किंवा हानी, सुख किंवा दुःख या द्वंद्वापासून दूर रहावे. अशा पद्धतीने लाभ-हानी हा विचार दूर सारून जन्म परिस्थिती यांना अनुसरून आपल्या वाट्याला आलेली विहीत कर्मे करीत रहावे. ती करीत असताना सुख-दुःखाचे प्रसंग येणारच. परंतु ते धीरगंभीरपणे सहन करावे. हीच विहीत कर्माची योग्य रीत आहे. हे विहीत कर्म करीत असताना त्यापासून प्राप्त होणाऱ्या फलाविषयी उदासीन रहावे. तसेच निषिद्ध असलेले कर्म विचारपूर्वक टाळले पाहिजे.

वर्ण आणि आश्रम यांच्या परंपरेप्रमाणे प्राप्त झालेल्या कर्माचे आचरण करणे हाच नित्ययज्ञ आहे असे समजावे. कारण यामध्ये पापाला प्रवेश करण्यास संधीच नाही. एवढेच नव्हे तर निष्कामतेने केलेले कर्माचरण साधकाला मोक्षाकडे नेते. या उलट ज्या वेळी प्राणिमात्र या स्वधर्माचरणाचा आणि विहित कर्माचा त्याग करतात त्या वेळी ते बंधनात पडतात. परिणामी जन्ममरण चक्रात अडकतात. हे वर्णविहित कर्म म्हणजेच आपल्या जीवनाच्या कल्याणाचा एकमेव आधार असून त्यानुसार केलेले आचरण ही भगवंताचीच सेवा होय. अशा प्रकारे केलेली ईश्वराची पूजा परमसंतोषदायक होते. या कर्माचा कर्ता 'मी' व याचे फल अमुक असे, असा अभिमान उत्पन्न होऊ देऊ नये. एवढे करूनही फलानुसार प्राप्त होणाऱ्या उपभोगांचा अलिप्त राहून उपभोग घ्यावा.

जसा एक डोळस मनुष्य मागून येणाऱ्या अनेक दृष्टीहीन माणसांना सांभाळून नेत असतो त्याप्रमाणे अज्ञानाच्या अंधकारात चाचपडणाऱ्या अनेकांना मार्गदर्शन करण्याचे काम या जनकादिकांनी केलेले आहे. त्यांनी दाखविलेल्या मार्गावरून अनेक साधक चालून गेले आहेत. कारण सर्वसामान्य माणसे ही अशा प्रकारच्या आदर्श पुरुषांच्या वर्तनाचे अनुकरण करणारी असतात. म्हणून या ज्ञानवंतांनी आपली जबाबदारी ओळखून काळजीपूर्वक वर्तन करावे आणि लोकसंग्रहार्थ कर्मे करीत रहावे. नंतरच्या काही ओव्यांमध्ये वर्णन आले आहे ते ज्ञानी-आत्मज्ञान प्राप्त झालेल्या मनुष्याचे. यासंबंधी वर्णन करताना प्रथम दीपाचा दृष्टान्त दिला आहे. जसे

***दीपाचेनि प्रकाशें । गृहींचे व्यापार जैसे ।***
***देही कर्म जात तैसे । योगयुक्ता ॥१५॥ ज्ञा. ५.४१***

एखाद्या खोलीत दिवा लावला आहे. त्याच्या उजेडामध्ये घरातील लोक निरनिराळे व्यवहार करीत असतात. परंतु तेवणारा दिवा त्या सर्व व्यवहारांपासून पूर्णपणे अलिप्त असतो. त्याचप्रमाणे योगयुक्त-ज्ञानी मनुष्यही कर्म करतो. परंतु अलिप्तपणे. तो त्या कशातही गुंतून जात नाही. म्हणून तो कर्मबंधनात बद्ध होत नाही ! असा जो कर्मामध्ये रत

झालेला आहे त्याचेविषयी सांगताना म्हटले आहे की, त्याला कर्माचरण करताना कोणत्याही प्रकारे खेद होत नाही. ब्रह्मज्ञानी व्यक्तीने ज्ञानाग्नीचे मुखांत आपल्या कर्माची आहुती दिलेली असते. असा श्रेष्ठत्व पावलेला पुरुष म्हणजे मनुष्य रूपाने परब्रह्मच जन्माला आले आहे असे खुशाल समजावे, हेच वैशिष्ट्य आहे ज्ञानाचे ! असे हे श्रेष्ठ ज्ञान प्राप्त करून घ्यावयाचे असेल तर संतांस शरण जावे.

संत श्रेष्ठांची सेवा केली पाहिजे. ती शरीराने, मनाने व जीवाने केली पाहिजे. पूर्णपणे शरणागत आणि गर्वरहित-अहंभाव सोडून देवून संतचरणी लीन होऊन त्यांची चरण सेवा केली पाहिजे. अशा प्रकारच्या सेवेने प्रसन्न झाल्यावर ते प्रसन्न-तृप्त स्थितीत असतानाच त्यांना आपल्याला अपेक्षित असा प्रश्न केला पाहिजे. तो प्रश्न जन्म-मरणाच्या दुःखाने व्याप्त झालेल्या या संसाराची निवृत्ती आणि परमानंदांची प्राप्ती यासंबंधी असावा. म्हणजे ते ज्ञानी संत साधकाला ब्रह्मतैक्य ज्ञानाचा उपदेश करतात. यामुळे शिष्याच्या अंतःकरणात ज्ञानाचा उदय होऊन तो आपली संकल्प-विकल्पात्मक वृत्ती विसरून जातो.

वास्तविक ब्रह्मज्ञान जरी गुरुपदेशामुळे प्राप्त झाले आहे असे वाटले तरी मुळातच ते शिष्याच्या हृदयात नित्यत्वाने असतेच. अर्थात सुप्तावस्थेत किंवा अज्ञानाने झाकलेले असते. त्यावरील अज्ञानाचे आवरण दूर झाले की ते प्रकाशते आणि हेच काम सद्‌गुरु करतात आणि त्या स्वयंप्रकाश अशा ज्ञानाची अनुभूती मिळवून देतात.

मनुष्याचा हा देह पंचमहाभूतापासून निर्माण झालेला असून कर्मबंधनाच्या दोऱ्यात ओवला आहे. त्याला जन्म-मृत्यूच्या बनलेल्या भवचक्रावर घातलेला आहे. तेथे तो चक्राकार फिरतो आहे. हे शरीर कालाग्नीचे तोंडात लोण्याचा गोळा घालावा तसेच घातलेले आहे. ते इतके क्षणभंगुर आहे की माशीला पंख फडफडावयास जेवढा वेळ लागेल तेवढ्याच वेळात ते नाहीसे होते. हा मनुष्य देह जरी अशा प्रकारे या अवस्थेला प्राप्त झाला असला तरी त्याचे ठिकाणी वास करणारा आत्मा मात्र 'नित्य सिद्ध' आणि अनादि असाच आहे. अशा या ब्रह्मतत्त्वाशी साधक एकरूप होतो. पण केव्हा ? तर ज्या वेळी तो दुधातून पाणी विभक्त करणाऱ्या राजहंसाप्रमाणे आत्मानात्मविवेक करून आत्मज्ञानाची प्राप्ती करून घेतो तेव्हाच !

अशा प्रकारे पूर्णत्वास पोहोचलेल्या साधकाच्या-योग्याच्या ठिकाणी माझ्या- ईश्वराच्या गुणगानाविषयीची उत्सुकता, ईश्वराविषयीचे प्रेम, आस्था असेल तर त्याचे कौतुक करावे तेवढे थोडेच आहे.

***जयांचिये वाचे माझे आलाप । दृष्टी भोगी माझे चि रूप ।***
***जयांचे मन संकल्प । माझाचि वाहे ॥९१॥ ज्ञा. ९-४४५.***

यांची वाणी माझ्याच नामाचा उच्चार करते, यांची दृष्टी फक्त मलाच पाहते आणि यांचे मन माझे चिंतन करून, माझ्याच प्राप्तीविषयीचा संकल्प करते. यांचे कान माझ्या गुणानुवादाच्या स्वरांनी भरून गेलेले असतात आणि शरीराचे सर्व अवयव माझी सेवा हेच भूषण मानतात. असे हे माझे भक्त पापयोनीत जन्मले असले तरीही, ते शास्त्र ऐकलेले किंवा शिकलेले नसले तरीही त्यांची माझ्याशी तुलना करता कणभरही कमी पडत नाहीत. कारण शुद्ध आणि निष्कलंक भक्ती हेच माझ्या प्राप्तीचे खरे साधन आहे. प्रेमाने युक्त अशा भक्तीशिवाय असलेली इतर सर्व साधने ही व्यर्थच आहेत. अशा प्रकारे एकरूप झालेल्या भक्ताविषयी भगवंत सांगतात की, 'हा प्राणिमात्र हे नावच विसरतो. सर्व भूते ही परस्परांपासून वेगळी नसून एकमेव भगवंत हाच सर्वत्र भरून राहिला आहे अशी अनुभूती आल्यामुळे तो सर्वांशी निर्वैरपणे वागतो. निर्मत्सर होतो आणि वस्तुमात्रात वास करणाऱ्या ईश्वरास भजतो. हे संपूर्ण विश्व श्रीवासुदेवस्वरूपच आहे, अशी भावपूर्ण प्रचीति त्याला आलेली असते म्हणून सर्व भक्तांमध्ये श्रेष्ठ भक्त तसेच ज्ञानीही तोच म्हणावा लागेल.'

जो काम, क्रोध, लोभ यांचा परिपूर्ण त्याग करून मोकळा होतो तोच एवढ्या व्यापक आत्मलाभाचा स्वामी होतो. आत्मप्राप्ती करून घेण्यास समर्थ होतो. अशा या मुमुक्षूने-मोक्षाची इच्छा करणाऱ्याने 'ॐ तत्सत्' या अक्षरांचा-मंत्राचा उच्चारपूर्वक केलेला विनियोग त्याला या जगातला प्रकाशित करणाऱ्या प्रकाशकाकडे-ब्रह्माकडे नेण्यास समर्थ आहे. या स्तोत्रात भगवंतांनी अर्जुनाला उपदेशिलेल्या गुह्य ज्ञानाचा समावेश झालेला आहे. एका ओवीत गीतेची महती वर्णन केली आहे.

***ते हे मंत्ररहस्य गीता । मेळवी जो माझिया भक्ता ।***
***अनन्य जीवनामाता । बाळका जैसी ॥९९॥ ज्ञा. १८.१५१२***

'ही गीता (गायत्री प्रणवरूपी) मंत्राचे रहस्यस्वरूप आहे. ज्याप्रमाणे जीवनासाठी जे सर्वस्वी मातेवर अवलंबून आहे अशा बालकाची त्याच्या मातेशी गाठ घालून देऊन त्याला जीवन द्यावे, त्याचप्रमाणे जो आदरपूर्वक माझ्या भक्तांची गीतेशी ओळख करून देतो तो देहपातानंतर मद्रूपच होतो - मुक्त होतो' या नंतरच्या तीन ओव्यांत ज्ञानेश्वरांनी मागणी केलेल्या पसायदानाच्या असून शेवटच्या ओवीत म्हटले आहे की -

'सर्वश्रेष्ठ ईश्वराविषयी असलेल्या सद्‌भावाची ओंजळ करून त्यात ही ओवीरूपी मोकळी फुले भरून घेतली आणि ती भगवंताच्या विराट स्वरूपाच्या चरण युगुलावर अर्पण केली आहेत.'

***जैसा निर्वातीचा दिपु । सर्वथा नेणे कंपु ।***
***तैसा स्थीरबुद्धी स्वस्वरूपु । योगयुक्त ॥४३॥***

या स्तोत्राकडे पहाताना असेही जाणवते की पूज्य स्वामींचा काही हेतु असावा. कारण गीतेचा अर्थ, गीतेचे तत्त्वज्ञान, गीतेत आलेल्या विविध संकल्पना या समजाव्यात, सुलभ व्हाव्यात, सर्वसामान्य वाचकांपर्यंत-श्रोत्यांपर्यंत पोहोचाव्यात म्हणूनच ज्ञानेश्वरीची निर्मिती झाली. तोच हेतू समोर ठेवूनच या १०९ ओव्यांची निवड केलेली दिसून येते. म्हणूनच या स्तोत्रातही तत्त्वज्ञानालाच महत्त्व दिलेले आढळून येते. त्यातून पू. स्वामींची गीतेवरील निष्ठा आणि ज्ञानेश्वरी विषयी असलेली आदरयुक्त भक्ती यांचे निश्चित अनुमान करता येते.

हा इवलासा ग्रंथ भक्तीरसाने आणि शांतरसाने ओथंबलेला आहे. याला वैराग्याची किनार लाभली असली तरी ती त्याला शोभूनच दिसते. या स्तोत्रपठणातून मात्र समग्र ज्ञानेश्वरीच्या अभ्यासाने मिळणारी मनःशांती मिळेल हे निश्चित. अशी ही १०८ + १ मेरुमणी असलेली जपमाळ भक्तांनी श्रद्धापूर्वक कंठस्थ करावी.

**डॉ. सौ. शुभदा शरदचंद्र कोशे**
इंदिरा सदन, ४२७ कापड बाजार, पनवेल, जि. रायगड ४१०२०६.

# आठवणी आणि अनुभव

**श्री. बाळकृष्ण गणेश गोडबोले**

*बी. ए. (स्पेशल). अर्थशास्त्र, मुंबई पोर्टट्रस्टमध्ये अधिक्षक पदावरून निवृत्त. स्वामींचे पुतणे.*

१) १९४२ मध्ये पावस येथे मराठी २ री इयत्तेत शिकत होतो. मोठ्या बहिणी वरच्या वर्गात होत्या. ती. अप्पा (स्वामी) घरीच होते. घरातील घड्याळ नादुरुस्त झालं होतं. तेव्हा पू. स्वामींनी सांगितलं की निघायचं आणि आम्ही घड्याळाशिवाय शाळेत वेळेवर पोहचत होतो !

मला वाटतं त्यांच्या डोळ्यासमोर त्यांना घड्याळ दिसे. नंतरही असा अनुभव अनेकांना आला आहे.

२) १९६१ च्या मे महिन्यात आम्ही सर्वजण नेहमीप्रमाणे पावस येथे गेलो होतो. आम्ही तेथे गेलो की, ती. अप्पा, श्री. देसाई यांजकडून आपल्या घरी येत असत आणि आम्हाला त्यांचा खूप सहवास मिळे.

ती. अप्पा म्हणजे कोणी अधिकारी पुरुष आहेत याची जाणीव तोपर्यंत आम्हाला झाली नाही आणि त्यांनीही कधी करून दिली नाही.

रत्नागिरीपासून जवळच केळ्ये गावी द्वारकाआते (म्हणजे पू. स्वामींची बहीण) रहात असे. आम्ही तेथे असताना केळ्ये येथे जाण्याचा बेत ठरला. सायंकाळी श्री. देसाई यांचे घरी गेलो कारण पू. स्वामी पुन्हा तेथे गेले होते. स्वामींना म्हणालो - 'अप्पा, आम्ही सर्वजण उद्या केळ्ये येथे जाणार आहोत.' त्यावर स्वामी म्हणाले, 'उद्या जाता ? पुन्हा केव्हा तरी जा.'

तरीही दुसऱ्या दिवशी केळ्यास जाण्यासाठी निघालोच. गणपती मंदिरापुढे जातो तोच मे महिना असूनही जोराचा पाऊस सुरू झाला. इतका की मंदिरात परतेपर्यंत आम्ही सर्वजण व सामान पूर्ण भिजून गेलो. जवळ जवळ १ तास मुसळधार पाऊस पडला. रस्त्यावर गुडघाभर पाणी. त्या वेळी प्रवासाचा बेत रद्द करून घरी परतलो.

नंतर २ दिवसांनी स्वामी हसत हसत म्हणाले, 'केळ्यास जायचे आहे ना ? उद्या जा.'

तेव्हा लक्षात आलं, की स्वामी जाऊ नका म्हणत असताना आम्ही गेलो. चक्क मे महिन्यात पाऊस पडला आणि बेत रद्द झाला.

तेव्हापासून निश्चय केला की, अप्पा काय म्हणतात ते नीट ऐकायचं आणि त्याप्रमाणे वागायचं !

३) १९६६ च्या ऑगस्ट महिन्यात माझा मुलगा चि. संदीप जन्मानंतर ८ दिवसात अचानक आजारी झाला. नेहमीच्या डॉक्टरांनी मुंबई येथील प्रार्थनासमाज जवळील 'हर किसनदास हॉस्पिटल' मध्ये नेण्याचा सल्ला दिला. तेथे गेल्यावर तेथील डॉक्टर म्हणाले, 'तुम्ही उशीर केलात. आता काही उपयोग नाही.' व प्रवेश देण्याचे नाकारले आणि डॉक्टर निघून गेले.

काय करावे, अशा संभ्रमात असताना अचानक आमच्या समोरून आमच्या ओळखीची नर्स आली. तिला चिठी दाखवल्यावर ती सरळ मुलाला घेऊन आत गेली. सलाईन सुरू केलं आणि त्या वेळचे मुंबईचे प्रख्यात बालरोग तज्ज्ञ श्री. मर्चंट यांना बोलावून घेतलं. ते आल्यावर त्यांनीही तेच सांगितलं. तरीही सलाईन सुरू ठेवलं.

दुसऱ्या दिवशी थोडी सुधारणा वाटल्यामुळे डॉ. मर्चंट यांनी काही औषधे लिहून दिली.

ती चिठी घेऊन मी हॉस्पिटल कंपाऊंडमधील 'नोबल केमिस्ट' कडे गेलो. औषधे घेतली पण पैसे सुटे नव्हते. तेव्हा तो म्हणाला, 'आधी औषधे घेऊन जा, पैसे मग द्या.' नावाप्रमाणे नोबल होते.

हळूहळू प्रकृती सुधारल्यावर डॉ. मर्चंट म्हणाले, 'आता धोका टळला आहे. पण तुमच्या कुटुंबामध्ये कोणी 'मोठा माणूस' (बडा माणस) आहे का? त्याचं काम आहे हे !'

कृतज्ञता व्यक्त करण्यासाठी मी पावस येथे गेलो. तेव्हा तेथील सेवकाने खोलीतून बाहेर येऊन मला विचारले, '××× तुमचा मुलगा आजारी होता का ? काय झालं ?... स्वामी अचानक म्हणाले, 'दरवाजा बंद कर... बाळ मुलाला घेऊन हॉस्पिटलमध्ये गेला आहे. पण त्याला ॲडमिशन मिळत नाहीये.' असं म्हणून ते २ मिनिटे स्तब्ध राहिले. नंतर म्हणाले, 'दरवाजा उघड. त्यांचं काम झालं आहे.'

अशा २ पुराव्यांमुळे स्तंभित अवस्थेतच मी स्वामींच्या खोलीत प्रवेश केला व झाल्या गोष्टी सांगितल्या.

कोणत्याही गोष्टीचे श्रेय आपल्याकडे न घेणारे स्वामी म्हणाले, 'असं होतं कधी कधी. आपण तिकडे फार लक्ष देऊ नये.'

***देखे ऋद्धिसिद्धि तयापरी । आली, गेली ते न करी ।***
***तो विगुंतला असे अंतरी । महासुखीं ॥ ज्ञा. २/३६२.***

**श्री. बाळकृष्ण गणेश गोडबोले**
४, आनंदी शास्त्री हॉल, ग्रँट रोड, मुंबई ४००००७



# स्वामींच्या सहवासात

### श्रीमती सुशीलाबाई रघुनाथ देसाई

*स्वामी स्वरुपानंदांच्या अनुग्रहीत. ४० वर्षे स्वामींची निरलस सेवा.*

मला स्वामी स्वरुपानंदांचा जवळ जवळ चाळीस वर्षे सहवास लाभला. एकोणिसशे चौतीस साली ते आमच्याकडे रहावयास आले. त्या वेळेला मी फक्त पंधरा वर्षांची होते आणि नुकतेच लग्न होऊन देसाई घराण्यात आले होते. ते आमचे घरात अगदी घरच्यासारखे वागायचे. घरातील देवांची पूजा करायचे. त्यांच्या वागण्या-बोलण्यात कुठेही परकेपणा नसायचा. त्यांनी आम्हा तिघी जावा-वन्स यांना भगवद् गीता शिकवली. गीता बरोबर येण्यासाठी शब्दफोड करीत असत. त्यांनी आम्हाला सोऽहम् साधना शिकवली. ते सकाळ-संध्याकाळ अर्धा तास सोऽहम् साधना करायचे. आमच्या सर्व मुला-मुलींचा शाळेचा अभ्यास ते घेऊन शिकवत असत. त्यांना प्रसिद्धी नको होती. म्हणून विशेष लोक त्यांचेकडे येत नसत. ज्याप्रमाणे 'जगा धाकुटे होईजे, तव जवळीक माझी.' त्यांनी कधीही जेवणाला नाव ठेवले नाही. कधी ते रागावले आहेत हे आम्ही बघितले नाही. फोडणीचे व तिखटाचे पदार्थ त्यांनी कधी खाल्ले नाहीत.

माझा मुलगा चि. वसंत हा पुण्याहून आपली गाडी घेऊन पावसला येणार होता. उशीर झाल्यामुळे आम्ही त्याची वाट बघत होतो. काळजी करत होतो. त्या वेळेला स्वामी म्हणाले की, 'तो शेवटच्या गाडीच्या वेळेला येईल.' तो त्या शेवटच्या गाडीच्या वेळेला आल्यामुळे आम्ही त्याला विचारले, 'तुझी गाडी कुठे आहे ?' तेव्हा तो म्हणाला, 'माझी गाडी बिघडल्यामुळे मी शेवटच्या एस. टी. ने आलो.' तेव्हा सर्व खुलासा झाला.

१९६६ साली कोकणात जोराचे वादळ झाले. त्या वेळेला झाडे गोल गोल फिरून घरांवर सर्व ठिकाणी पडत होती. आम्ही सर्व देसाई मंडळी एका खोलीत बसलो होतो. स्वामींना त्या ठिकाणी बोलाविले, पण ते आले नाहीत. ते आपल्या खोलीत एकटे बसून होते. आम्ही सर्व काळजीत होतो. वादळ कमी झाल्यावर आम्ही त्यांचेकडे गेलो. तेव्हा ते एकच वाक्य बोलले, 'दैवी आपत्तीचा विचार करावयाचा नसतो.'

साधना कशी करावी असे आम्ही त्यांना विचारले असता त्यांनी फार चपखल उदाहरण दिले. ते म्हणाले, 'नदीवर गौळणी पायवाटे जाताना डोक्यावर २-३ घागरी, कमरेवर १ घागर अशा त्या जात असतात. पायवाट जरी खाच-खळग्यांची असली व चालताना दुसऱ्या गौळणीशी बोलत असल्या तरी त्यांचे लक्ष पाणी सांडू नये म्हणून घागरीवर असते. तसे प्रपंचात वावरताना सर्व लक्ष अनुसंधानाकडे असावे. जसे 'घार फिरे आकाशी परंतु तिचे लक्ष पिलापाशी'.

चि. वसंताचे लग्न १९६९ साली झाले. पुण्याबाहेरची मुलगी पसंत पडली होती. लग्नासाठी कार्यालयपण ठरविले होते. त्याच वेळेला पुण्याची मुलगीपण बघितली होती. पुण्याबाहेरच्या मुलीच्या काकांना एक असाध्य आजार होता. त्या मुलीच्या बाबतीत असे काही झाले तर म्हणून त्याचे मित्र या संबंधाबाबत विरुद्ध होते. काकांच्या बाबतीत गोष्ट कळण्याच्या आधी स्वामींनी एक चिठ्ठी चि. वसंताला पाठवून पुण्याच्या मुलीशी लग्न करावे, असे लिहिले होते. त्यात कारण काय ते लिहिले नव्हते. लग्न पुण्याच्या मुलीशी झाले.

मी जेव्हा सर्व गीता दररोज वाचणे जमणार नाही असे म्हटले त्या वेळेला स्वामींनी प्रत्येक अध्यायातील एक महत्त्वाचा श्लोक लिहून दिला. ते १८ श्लोक मी अजून म्हणते.

स्वामींच्या ४० वर्षांच्या सहवासात मी कधी दुःखाने त्रासले नाही किंवा चांगल्या गोष्टीने हुरळून गेले नाही. ही पुष्कळशी मानसिक स्थिती स्वामींमुळे झाली असे मला वाटते.

माझा मुलगा चि. श्रीकांत याने स्वामींना स्थितप्रज्ञ कसा असतो असे विचारले असता त्यांनी सांगितले 'तुझ्या आईसारखा'.

**श्रीमती सुशीलाबाई रघुनाथ देसाई**
द्वारा : देसाई बंधू आंबेवाले, शनिपारा जवळ, बाजीराव रस्ता, पुणे.

# अमृत योग

## सौ. यमुताई कुलकर्णी

*कोल्हापूरच्या पद्माराजे गर्ल्स हायस्कूलच्या निवृत्त अध्यापिका. हिंदी साहित्य विशारद, शिक्षक सनद. एस.टी.सी., सी.पी.एड. अधून-मधून मासिकांतून लेखन. सांगते निरोप, आनंदसागर स्वामी स्वरूपानंद, श्रीज्ञानेश्वरी नित्यपाठ चिंतन ही छोटी पुस्तके प्रकाशित. ''सद्गुरुकृपांकित'' ही जीवन सफल करणारी सर्वोच्च पदवी.*

वैभव योग, भाग्य योग, सन्मान योग यांनी जीवन संपन्न व्हावं म्हणून मनुष्य, मानव धडपडत असतो. अपरंपार कष्ट उपसत राहतो. काही काळ जीवन कृतार्थ झाल्याची निसटती जाणीवही होते. तोच जीवनपात्र भरले नाही, खूप काही उणीव आहे, या जाणिवेने तो अस्वस्थ होतो. त्यासाठी सद्गुरुकृपेचा अमृतयोग यावा लागतो. मग रितेपण सरते. जीवन आनंदाने भरून ओसंडते. सर्वत्र एका चैतन्याचे दर्शन घडते. मग उणीवच सरते.

हा अमृतयोग कसा येतो ? जीवाच्या प्रयत्नाने की, भगवंताच्या अहैतुक कृपेने ? मला वाटतं भगवंताची अहैतुक कृपा कधी कधी बरसू लागते. त्यामुळे आमच्यासारख्या सामान्य आर्त जीवांना त्या कृपेत चिंब होण्याचा दुर्लभ योग लाभतो. भगवान गोपाळ कृष्णाच्या सवंगड्यांना असाच भगवत् कृपेचा प्रसाद लाभला. भोळ्या-भाबड्या गोप-गोपिका, पेंद्या, कुब्जा सारे सारे जीवनमुक्त झाले. ज्ञानदेवांनी असेच कृपाछत्र धरले. बंका, गोरा, सेना, चोखा, नामा सगळे आत्मानंदांत रंगून गेले.

हा सर्वोच्च निरूपाधिक आनंद केवळ संतकृपेने, सद्गुरु कृपेनेच मिळू शकतो. त्यासाठी जमेल तेवढं नामस्मरण, सद्ग्रंथांचे वाचन करीत दोन पावलं पुढं टाकल्याने भगवंत दहा पावले पुढे येऊन गुरुरूपाने कृपा करत असतो. माझ्या जीवनात गुरुकृपेचा अमृतयोग असाच विलक्षण योगायोगाने आला.

### थोडी पार्श्वभूमी

लहानपणी थोडं समजायला लागल्यापासून संत चरित्र वाचावं, स्तोत्रपाठ करावा, नामस्मरण करावं असं मला नेहमी वाटे. घरचं वातावरण ईश्वर भक्तीने भारलेले होते. भागवत, योगवासिष्ठ यांचं वाचन आणि विवरण पूज्य पिताजी (ज्ञानेश्वरभक्त अप्पासाहेब कुलकर्णी) आणि आजोबा यांच्यात चालत असे. विशेष काही समजत नव्हतं. तरी ऐकत रहावं असं वाटे. थोडं संस्कृत समजू लागल्यावर ही गोडी वाढतच गेली. कथा-कीर्तनांत सद्गुरु महिमा ऐकत होते. एकदा वडील म्हणाले, ''सद्गुरुला परिसाची उपमासुद्धा कमीच पडते. अगं, परिस लोखंडाचं सोनं करतो, पण लोखंडाला परीस बनवू शकत नाही. सद्गुरु मात्र शिष्याला आपलं गुरुत्वच प्रदान करतात. त्यासाठी नामाची कास धरून जीवन मार्गावर चालत राहणं इतकंच आपलं काम.''

एवढाच भक्तीचा वारसा घेऊन मी माझ्या गृहस्थाश्रमात धीरानं चालत होते. प्रतिकूल प्रकृती, आर्थिक अडचण, प्रपंच चालवताना जीव मेटाकुटीला येत होता. शाळेतली नोकरी, मुलांचे शिक्षण यात सर्व दिवस जायचा. कधी मन उदास होई, हेच का जीवन ? सद्गुरुकृपेनं जीवन कृतार्थ होतं म्हणतात, ती कृतार्थता, ती धन्यता या आयुष्यात नाहीच का लाभणार ? या विचारांची वर्तुळं मन बेचैन करीत होती.

एक दिवस माझी धाकटी बहीण सुशीला दिवाण आणि तिचे मिस्टर राजाभाऊ दिवाण घरी आले आणि माझ्या मिस्टरांना म्हणाले, 'यमुताईना एकदा फक्त पावसला पाठवा. इतर कुठंही जाणं झालं नाही तरी चालेल.' पंधरा दिवसांपूर्वी स्वामी स्वरूपानंदांच्या जीवनावर निघालेला दीपलक्ष्मीचा अंक (१९६९) पाहिला होता. तो पाहून पिताजींचे शब्द आठवत होते. 'कोकणात एक विदेही परमहंस आहेत. त्यांचं अंतरी सामर्थ्य अगाध आहे.' मी मनातल्या मनात हरखून गेले होते.

### मूर्तिमंत भगवंत पाहिला

चार-आठ दिवस गेले. एक दिवस एक गृहस्थ अकस्मात रत्नागिरीची दोन तिकिटे घेऊन आले. त्यांचे काही अडचणीमुळे जाणे राहिले होते. हे रत्नागिरीला परीक्षक म्हणून जातात हे माहीत असल्यामुळे ते आले असावेत. मी न राहून यांना विचारलं, ''मी पावसला जाऊन येऊ का ?'' कसं कोण जाणे हे 'हो' म्हणाले. माझ्या जीवनात पुण्यपर्वणी आली. मोठ्या मुलाला घेऊन मी पावसला आले. भाऊ देसाईच्या अनंत निवासात खोलीत दर्शनाला बोलवलं तर क्षणभर काहीच समजेना. गादीवर रामकृष्ण परमहंस आसनस्थ दिसले. तो भास होता का ? लगेच गौरकाय तेजोमय स्वामींचे दर्शन झाले. डोळे झरझर वाहू लागले. शब्दांचे तर कामच सरले. स्वामींनीच हात जोडले. मृदु पायांवर झुकले. पण मस्तक नाही टेकले. प्रपंच विचारांनी भरलेले हे मस्तक टेकण्याचे साहसच नाही झाले. भाग्य आले; पण हुकले. ही हुरहुर घेऊन बाहेर आले. 'यमुताई, पुन्हा चारला बोलवतो.' असं स्वामी म्हणाले. माझं नाव स्वामींना कसं माहीत ? मी वेडी स्वतःलाच विचारत होते. मुंगीचेही मनोगत जाणणाऱ्या परमहंसांच्या चरणाशी मी आले आहे, याचं ज्ञान कुठं होतं मला ?

### दिव्यानुभूती

चार वाजता पुन्हा खोलीच्या दाराशी जाताच मनात विचार आला,

'रामकृष्णांनी विवेकानंदांना केवळ स्पर्शाने समाधीसुख प्राप्त केले. आज कुठे असेल का हे सामर्थ्य ? ''यमूताई बसा.'' स्वामी म्हणाले. आत्मप्रभा पुस्तकातल्या दासबोधातल्या सतराव्या दशकातला अजपाजपाचा पाचवा समास वाचायला सांगितला. जरा अभ्यास घेतो म्हणाले. एकदम जणू आनंद लहरी सुरू झाल्या. डोळे आपोआप मिटले. आपल्या अंतरी सोऽहम् स्वर सुरू झाला. किती वेळ गेला माहीत नाही. एकदम सारे थांबले. मला सर्व आले, असं वाटू लागलं होतं. ते मी काहीच करत नव्हते हे कळले. काही कळत नाही हे मुख्य कळले. मी खोलीत किती वेळ होते. ती आनंदमयता किती वेळ होती, ते काही स्मरणात नाही.

पुन्हा संध्याकाळी सहाला मंडळी ओळीत खोलीत दर्शनाला जात होती. मी ही आत गेले. सर्वमंडळी गादीवरच डोके टेकून प्रसाद घेत होती. मी ही डोके टेकले. ''मुलगा कुठे आहे ?'' स्वामींनी विचारले. तो मंडपात दिसेना. मी गोंधळून गेले. बाबा देसाई जवळ येत म्हणाले, ''यमूताई मुलाला घेऊन लवकर दर्शन घ्या. दरवाजा पुन्हा थोडावेळ बंद होईल.'' माझा मुलगा विकास नदीकडे सहज गेला होता. तो येताना दिसला. त्याला घेऊन दर्शन झाले. त्याच्या हातात स्वामींनी नित्यपाठ देऊन पान उघडायला सांगितले. ती ओवी वाचायला सांगितली. ती ओवी होती,

***''जैसा निर्वातीचा दीपू सर्वथा नेणे कंपू***
***तैसा स्थिर बुद्धी स्वस्वरूपी योगयुक्त ॥''***

त्या ओवीच्या खाली 'स्वरूपानंद' लिहून त्याला म्हणाले, ''बाळ, रोज ही ओवी वाचायची बरं.'' त्या वरदायिनी शब्दांचे सामर्थ्य काय सांगू ! हळुहळु त्याचा राग, हट्ट सर्व काही मावळू लागलं. त्याचं त्यालाच नवल वाटू लागलं. ती ओवी वाचली नाही तर त्याला बेचैन होई.

मी पावसहून आले. नित्यक्रम सुरू झाला. पण ते दिव्यदर्शन, ती निरामय शांतावस्था यातून मन बाहेर पडत नव्हतं.

पुन्हा इचलकरंजीला वडिलांना सर्व हकिगत सांगितली. ते विलक्षण समाधानाने म्हणाले, 'अगं, हा तुला महद्‌भाग्यामुळे अनुग्रह मिळाला आहे. तू जाऊन पुन्हा समजून घे.'

पुढे प्रत्येक भेटीत सद्‌गुरुंनी सोऽहम् ध्यानाचा अभ्यास करवून घेतला. सद्‌गुरु माहेरी आनंदाची शिदोरी मिळतच राहिली.

## मागे पुढे सांभाळीतो

माहेरी जायला अडथळा न व्हावा यासाठी सासरची अनुकूलता लागते ना ? यांना अनुग्रह मिळावा म्हणून मी मनोमन स्वामींची प्रार्थना करीत होते. दर्शन घेत असताना स्वामी म्हणाले, ''यमूताई, हळुहळु सर्व मंडळी येतील.'' माझे डोळे भरून आले. १९७० साली रत्नागिरीला प्रॅक्टिकलचे परीक्षक म्हणून हे आले होते. संध्याकाळी पावसला आले. मी खाली मंडपात नव्हते. ते आल्याचेही समजले नाही. खोलीत दर्शनाला गेले तेव्हा स्वामी मोठ्या आवाजात यांना म्हणाले, ''तुम्ही अनुग्रह घ्यावा, असं यमुताईना वाटतं.'' ''मला पण हवा आहे पण विचारावं कसं हे कळेना.'' दुसरे दिवशी आठला यांना कृपाप्रसाद झाला. त्या प्रसन्नतेत मन पावसलाच रेंगाळू लागलं. पावसला थांबावसं वाटू लागलं. लगेच खोलीतून निरोप आला. ''प्रोफेसर साहेबांना लगेच रत्नागिरीला परीक्षेच्या ठिकाणी निघा म्हणावं. वरून पूर्णगडची गाडी येत आहे. इथं थांबू नका.'' हे रत्नागिरीला गेले. दुसरे परीक्षक आलेले नव्हते. हे पोचले नसते तर केवढा गोंधळ झाला असता. संध्याकाळी परत आले. मागे-पुढे सद्‌गुरु असे सांभाळतात या पहिल्या दिवशीच्याच अनुभवाने ते थक्क झाले. रात्री यांनी मला विचारलं, ''काल स्वामी मोठ्या आवाजात बोलले. आज इतके हळूवार आवाजात का बोलत होते ?'' ''स्वामी नेहमी अगदी हळुवारच बोलतात. तुमच्यासाठी तो चमत्कार सहज झाला असेल.'' मी म्हटलं.

## साधुसंत येती घरा । तोचि दिवाळी दसरा

सद्‌गुरु चरणी मस्तक झुकले तरी न टेकले, या आठवणीनं मन खूप बेचैन होई. हे निवेदन एका पत्रातून करताच ''खडावा घेऊन यावे. पायांत घालून देईन. सर्वांनाच मस्तक ठेवता येईल' असा निरोप मिळाला. दुसरे दिवशी संध्याकाळी अंबाबाईच्या मंदिरात एका ओळखीच्या दुकानात खडावा कुठे मिळतील म्हणून मी चौकशी करत होते. समोरून एक मनुष्य आला आणि म्हणाला, ''ताई, मी करतो खडावा. दोन दिवसांत आणून देतो.'' मी साधारण पत्ता सांगितला. त्याचं नाव, पत्ता काही विचारलंच नाही. तो झरकन निघूनही गेला.

त्याच वेळी ज्येष्ठ गुरुबंधू शांताराम बापू जामसांडेकर यांचा निरोप आला. 'चांदीच्या छोट्या पादुका घेऊन जा. हस्तस्पर्श करून आणा.'

दिवाळीचे दिवस. पाडवा झाला. खडावा घेऊन तो मनुष्य आला नाही. भाऊबिजेच्या दुसऱ्या दिवशी आम्ही सर्व कुटुंबीय मंडळी निघणार होतो. मनाची घालमेल सुरू झाली. भाऊबीजेची रात्र झाली. दहा वाजले. दारावर थाप पडली. दार उघडलं. खडावा घेऊन तो मनुष्य आत आला. त्यानं किंमत सांगितली नाही. आनंदाच्या भरात मी काही विचारलंच नाही. तो मुळी थांबलाच नाही. त्याला काहीतरी मी दिलं की नाही ते आठवतंच नाही. पत्ता, नाव काही काही विचारलं नाही.

दुसरे दिवशी सकाळच्या एस्. टी. ने आम्ही सर्व कुटुंबीय मंडळी पावसला निघालो. एस.टी.त मनात विचार येत होता. पावसला तशी भक्तांची गर्दी नाही. कसला थाटमाट नाही. मठ नाही, महाराजपण नाही. दहा बाय दहाच्या खोलीत साक्षात् ब्रह्मदर्शन आहे. पण हे सर्वांना कसे उमगेल ? त्यासाठी सद्‌गुरु काही किमया करतील का ? गंमत म्हणजे त्याच दिवशी गोव्याचे मुख्यमंत्री बांदोडकर येऊन गेले होते. गर्दी होती. माळा वगैरे थोडी सजावट होती. सर्व कुटुंब परिवारातील मंडळी तो देखावा पाहून खुश झालेली दिसली.

सद्‌गुरुपदस्पर्शित्व पादुका सकाळी मिळणार होत्या. त्या स्वामींनी बारा वाजता द्याव्यात, असं मला वाटलं होतं. लवकर दिल्या तर बरं, असं घरची मंडळी आपसात बोलत होती. बारा वाजता रामकृष्णांच्या दर्शनाची आठवण झाली. ''पादुका केव्हा देणे सोयीचे आहे ?'' असा

स्वामींचा निरोप आला अन् सर्वांनी एकदम सांगितलं, "स्वामी सांगतील ते सर्व सोयीचे आहे."

आम्हा उभयतांना समोर बाकावर बसायला सांगितलं. बाहेर पडवीत सर्व खुर्च्यांवर बसले होते. या महान भाग्याने मी आनंदाने मोहरून गेले होते. डोळे भरून आले. थोडा वेळ काही समजलेच नाही. स्वामींनी खडावा हातात घेतल्या. यांनी हात पुढे केले. त्यांच्या हातात दिल्या. मी पहातच राहिले.

लगेच चांदीच्या छोट्या पादुका हृदयाशी धरून माझ्या हातात दिल्या. सारं काही भरून पावले.

स्वामी यांना म्हणाले, "यमूताईंच्या भक्तीकडे पहा." खरंच माझ्याजवळ भक्तीशिवाय दुसरं काही नाही हे फक्त सद्‌गुरुच जाणत होते. स्वामींनी एकदा पत्रात लिहिले होते, 'भावबळे देव आपुलासा केला। कृपाळू तो भला सांभाळितो' त्या दोन ओळी म्हणजे भगवत्‌कृपेचे आश्वासन होतं. ते अमोल शब्द अंतःकरणात पुन्हा पुन्हा उठत राहतात. हरघडी प्रचीती येत राहते. हा सुवर्ण दिवस म्हणजे कार्तिक शुद्ध विनायकी चतुर्थी. या पादुका म्हणजे आमच्या जीवनातली शाश्वत दौलत आहे. त्या दिवशी आमची दिवाळी परिपूर्ण होते. अनेक भक्त येतात. दर्शन घेऊन जणु सद्‌गुरुंचं कृपाछत्र अनुभवतात. भक्तीपंथाचे पथिक बनतात. असा नवलाव मी पहातच राहते. पावसची वारी त्यांच्या कृपेने होत राहते. 'सोऽहम्' भावात राहता न राहता सः घ एकच राहतो. अहम् केव्हाच विरून जातो.

सद्‌गुरुंच्या कृपा प्रसादाच्या किती कथा कथन करू ! सगळ्याच स्मृती गर्दी करताहेत. त्यांना म्हटलं, "थांबा हं पुन्हा केव्हातरी घेऊन जाईन भक्त मेळ्यात."

### आपत्तीचे निमित्त करून

***विपदो नैव विपदः, संपदो नैव संपदः ।***
***विपद् विस्मरणं विष्णोः संपन्नारायण स्मृतिः ॥***

असं एक सुभाषित आहे. भगवंताचं विस्मरण म्हणजे विपत्ती. स्मरण म्हणजे संपत्ती. पण हे कळतं कुठं माणसाला ? माझी मधली बहीण कमल तारे मलकापुरला असते. पावस मार्गावरच मलकापूर आहे. 'मलकापुरच्या बहिणीला घेऊन नाही आला ?' एकदा स्वामींनी विचारलं. मी घेऊन येते म्हटलं. तिच्या घरी त्या दृष्टीने अनुकूल वातावरण नव्हतं. साधुसंतांच्या दर्शनाने संसाराकडे दुर्लक्ष होतं असा गैरसमज त्यांच्या घरी होता.

१९७२ साली श्रावण महिन्यात एक दिवस स्टो भडकून मोठा अपघात झाला. फार मोठ्या प्रमाणात ती भाजली. मी मलकापुरला गेले. दवाखान्याच्या दारातच तिचे मिस्टर उभे होते. ते कळवळून म्हणाले, 'काहीही करून ती बरी होऊ दे. तुम्ही सांगाल ते मी करीन.' ते असं का म्हणतात ते कळेना. पावसला जाण्याला त्यांनी विरोध केला होता आणि मी आग्रह केला होता, त्याची त्यांना आठवण झाली. आतून उर्मी आली. मी बोलून गेले. 'तिला बरं वाटल्यावर पावसला स्वामींच्या दर्शनाला पाठवा.' ते एकदम कबूल झाले.

कोल्हापुरला दवाखान्यात एक महिना त्या भयानक वेदना, यातना ती सहन करीत होती. एक दिवस पहाटे ती जागी झाल्यासारखं वाटलं. आपल्याशीच बोलत होती, 'स्वामी तुम्ही कसे आलात ? मी काय लावू? पावशी आंबा लावू ?" पाय झाडला अन् ती जागी झाली. शरीर यातनातही ती विलक्षण प्रसन्न होती. बरी झाल्यावर ती पावसला लगेच गेली. त्याच भेटीत सद्‌गुरुंनी अनुग्रह दिला. आम्ही तिघीही बहिणी त्यांच्या कृपाछत्राखाली विसावलो आहोत.

मधले अनेक छोटे-मोठे अनुभव सांगत नाही. सर्व घर-परिवार सद्‌गुरुंच्या कृपाछत्राखाली स्थिरावला होता. स्वामी समाधी घेणार अशी वार्ता आली होती. मन गलबलून गेलं होतं. १९७४ च्या जुलै महिन्यात स्वामी काही भक्तांची आठवण काढताहेत, असा पावसहून निरोप आला. भक्तांना देवाची आठवण होते, ते भक्त भाग्यवान असतातच, पण देवच जेव्हा भक्तांची आठवण काढतो तेव्हा भक्तांच्या भाग्याला उपमाच रहात नाही.

कोल्हापूरहून स्वामींचे प्राणशिष्य यति सत्यदेवानंद सरस्वती, शांताराम बापू, त्यांचे बंधु बापूसाहेब, अण्णा गोडबोले, मी आम्ही सर्व रात्रीच टॅक्सी करून निघालो. दर्शन झालं. 'यमूताई तुम्ही रहा.' असं इतर मंडळी म्हणत होती. स्वामींचा निरोप आला. 'उद्याला शाळा आहे. जामसांडेकर बंधूंच्या बरोबर यमूताईंना निघायला हवं.' आपल्या कर्तव्यात कसूर केलेले स्वामींना पसंत नसे. जड अंतःकरणाने परतताना मनोमनी इतकंच विनवलं, 'मायबापा, सांगितल्यावाचून जाऊ नका. मी काही करून धावत येईन.'

### - सांगितले, पण समजले नाही.

१५ ऑगस्ट १९७४ ची पहाट. मी गोड स्वप्न पहात आहे, असं मला वाटत होतं. स्वामींच्या खोलीसमोर खूप गर्दी होती. त्या गर्दीतच मी उभी होते. इतक्यात आत्याबाई आल्या. त्यांनी माझ्या हातात मोठी पितळी पणती दिली. 'खोलीत दिवा ठेवून ये.' असं त्या म्हणाल्या. खोलीतलं काम मिळालं म्हणून मी हर्षून गेले होते.

सकाळी आठला शाळेत सांस्कृतिक कार्यक्रम सुरू झाले. एकदम पहाटेचं दृश्य आठवलं. मग त्याचा अर्थ जाणवू लागला. दिवा, गर्दी याचा अर्थ या काय सूचना असतील ? प्रसन्नता मावळून गेली. नऊला घरी आले. हृदयाचा थरकाप करणारी वार्ता आली होती.'स्वामींनी देह ठेवला. कुणीही शोक करायचा नाही.' समाधी सोहळा झाला. परतून खोलीत कोणी नाही असं पाहून मी आत गेले. ती तेवती पणती पाहून मी थक्क झाले. डोळे पाझरू लागले. देह ठेवला आहे. स्वामी आहेतच. पुन्हा पुन्हा हाच विचार धीर देत होता.

१९७५ च्या ऑगस्ट महिन्यात स्वामींच्या पुण्यतिथीला बरेच भक्त जमले होते. दुसऱ्या दिवशी माझे धाकटे बंधू लक्ष्मणराव समाधीजवळ अभंग ज्ञानेश्वरीचा अकरावा अध्याय वाचताना तन्मय झाले होते. त्या वेळी समाधीवर नुसती झोपडीच होती. ती काढण्यासाठी

बाहेरून कामकरी ती उचलण्याची खटपट करीत होते. आत कोणी बसले आहे, याची कल्पनाच त्यांना नव्हती. अकस्मात् झोपडीची मधली तुळई पडली. ती झोपडी खालीच आली.

ती लाकडी तुळई लक्ष्मणरावाच्या पाठीवर जबरदस्त जोरात पडली. भयंकर कळा आणि यातना. फक्त एक फिरण दिसत होता. तिथून हात बाहेर काढला. 'वाचत होतास म्हणून वाचलास' हा विचार सारखा उसळी मारत होता. हात दिसताच लोक धावले. धावाधाव सुरू झाली. त्याला बाहेर काढलं. शरीराची थोडी जरी हालचाल झाली तरी असह्य यातना होत होत्या. टॅक्सीनं कोल्हापूरला आणलं. मिरजेचे मिशन हॉस्पिटल गाठावं लागलं. तिथे स्वामींचे भक्त असलेले डॉ. घाटे होते. त्यांनी खूप धीर दिला. कदाचित् कमरेपासून खालचा भाग संवेदनारहित होईल अशी भीती होती. सर्वच मंडळी चिंताग्रस्त होती. फार मोठ्या दिव्यातून तो बरा झाला. स्वामींच्या फोटोकडे पहात तो सर्व सोसत होता. मात्र भेटायला येणाऱ्या मंडळींना त्याच्या चेहऱ्यावर विषादीची रेषा दिसली नाही. स्वामीच त्याला नामस्मरणात रंगवीत होते. तो जिवावरच्या संकटात सापडला पण स्वामींच्या कृपेनं त्यांच्या सेवेसाठी नव्या उभारीनं उभा राहिला.

समाधीजवळ बसलं की विचार येतो ही संजीवनी समाधी म्हणजे समाज पुरुषाचं हृदय आहे. अशुद्ध विचार, मलीन विचार प्रवाह इथे कितीतरी येतच राहतात अन् ते स्वच्छ-शुद्ध करून पुरवायचं कार्य इथे अखंड चालूच आहे.

***जैसे तवंचि वहाळ वोहळ । जवं न पवती गंगाजळ ।***
***मग होऊन ठाकती केवळ । गंगारूप ॥७३॥***

आपला जीवनप्रवाह निर्मळ नी विशाल करून घ्यायला कुणीही यावं नी धन्य व्हावं.

**सौ. यमुनाताई कुलकर्णी**
संतमेळा, इंद्रायणी सोसायटी, के.जी.पी. समोर,
शांतीनगर परिसर, उचगांव - कोल्हापूर ४१६०१२.



[redacted]



# प. पू. स्वामी स्वरुपानंदांच्या आठवणी

**योगिनी ताडे**

*स्वामी स्वरुपानंदांच्या अनुग्रहित. ज्ञानेश्वरी, भागवत, गीता यांचेवर प्रवचने.*

योगिनी (सुमन) नरहर ताडे यांनी कथन केलेल्या आठवणी आम्ही त्यांच्याच शब्दांत शब्दांकित करण्याचा प्रयत्न केला आहे. त्या प. पू. स्वामींच्या सहवासात जवळ जवळ ६ वर्षे राहिल्या होत्या. त्या वेळच्या त्यांच्या सहवासातील आठवणी त्यांनी आम्हाला सांगितल्या.

"मी १९६८ साली एका सत्पुरुषांचे दर्शन घ्यायचे म्हणून पावसला त्यांना भेटायला गेले होते. त्या वेळी सेवेकऱ्यांनी सांगितले की, स्वामी आजारी असून ते कोणालाही भेटणार नाहीत अगर ते कोणाशीही बोलणार नाहीत. माझ्या मनात आले हे कसले सत्पुरुष ! यांचा स्वतःचा देह स्वतःच्या स्वाधीन नाही. माझ्या मनातील हा विकल्प जाणूनच की काय श्री. बाबा देसाई यांनी सांगितले की, दुसऱ्या दिवशी दर्शनाला या. प. पू. स्वामींच्या दर्शनाला मी दुसऱ्या दिवशी गेले असता स्वामींनी त्यांच्या नेहमीच्या पद्धतीप्रमाणे केव्हा निघालात ? कोठून आलात ? प्रवासात काही त्रास तर झाला नाही ना ? असे प्रश्न न विचारता ते एकदम म्हणाले की, 'हा देह (स्वामींचा) १९३४ सालीच जाणार होता. परंतु माऊलीची इच्छा की या देहाकडून अजूनही काही कामे व्हावयाची आहेत. माऊलीची इच्छा असेल तेव्हाच हा देह जाईल.' त्यानंतर त्यांनी माझी माहिती त्यांच्या पद्धतीप्रमाणे विचारली. या पहिल्या भेटीतच त्यांनी माझ्या मनात आलेल्या शंकेचे निरसन केले व देहबुद्धिमध्ये वावरणाऱ्या माझ्या मनाला सावरले."

"प. पू. माधवनाथांच्या बरोबर मी १९७० साली स्वामींचा अनुग्रह घेणेसाठी म्हणून पावसला गेले. स्वामी माधवनाथांनी सांगितले की, तुम्ही योग करता हे त्यांना सांगू नका. ते ओळखतील व त्यांना योग्य वाटल्यास ते तुम्हाला अनुग्रह देतील. प. पू. स्वामी स्वरुपानंदांनी पहिला प्रश्न विचारला की, 'प्राणायाम करता का ? तिन्ही बंध येतात का ?' मी हो म्हणून सांगितल्यावर ते म्हणाले, 'हा तर हटयोग आहे. पण आपला राजयोग आहे. इथेच स्वामी व मी यांतील द्वैतभाव संपला आणि त्यांनी अनुग्रह पण दिला. साधनेची प्रक्रिया सांगितली. अनुसंधान कसे ठेवावे हे सांगत असताना त्यांनी खुलासा केला की, 'उठल्याबरोबर हे विश्व ज्याने निर्माण केले त्याचा विचार करावा. आपल्या पुढे चहा आला की त्याच्याच कृपेने हा चहा आपल्याला मिळाला आहे व पोटात गेला की त्याच्याच कृपेने हा पोटात पण गेला आहे हे लक्षात ठेवावे. मला हे खूप सोपे आहे असे वाटले. परंतु ते म्हणाले, हे फक्त चहापुरतेच मर्यादित नाही तर दिवसभर कोणतेही कर्म करीत असताना हाच भाव ठेवावा."

"मी प्रवचने करीत असे. अरण्येश्वराच्या मंदिरातील एका प्रवचनामध्ये मला रु. ५००/- मिळाले. त्या वेळी ती रक्कम खूप मोठी वाटली. माझ्या मनात आले की, स्वामींसाठी आपण काहीतरी घेऊन जावे. त्याप्रमाणे स्वामींसाठी बंडी, धोतर, रुमाल वगैरे घेऊन ते सर्व स्वामी माधवनाथांना दाखविले. त्यावर माधवनाथ म्हणाले, 'तू हे सर्व घेतलेस बरे झाले. आता स्वामी तुला काय देतात ते पाहू या. त्यावर मी म्हणाले, स्वामीजी मला पितृसमान आहेत. माझी त्यांच्याकडून काहीही अपेक्षा नाही. हे सर्व साहित्य घेऊन पावसला गेले व स्वामींना त्याचा स्वीकार करण्याची विनंती केली. त्यावर ते म्हणाले, आपल्याला किती पैसे मिळाले ? मी अंदाजाने रक्कम सांगितली. स्वामी म्हणाले, अदमास पंचे नकोत. आपण बाळासाहेबांच्याकडे रहाता (स्वामी माधवनाथ) ते आपणाला पितृसमान आहेत. वडिलांचे विषयी आपले काही कर्तव्य म्हणून त्यांना काही घेतलेत किंवा नाही. मी हो म्हणून सांगितलेवर त्यांनी पावती बघावयास मागितली. उद्देश हाच की त्यांच्याच दुकानातून घेऊन त्यांना दिले तर नाहीना. खर्च करून पैसे किती उरले आहेत असे त्यांनी विचारताच मी रक्कम सांगितली. मला असे वाटले होते की, ते म्हणतील याचे तुला तू काहीतरी घे. पण त्यांनी त्या पैशातून फुले, उदबत्त्या इत्यादी पूजेचे सामान आणण्यास सांगितले. मी खट्टू झाले. पण उमजले की ते आपली देहासक्ती कमी करीत आहेत."

"एकदा पावस येथे रहात असताना दोन-चार महिने झाले. नंतर मी जाण्याची परवानगी मागितली, त्यावर ते म्हणाले 'भाऊंची (देसाई) साठी शांत आहे त्यासाठी रहावे.' त्यावर मी म्हणाले की, भाऊंच्या साठी शांतीसाठी मी राहण्याची काय गरज आहे ? यावर त्यांनी सांगितले 'भाऊंची बहिण, आत्याबाई या तुम्हाला बरोबर घेतल्याशिवाय एकही दिवस जेवत नाहीत. त्याचे स्मरण ठेवून त्यांच्या ऋणातून मुक्त होण्यासाठी तरी साठीशांतीच्या वेळी ती. भाऊ व आत्याबाई यांना आहेर करावा. पैसे नसल्यास मी देईन. प्रवचनातून मिळणाऱ्या पैशातून त्याची परतफेड करावी. व्यवहाराला नेहमी चोख असावे. आहेर आणण्यासाठी मी रत्नागिरीला गेले. बरोबर शरद पंडित होता. आहेराबरोबर चि. शरदसाठी शर्टाचे कापड घेऊन तो तिथेच शिवायला टाकला. परतल्यावर स्वामींनी विचारले, 'शरद तुमच्या बरोबर होता. त्याला काही घेतलेत का ? दुसऱ्याचे अंतःकरण जाणण्याची त्यांची शक्ती अशा प्रकारे नेहमीच्या व्यवहारातून स्पष्ट होत असे."

"वरील प्रसंगानंतर माझे पावस येथील वास्तव्य आणखी ३-४ महिने लांबले. या काळात मी अंगण झाडणे, त्यांचे कपडे धुणे, आत्याबाईंनी परवानगी दिल्यास स्वामींचे जेवण घेऊन जाणे इत्यादी कामे सेवा म्हणून करीत असे. कपडे वाळत टाकताना येणारा झटकण्याचा आवाज त्यांच्या कानांवर पडत असे. एक दिवस ते म्हणाले, 'हवेत जीवाणू असतात. त्यांचे जीवन व उपाधी अत्यल्प असते. चैतन्याने नटलेल्या वागडणाऱ्या त्या जीवांना त्रास होईल, असे काही करू नये आणि त्यांनी श्लोक म्हटला,

***कमळावरी भ्रमर । पाय ठेवी हळुवार । कुंचवेल केशर । इ. ये. शंके ॥***

निसर्गातील इतक्या बारीक-सारीक जीवाणूंच्या जीवाचा त्यांनी केलेला विचार त्यांच्या मनाची कोमलता दर्शवितो.

"दत्त जयंतीच्या दिवशी स्वामींच्या दर्शनासाठी जात असताना मध्येच सेवेकऱ्यांनी दार लावून घेतले. मला राग आला. मी म्हणाले, अप्पांनीच मला बोलावले आहे. पंढरपूरच्या बडव्यासारखा मध्ये येऊ नकोस. पुढे ४ दिवसांनी त्यांच्या दर्शनाला परत गेले असता स्वामींनी विचारले आपल्या जीवनाचे ध्येय काय आहे ? मी दत्ताचे दर्शन व्हावे असे सांगितले. त्यावर स्वामी म्हणाले, दत्ताचे घर खूप लांब आहे. आपली इच्छा असेल तर ते जवळ येईल. तिकडे जाताना वाटेत जो जो भेटेल तो दत्तच आहे असे समजावे. चार दिवसांपूर्वी पंढरपूरचा बडवा मध्ये आडवा आला तो कसा ? तो कुठे आडवा येणार. जे जे भेटे भूत ते ते मानिजे भगवंत असा भाव ठेवला म्हणजे भगवंत लवकर भेटतो."

"पावस येथील मठामध्ये एकदा गुरुचरित्राचे पारायण केले. त्याचे उद्यापनाचे वेळी माझ्याबरोबर मांसाहार करणाऱ्या एक बाई होत्या. स्वामींनी विचारले उद्यापनाच्या प्रसादाचा स्वयंपाक कराल ना ? मी हो म्हणून सांगितले व या बाईपण माझ्या मदतीला आहेत असे पण सांगितले. त्यांनी सोवळ्यात स्वयंपाक करा, असे सांगितले व एकीकडे सेवेकऱ्याला बोलावून उद्यापनाच्या दिवशी या बाईंना रत्नागिरी दाखविण्यासाठी घेऊन जाण्यास सांगितले व मला एकटीला ४० माणसांच्या स्वयंपाकाच्या सामानाची अचूक यादी देऊन प्रत्येकी सव्वा रुपया दक्षणा देण्यासाठी दिली. अशा पद्धतीने निषिद्ध आहार घेणाऱ्या बाईच्या करवी प्रसादाचा स्वयंपाक होऊ न देता दोघींनाही न दुखवता भगवंताचा प्रसाद करून घेतला. तसेच प्रसादाचे पान स्वामींना नेऊन देण्यासाठी सेवेकऱ्यांनी मला अडवले तेव्हा त्यांच्या करवीच मला निरोप सांगितला की, प्रसाद आणताना खाली-वर केळीचे पान घालून आणावे. पान पिकलेले असावे. पान तोडताना नमस्कार करावा, या वरून असे जाणविले की, सेवेकऱ्याने घातलेल्या बंदीतून त्याचा म्हणजेच सेवेकऱ्याचा अहंकार न दुखवता व प्रसाद नेण्याची माझी इच्छा न मोडता मोठ्या युक्तीने कार्य सिद्ध केले. योगः कर्मस्य कुशलम् या उक्तीप्रमाणे त्यांचे सर्व आचरण असे.

"एका वर्षी पुण्यातील शुक्रवार पेठेतील श्री. बर्वे यांच्या वाड्यातील ज्ञानेश्वरी पारायणामध्ये ४०० ते ४५० भक्तजन सहभागी झाले होते. इतके लोक पारायणात बसले असे मी स्वामींना पत्राने कळविले. त्या पत्रामध्ये माझ्यामुळे हा शब्द अधोरेखीत केला होता व त्यांचा आशिर्वाद मागितला. त्यावर त्यांनी मला जे पत्र लिहिले त्यामध्ये ओवी होती ती अशी-

***घडे जे स्वभावे । कर्म ते आघवे । भावे समर्पावे । हरीपायी ॥***
***कर्ता भोक्ता । देता नारायण । भाव परिपूर्ण । असो द्यावा ॥***

त्यातूनच मी समजले की कर्मातून अहंकार येऊ नये. नेहमी निष्काम कर्म असावे. प्रत्येक घटनेतून निष्काम कर्माचे तत्त्व समजले पाहिजे.

वरील सर्व आठवणींच्या घटनेतून प. पू. स्वामींची समयसूचकता, व्यवहार चातुर्य, दुसऱ्याला न दुखवता सांगण्याची व काम करून घेण्याची पद्धत, भूतदया, सर्व प्राण्यांच्यामध्ये ईश्वर पहाणे या गोष्टींचे मला दर्शन झाले व मी धन्य झाले. तुकाराम महाराजांनी अभंगात म्हटल्याप्रमाणे माझे सारे जीवनच कृतार्थ व धन्य झाले.

**अभंग**

***धन्य मी मानीन, आपुले संचित । राहीलीसे प्रीत, तुझे नामी ॥***
***धन्य झालो आता, यासी संदेह नाही । न पडो बाही । काळा हाती ॥***
***ब्रह्मरसी करू भोजन पंगती । संतांचे संगती सर्वकाळ ॥***
***तुका म्हणे पोट । धाले विन माये । वाढलेची खाये आवडीने ॥***

**स्वामी चरणरजांकीत योगिनी ताडे**
ओम चेंबर्स, हॉटेल पांचाली शेजारी, जंगली महाराज रस्ता,
पुणे ४११ ००४.

# प. पू. स्वामी स्वरुपानंद यांची राष्ट्रभक्ती!

सौ. सुमति शामकांत देशपांडे

*एम.ए.एम.एड. उपमुख्याध्यापिका म्हणून निवृत्त. संत नामदेव अध्यासन पुणे विद्यापीठ येथे पीएच.डी. करत आहेत. समर्थ व्यासपीठ- उपाध्यक्ष, संतांवर व्याख्याने व मासिकांतून लेख प्रकाशित. कै. शं. दा. पेंडसे लेखन स्पर्धेत द्वितीय क्रमांक पारितोषिक.*

## आरंभिक

कोणतेही मूल जन्मतः शारीरिक, वाचिक, मानसिक कोणत्याही दृष्टीने पूर्ण वा शुद्ध नसते. त्याची अपूर्णता व अशुद्धी दूर करण्यासाठी काही साधनांची आवश्यकता असते. त्यापैकी एक म्हणजे संस्कार ! सदाचाराच्या संस्काराने मानवातील देवत्व प्रकट होऊ शकते. सदाचारात दैवी संपत्ती, अभय, सत्य, संशुद्धि आणि ज्ञान इत्यादी अनेक गुणांचा समावेश असतो. आपल्यातील गुण वाढवून, संपूर्ण देवत्व व्यक्त करणे हे मानवी जीवनाचे अंतिम ध्येय आहे. आंतरिक परिवर्तन हे सदाचाराचे स्वरूप आहे. अशा सदाचाराने पवित्र झालेल्या, कोकणातील रत्नागिरीनजीक असलेल्या पावस या गावी गोडबोले घराण्यात मार्गशीर्ष वद्य द्वादशी, मंगळवार दि. १५ डिसेंबर १९०३ या दिवशी स्वामी स्वरुपानंदांचा जन्म झाला. श्री. विष्णुपंत गोडबोले आणि सौ. रखमाबाई सत्त्वशील, सश्रद्ध हे त्यांचे माता-पिता होते. त्यांचे मूळ नाव 'रामचंद्र' होते. पण पुढे त्यांना कौतुकाने 'आप्पा' असे नाव पडले. संपन्न व मंगलमय असे वातावरण त्यांच्या घरात होते.

जुन्या काळातील एकत्र कुटुंब असल्यामुळे आप्पांवर मायेचे छत्र खूप मोठे होते. सात्त्विक परिवारातील बाळबोध वळण, सदाचाराची शिकवण या सर्वांचा परिणाम म्हणजे बालवयातच आप्पांच्या कुशाग्र बुद्धीला लाभलेली शिस्तबद्धतेची उत्तम जोड व जिज्ञासु वृत्ती !

## शिक्षण

जीवनाच्या पहिल्या दहा-अकरा वर्षात आप्पांच्या मन-बुद्धीचा विकास चांगला झाला. शरीर सुदृढ झाले. धार्मिक वृत्तीचे संस्कारही दृढमूल झाले आणि १९१४ साली आप्पा व त्यांचे बंधू रत्नागिरीस आले. तेथील नागू हायस्कूल (आजच्या फाटक) मध्ये इंग्रजी चौथीपर्यंतचे शिक्षण घेतले. पाचवी इयत्ता सरकारी हायस्कूलमध्ये पूर्ण केली. या काळात इंग्रजी शिक्षणाबरोबरच पुण्या-मुंबईकडील वर्तमानपत्रे विशेषतः लोकमान्यांचा 'केसरी' नित्य वाचनात येऊ लागला. आप्पांचे किशोर मन समाजातील, देशातील घडामोडींकडे अधिक जागृकतेने पाहू लागले. इ. स. १९१९ पर्यंत रत्नागिरीस शिक्षण घेतल्यानंतर सातवीच्या पुढचे शिक्षण घेण्यासाठी आप्पा मुंबईला गेले. आर्यन एज्युकेशन सोसायटीच्या विद्यालयात दाखल झाले. तेथे 'धर्मशिक्षण' आवश्यक म्हणून दिले जाई. त्यातून आप्पांना भगवद्गीतेचा अभ्यास घडला. घरी अध्यात्म ग्रंथाचे वाचन, विद्यालयात 'गीतारहस्य' आणि 'ज्ञानेश्वरी' यांचे अध्ययन अशा व्यासंगाने आप्पांच्या पारमार्थिक जीवनाचा मूळ पाया दृढ होत गेला. शाळेत संस्कृतशिवाय श्रीमद्भगवद्गीतेची शुद्ध संथा घेण्याची आप्पांना संधी मिळाली. समानशील वृत्तीचे लिमयांसारखे मित्र तेथेच मिळाले. 'केसरी' मधील लोकमान्यांचे विचार नित्य वाचनात येऊन तत्कालीन राजकीय घडामोडींचे पडसाद आप्पांच्या संवेदनाशील मनात उमटू लागले. 'स्वराज्य हा माझा जन्मसिद्ध हक्क आहे आणि तो मी मिळविणारच !' ही टिळकांची घोषणा सर्वच तरुणांच्या काना-मनात घुमू लागली. पुढील जीवनाचे चित्र मनात स्पष्ट होते ना होते, तोच संपूर्ण देशालाच एक जबरदस्त हादरा बसला.

इ. स. १९२० च्या एक ऑगस्टला लोकनेते, जनतेचे अनभिषिक्त राजे असे लोकमान्य टिळक अनपेक्षितपणे मुंबईत कालवश झाले. क्षणार्धात अवघ्या देशाचे ग्रहमान बदलून गेले. टिळकांची अभूतपूर्व अन्त्ययात्रा आप्पांनी साश्रु नयनांनी पाहिली आणि भारतीयांच्या स्वातंत्र्यासाठी स्वसुखाची तिलांजली देऊन आमरण काया-वाचा-मनाने झिजलेल्या या महापुरुषाचे व्रत आपण यथामति-यथाशक्ती पुढे चालविले पाहिजे, असा संकल्प तात्काळ त्यांनी केला. राष्ट्रसेवेची विलक्षण ऊर्मी त्यांच्या मनात उसळली.

लोकमान्यांची जागा महात्मा गांधीजींनी घेतली आणि नव्या मन्वन्तराचा प्रारंभ झाला. म. गांधीजींच्या असहकाराच्या चळवळीने त्यांच्या नेतृत्वाचे वेगळेपण सामाजिक व राजकीय क्षेत्रात जाणवू लागले. शुद्ध खादीच्या वापरापासून सविनय सत्याग्रहापर्यंत अनेक बाबींचा त्यात अंतर्भाव होता. लोकमान्यांनी केलेल्या प्रचंड जनजागृतीची पार्श्वभूमी गांधीजींना लाभली आणि त्यांनी आपल्या कार्यासाठी तिचा उपयोग केला. मुंबईत आल्यापासून अंगी राष्ट्रीय वृत्ती बाणविलेल्या आप्पांच्या मनावर म. गांधीजींच्या विचारसरणीचा आणि त्यांच्या चळवळीचा फार मोठा प्रभाव पडला. स्वदेशी व शुद्ध खादीचे व्रत स्वीकारून आप्पांनी राष्ट्रीय शाळेत नाव घातले. इ. स. १९२२ मध्ये मार्च महिन्यात त्यांची प्रवेश परीक्षा संपली आणि पुढचे महाविद्यालयीन शिक्षण घेण्याऐवजी त्यांनी गांधीजींच्या देशसेवेचे व्रत घेतले. पावस येथे राष्ट्रीय पाठशाळा व स्वावलंबनाश्रम काढण्याचे ठरविले. पूर्ण तयारीनिशी आप्पा पावसला परतले. तत्कालीन देशस्थितीचा विचार करून तरुण पिढीसमोर उभे ठाकलेले कर्तव्य त्यांनी स्वीकारले होते. म. गांधीजींचा आदर्श समोर असल्यामुळे देशहितार्थ आपल्या वैयक्तिक सुखावर पाणी सोडण्याचा निर्धार त्यांनी केला. त्यांना देशभक्तीतच, देवभक्तीचा प्रत्यय येऊ लागला. या सर्वाला कारणीभूत असलेल्या त्यांच्या वेळच्या कालखंडाचा विचार करू.

## वेगवान कालखंड

एकोणीसाव्या आणि विसाव्या शतकाचा एक मोठा कालखंड अतिशय गतिमान आणि क्रांतिकारी घटनांनी भरलेला कालखंड म्हणून ओळखला जातो. (स्वामी स्वरुपानंदांचा) आप्पांचा काळ इ. स. १९०३ ते १९७४ असा आहे. राजकीय दृष्ट्या हा काल स्वातंत्र्यपूर्व आणि स्वातंत्र्योत्तर काळाशी संबंधित आहे. स्वातंत्र्यासाठी इंग्रजांना शह देणाऱ्या आणि स्वातंत्र्य यज्ञात स्वतःच्या प्राणांची आहुती देणाऱ्या सुधारक वैचारिक पिढीचा हा कालखंड आहे. या कालखंडामध्ये ब्रिटिशांची वसाहतवादी राजवट, दुसरे महायुद्ध, बंगालची फाळणी, असहकार चळवळी, सत्याग्रह, दलितोद्धाराची चळवळ, भारताला मिळालेले राजकीय स्वातंत्र्य, त्यासाठी मोजावी लागलेली फाळणीची जबरदस्त किंमत, म. गांधीजींचे महानिर्वाण या आणि अशा अनेक वेगवान घटना या कालखंडात घडल्या. एकंदरीत हा कालखंड छोटा असला तरी अधिक वेगवान व व्यापक घटनांनी युक्त असा आहे.

ब्रिटिशांच्या स्थिर झालेल्या सत्तेशी टक्कर देऊन स्वातंत्र्य सपादन करणे हेच या काळातील भारतीयांचे आध कर्तव्य, पुरुषार्थ साधन ठरले होते. प्रबोधन युगातील ज्ञान-विज्ञानाचा प्रसार करणे, आर्थिक, राजकीय, सामाजिक, सांस्कृतिक विकासाला पोषक अशा विशेष संघटना उभ्या करणे यामध्ये नामवंत भारतीय या काळात मग्न होते. पहिल्या महायुद्धाने युरोपमध्ये राजकीय विचारात क्रांती घडली होती. स्वातंत्र्य, समता आणि लोकमत ही तिची मूळ सूत्रे होती. साम्राज्यशाही ही साऱ्या मानवजातीच्या हिताविरुद्ध होती. त्यामुळेच भारतातही क्रांतीची लाट आली होती. 'स्वतंत्र भारता'ची आस या काळात लागून राहिली होती. हीन, दीन, दरिद्री भारतीय जनतेत आत्मविश्वास निर्माण करण्याची नितांत गरज होती. त्यासाठी सुप्त शक्ती जागृत करून जनतेतील सामर्थ्याची तिला जाणीव करून देऊन लोकशक्तीच्या सहाय्याने साम्राज्यवाद्यांना शह देणे हेच तत्कालीन नेत्यांसमोरचे ध्येय होते. या कालखंडात अनेक लोकोत्तर पुरुष झाले. त्यांनी देशाला या पारतंत्र्याच्या गर्तेतून बाहेर काढण्यासाठी प्राण पणाला लावले. काही पुरुषांनी 'धर्म' हे अधिष्ठान ठेवून लोकजागृती केली. स्वाभिमान व देशभक्तीचे धडे त्या महापुरुषांनी दिले ते महाराष्ट्रातील सुशिक्षित जनतेच्या अंतःकरणाला भिडले आणि जनजागरणाला प्रारंभ झाला.

## लोकमान्य टिळकांचे प्रबोधन कार्य

लो. टिळकांसारखे खंबीर नेतृत्व भारताला मिळाले. त्यांच्या प्रयत्नांचे फळ म्हणजे कष्टकरी, कामकरी जनतेचा नव्या युगात प्रवेश होय ! स्वराज्य, स्वदेश, बहिष्कार व राष्ट्रीय शिक्षण ही चतुःसूत्री स्वीकारून लोकमान्यांनी जनसामान्यांना एक राष्ट्रीयत्वाची दृष्टी दिली. सारा देशच स्वत्वहीन, कर्तृत्वहीन झालेला होता. परधार्जिण्या वृत्तीमुळे ब्रिटिशांच्या गुलामीचे भूषण मानणारा वर्ग वाढला होता. अशा परिस्थितीत अन्यायाचा प्रतिकार करण्याची वृत्ती समाजात निर्माण करणे निकडीचे होते. समाजाचा आत्मविश्वास जागृत करणे आवश्यक होते. म्हणून कर्मयोगाच्या बैठकीवर राष्ट्ररचना व राष्ट्राचे स्वरूप निर्दोष करण्यासाठी आक्रमक आणि क्रांतिकारक विचारांचे लोण त्यांनी समाजाच्या सर्व स्तरांत पोहोचविले. यासाठी 'केसरी' आणि 'मराठा' या नियतकालिकांनी समाजप्रबोधनाचे कार्य अत्यंत धडाडीने आणि निर्भीडपणे केले. देशाचे पारतंत्र्य, स्त्रियांचे परावलंबित्व, सामाजिक क्षेत्रातील प्रतिष्ठितांचे वर्चस्व, राजकीय क्षेत्रातील इंग्रजांची दडपशाही, परकीय भांडवलदारांचा जुलूम, अडाणी शेतकऱ्यांची सावकारांकडून होणारी पिळवणूक, अस्पृश्यांची कुचंबणा, विधवांची दुःखे, इंग्रजांच्या राजकीय वर्चस्वाचे स्वरूप असे अनेक प्रकारचे सामाजिक, राजकीय व अन्य महत्त्वाचे विषय केसरीने समर्थपणे हाताळले आणि 'शिक्षण' हाच भावी पिढीचा जीवनमंत्र तिचा उद्धार करील हे जाणून त्यांनी राष्ट्रीय शिक्षण देणाऱ्या विद्यालयांच्या स्थापनेवर भर दिला. लो. टिळकांचे राजकीय क्रांतिकार्य आणि लोकजागरण एकाच वेळी चालू होते. इ. स. १९०५ मध्ये बंगालची फाळणी झाली. बंगालचे दुःख हेच भारतीयांचे दुःख ही भावना देशभर पसरली. जात, पात, गोत, धर्म, प्रांत सारे भेद विसरून सारे भारतीय बंगालच्या दुःखाशी एकरूप झाले. देशातील 'एकीचे' सामर्थ्य वाढीस लागले. इ. स. १९१७ च्या आरंभापासून देशभर 'होमरुल लीग' चळवळीला सुरुवात झाली. मुंबई व मद्रास येथे या चळवळीने सरकारला हादराच बसला. या चळवळीच्या प्रतिकारार्थ सरकारने अनेक प्रतिकूल गोष्टी केल्या.

## म. गांधीजी आणि सत्याग्रह

या परिस्थितीला म. गांधीजींनी शांततामय प्रतिकार करण्याचे योजले. म. गांधीजींनी कायदेभंगाच्या सहाय्याने सत्याग्रहाचे शस्त्र उगारले. सत्याग्रहात व्यक्तिद्वेषाला मुळीच स्थान नव्हते. इ. स. १९२० नंतर भारताच्या इतिहासात चिरस्मरणीय ठराव्यात अशा अनेक घटना घडत गेल्या. जागतिक इतिहासातही गौरवपूर्ण ठरेल अशी 'अहिंसक क्रांती' म. गांधीजींच्या प्रभावशाली नेतृत्वाखाली सुरू झाली. भारतीयांच्या राजकीय, सामाजिक, शैक्षणिक कार्यक्षेत्रात नवे चैतन्य म. गांधीजींनी आणले. इ. स. १९२० साली धर्मगुरु खलिफांच्या सत्तेचे खच्चीकरण आणि तुर्कस्थानचा फडशा या दोन्ही बाबींनी ब्रिटिश सरकारने पुन्हा एकदा वचनभंग केला. त्यामुळे सगळा मुस्लिम समाज खवळून उठला. म. गांधीजींनी असहकार पुकारला. इ. स. १९२९ सालच्या डिसेंबर महिन्यात कॉंग्रेसने स्वातंत्र्याचा ठराव पास केला. त्यामुळे स्वराज्याच्या मागणीसाठी सरकारशी दोन हात होणार हे नक्की झाले. देशाभिमानी तरुणांत आणि विशेषतः राष्ट्रीय शाळांतील विद्यार्थी वर्गात पुन्हा नवचैतन्य संचारले होते. म. गांधीजींनी असहकाराबरोबर बहिष्काराची चळवळ सुरू केली. त्या वेळी शाळा, कॉलेजे, कोर्टे वगैरेवर बहिष्कार घालून अनेक तरुण बाहेर पडले. देशभर स्वातंत्र्याची चळवळ निर्माण झाली. त्यातूनच प्रांताप्रांतातून राष्ट्रीय शाळा निर्माण झाल्या. देशभक्ती, निःसीम त्याग, जनतेवर अलोट प्रेम, लोकसंग्रहाची कुशलता इत्यादी म. गांधीजींच्या प्रभावी गुणांचा प्रभाव त्या वेळच्या तरुणांवर पडला. त्यांच्या नेतृत्वाने राजकारणाला संपूर्ण निराळे वळण मिळाले. आप्पांवरही त्यांचा प्रभाव पडला. आप्पांचे अंतःकरण त्यागाने, उदात्त भावनेने आणि मानवतेने परिपूर्ण भरलेले होते. म. गांधीजींच्या तत्त्वांशी आप्पांचा स्वभावधर्म मिळता-जुळता असल्यामुळे त्यांच्या राजकारणाला म. गांधीजींचे नेतृत्व

मनःपूर्वक मानवले. त्या वेळची आप्पांची विचारसरणी खालील अभंगातून दिसून येते.

*'लोकसेवा व्रत आचरिती भावें । तयातें मानावें भाग्यवंत ॥१॥*
*लोकसेवेसाठी सत्यातें स्मरुन । करिती ते दान सर्वस्वाचे ॥२॥*
*त्यांचि सेवाव्रतें तोषें जगन्नाथ । शुद्ध करी चित्त सेवकांचे ॥३॥*
*स्वामी म्हणे तेणें लाभें आत्मज्ञान । जनीं जनार्दन प्रकटतो ॥४॥*

सत्याचे दर्शन झाल्यावर आत्मज्ञान होते. परमेश्वर प्रसन्न होतो. शांती सुखाचा लाभ होतो. असे फळ त्यांनी अभंगातून सांगितलेले आहे. लोककल्याण करीत असताना जर आत्मकल्याण साधत असेल तर ते अधिक चांगले. ही विचारसरणी आप्पांना पूर्णपणे आकलन झालेली होती व मानवलेली होती.

## निरनिराळ्या घटनांचा स्वामींवरील प्रभाव

वयाच्या १४-१५ व्या वर्षापासून आप्पांच्या मनावर देशप्रेमाचे संस्कार आणि स्वातंत्र्याची ओढ कोरली जाऊ लागली होती. बालवयातच आपल्या मित्रांबरोबर देशाच्या स्वातंत्र्यासाठी आपल्याला काय करणे शक्य होईल या विषयी आप्पा चर्चा करीत असत. म. गांधीजींच्या प्रेरणेने सूतकताई, राष्ट्रीय विद्यालय सुरू करणे, जुन्या विद्यालयांवर बहिष्कार घालणे, स्वदेशीचे, खादीचे व्रत त्यांनी अखेरपर्यंत पाळले. आप्पांनी आपला परमार्थ देशसेवेशी निगडित करून टाकला. पावसला स्वावलंबनाश्रम काढून मुलांना शिकविण्यास सुरुवात केली. राष्ट्रभक्तीपर पदे स्वतःच रचून, स्वतःच काढलेल्या राष्ट्रीय मेळ्यात मुलांकडून बसवून घेतली.

*'जेव्हा जेव्हा गोरे राक्षस जगी माजतीलऽऽ*
*काळ्यांचा कैवारि कृष्ण हा तयांसि वंडी ऽ ल -।'*

अशा गाण्यांनी मेळे रंगू लागले. 'स्वातंत्रोदय' नावाचे छत्रसाल राजाच्या कथानकावर नाटक लिहून, दिग्दर्शन करून त्याचे प्रयोग केले. मनोरंजनाच्या माध्यमातून समाजजागरण करणे, हृदयस्पर्शी भाषणे करून देशाभिमान जागृत करणे असे स्वातंत्र्यसंग्रामासाठी लोकमत तयार करण्याचे कार्यही ते करीत होते. इ. स. १९३० साली सत्याग्रहाची चळवळ सुरू झाली. आप्पांनी आपल्या पदवी परीक्षेचा अभ्यासक्रम बाजूला ठेवला आणि टिळक महाविद्यालयातील विद्यार्थ्यांच्या तुकडीबरोबर ते बाहेर पडले. मिठाच्या सत्याग्रहात जास्तीत जास्त लोकांनी सामील व्हावे म्हणून सभा, व्याख्याने यांच्याद्वारा पायी प्रवास करीत रत्नागिरी ते देवगडपर्यंत गेले. १४ मे १९३० रोजी शिरोड्याला अभूतपूर्व असा मिठाचा सत्याग्रह करण्यात आला. त्यात भाग घेतल्यामुळे आप्पांना अटक करण्यात आली. दंडाची रक्कम भरण्यासाठी त्यांच्या आईने हातातील सोन्याची पाटली पोलिसांना दिली. ५० रु. किंमतीचे सोने घेऊन आप्पांना सोडून देण्यात आले. पण पुण्यात आल्यावर त्यांना पुन्हा अटक करण्यात येऊन येरवडा जेलमध्ये भरती करण्यात आले. इ. स. १९३२ नंतर आप्पांची जेलमधून सुटका झाली. दोन-तीन वर्षांच्या कारावासात त्यांना शंकरराव देव, रावसाहेब पटवर्धन, आचार्य जावडेकर यांच्यासारख्या राष्ट्रभक्तांचा निकट सहवास घडला. जगाकडे व मानवी जीवनाकडे पहाण्याचे पाश्चात्य पंडितांचे दृष्टिकोन आचार्यांकडून समजावून घेता आले. इ. स. १९३४ नंतर आप्पांच्या आजारीपणामुळे त्यांचा अनेक गोष्टींचा संपर्क तुटला.

## स्वावलंबनाश्रम

पावस येथे आल्यावर आप्पांनी 'स्वावलंबनाश्रम' या नावाने एक राष्ट्रीय शाळा जून १९२२ मध्ये सुरू केली. विद्यार्थ्यांना येथे देण्यात येणारे शिक्षण बहुविध प्रकारचे, राष्ट्रीय बाण्याचे व व्यवहारात उपयोगी पडेल असेच असे. मुद्रेवर तारुण्याची व ध्येयनिष्ठेची टवटवी, बोलके डोळे, प्रेमळ भाषण, प्रसन्न मुद्रा, मुंबईच्या वास्तव्यामुळे तोंडी बसलेली सभ्य नागर भाषा, चालीरीतींचे गांभीर्य, सतत कार्यरत राहण्याची वृत्ती आणि स्वतः तयार केलेल्या खादीचा वेष अंगावर. हे सारे आप्पांचे व्यक्तिमत्त्व जुन्या, नव्या मंडळींना प्रभावित करणारे होते. आचार व विचार यात एकरूपता राखून ते ज्ञानाचे धडे देत व आदर्श आचरणाचा सक्रिय वस्तुपाठच विद्यार्थ्यांसमोर ठेवत. शिस्त व वक्तशीरपणा यावर त्यांचा कटाक्ष असे. शाळेतील अभ्यासाव्यतिरिक्त सामुदायिक सूतकताई घेतली जाई. मुलांनी शारीरिक व मानसिक दोन्ही दृष्टीनी बलवान व्हावे म्हणून व्यायाम व संस्कृत पाठांतर यावर भर दिला जाई. या सर्वांचा प्रभाव पडून विद्यार्थ्यांची संख्या भराभर वाढू लागली. आप्पांनी आपल्या कुटुंबियांनाही स्वदेशीच्या कार्यक्रमात सहभागी करून घेतले. थोड्याच कालावधीत मागावर वस्त्रे विणण्यात येऊ लागली व अहमहमिकेने स्वदेशीचे व्रत आचरणात आणण्यास प्रारंभ झाला.

## समाजप्रबोधनार्थ प्रयत्न

खेडेगावातील लोकांच्या आचारविचारांना योग्य वळण लागावे, या हेतूने आप्पांनी उत्सवाच्या वेळी उद्‌बोधक कार्यक्रमांची आखणी केली. गोकुळ अष्टमीच्या उत्सवासाठी त्यांनी 'श्रीकृष्ण मेळा' काढला. इ. स. १९२४ साली पावस गावातील 'गोकुळ अष्टमी' या मेळ्याच्या कार्यक्रमामुळे खूप गाजली. टिपऱ्या, गोफ, मुलांसाठी संपूर्ण खादीचा गणवेष वगैरे सामान आप्पांनी जमा केले. मेळ्यातील मुले फेर धरून मंत्रमुग्ध होऊन 'गोपालकृष्ण महाराज की जय ! गजतुंड दिव्य शिवबाल - असो हा ध्यानी, चित्स्वरूप जगदीश गणेशा,
*आम्हा तूंचि धनी ।*
*विघ्ननाशना आशीर्वचना, भक्तां देसी झणी ॥'*

असे म्हणून परस्परांना टिपऱ्या देत नाचत असत. आप्पा स्वतःच पदे रचत असत. मुलांना शिस्त लागावी, एकजुटीने काम करण्याची सवय लागून सुसंस्कार घडावेत म्हणून त्यांनी 'राष्ट्रीय मेळा' सुरू केला. शहरातील हे जनजागृतीचे साधन अगदी छोट्या खेड्यापर्यंत आणून पोहोचविले. 'स्वातंत्र्योदय' नावाचे नाटक स्वतः लिहून तयार केले. ते पावसच्या नाट्यप्रेमी रसिकांनी आप्पांच्या मार्गदर्शनाखाली बसवून त्याचे काही प्रयोगही करण्यात आले. सामाजिक सुधारणेसाठी 'सत्यनारायण' हे नाटक स्वतः रचले. पण हे स्टेजवर येण्यापूर्वीच एका विक्षिप्त व्यक्तीने फाडून नष्ट केले. इ. स. १९२२ ते १९२७ या कालखंडात गावातील सार्वजनिक उत्सवात होणारे हीन अभिरुचीचे तमाशांचे कार्यक्रम

रद्द करवून त्यांनी स्वतः बसविलेले राष्ट्रीय मेळ्यांचे कार्यक्रम सुरू केले. इ. स. १९२२ ते १९२८ या कालावधीत स्वावलंबनाश्रम चालवून आप्पा आपल्या ३-४ शिष्यांसह पुण्याला आले.

अशा प्रकारे अनेकविध मार्गांनी 'समाज प्रबोधनाचे' कार्य आप्पा अविरतपणे करीत होते. देशात सरकारविरोधी वातावरण वाढत होते. पण राष्ट्रीय शाळांमधून देण्यात येणारे राष्ट्रीय शिक्षण, खादीचा वापर, देशभक्तीचा प्रचार यामुळे सामान्य गावकऱ्यांना आपल्या मुलांच्या भवितव्याविषयी चिंता वाटू लागली. पावसच्या शाळेतील मुलांची संख्या रोडावू लागली. नवे विद्यार्थी दाखल होईनात. स्वावलंबनाश्रमातही नवीन विद्यार्थी दाखल होईनात. तेव्हा आप्पांनी खेडेगावात आपण मोठे देशकार्य करू शकणार नाही हे मनोमन ठरविले आणि ते पुण्याला आले. 'समर्थ भारत' या प्रेसमध्ये त्यांनी नोकरी धरली. काटकसरीने वागून, हातानेच स्वयंपाक करून ते राहू लागले.

## कायदेभंग व कारावास

विश्वाच्या कल्याणात आपले कल्याण पहावे ही मानवतेची सर्वात वरची पायरी आहे. 'आत्मज्ञान' हे जीवाचे कल्याणकारी आहे, तरी जगाचा व्यावहारिक आचार-विचार हा जितका सर्वोदयवादी असेल, अधिक संवादी असेल, अधिक कल्याणकारी असेल तितका तो निर्माण करावयाचा हा त्यांचा प्रवृत्तिप्रधान असा विचार होता. कम्युनिझमच्या तत्त्वज्ञानातील अत्याचारी विचारसरणीचा किंवा रक्तमय क्रान्तीचा अवलंब न करता त्यांना अभिप्रेत असलेला समाजवाद निर्माण करावा असे त्यांना वाटत होते. इ. स. १९३४ च्या आजारपणात त्यांनी जे 'अमृतधारा' नावाचे काव्य लिहिले आहे, त्यात या विचारांचा भाव व्यक्त झालेला आढळून येतो.

*'समानता मानवधर्माचा नसेल भक्कम पाया ।*
*तरी इमारत यंत्र युगाची उडेल मनुजा वाया ॥'*

इ. स. १९२७ ते १९३४ पर्यंत आप्पांचे वास्तव्य पुण्यातच होते. ऐन पंचविशीतील संवेदनक्षम मनाचे आप्पा तत्कालीन राजकीय घडामोडींपासून अलिप्त राहूच शकले नाहीत. लोकमान्यांचे राष्ट्रीय शिक्षण आणि म. गांधीजींचे सत्य-अहिंसेचे तत्त्वज्ञान घेऊन शुद्ध खादीचा वेष स्वीकारलेल्या आप्पांनी इ. स. १९३० च्या मिठाच्या सत्याग्रहात सक्रिय भाग घेतला. सत्याग्रहाच्या चळवळीला आवश्यक ती विचारांची बैठक अकृत्रिम अशी होती. त्यामुळे त्यांनी आपला अभ्यासक्रम वगैरे गुंडाळून सत्याग्रहात भाग घेण्याचे ठरविले. टिळक महाविद्यालयातील ज्या अनेक तुकड्या सत्याग्रहासाठी बाहेर पडल्या त्यातील एका तुकडीचे सेनापती प्राचार्य रबडे हे होते. या तुकडीत ११ सत्याग्रही होते. त्यातच आप्पा होते. या चळवळीत आप्पांनी रत्नागिरीपासून मालवणपर्यंत खेड्यापाड्यांतून पायी हिंडून तुफानी प्रचार दौरा यशस्वी केला. आवेशपूर्ण भाषणे करून शिरोडा, मालवण, देवगड अशा जागोजागी देशप्रेमाची ज्योत प्रज्वलित केली. देवगडहून पुढे आप्पा, सरनाईक व बाबा देसाई हे बोटीने मालवणला गेले. तेथे प्रचार करून सत्याग्रहासाठी दीडशे सत्याग्रही तयार केले. व्याख्यानांमधून जनतेच्या मनात स्वातंत्र्याबद्दल उत्कट प्रेम निर्माण केले. भाववेशाने उत्कट देशभक्तीने व अमोघ वक्तृत्वाने विनटलेले त्यांचे भाषण ऐकून श्रोतृसमाज भारावून जात असे. त्यामुळे त्यांना अपेक्षेपेक्षाही सत्याग्रहींची अधिक भरती करता येणे शक्य झाले. शिरोड्याला सत्याग्रहींवर प्रत्यक्ष गोळीबार झाला नाही पण लाठीहल्ला केला गेला. त्यात अनेक सत्याग्रही घायाळ झाले. पकडले गेले. सत्याग्रह बंद पडला. आप्पा प्रचार करण्यासाठी मागे राहिले होते. सत्याग्रह मागे घेण्याचे ठरल्यावर ते परत शिरोड्याहून मालवण येथे आले. १०-१२ दिवस तेथे राहून पुणे, दौंड, बारामती, इंदापूर वगैरे ठिकाणी जाऊन सोलापूरपर्यंत प्रचारकार्य करीत पैसा व स्वयंसेवक जमविण्याचे त्यांनी कार्य केले. शंभर सैनिकांची तुकडी निर्माण केली.

इ. स. १९३२ मध्ये महात्मा गांधीजींच्या सविनय कायदेभंगाच्या चळवळीचेही लोण खेडोपाडी पोहोचविले. आप्पांनी रत्नागिरीमध्ये प्रक्षोभक भाषणे केली. सत्याग्रह केला... अर्थातच त्यांची पुणे येथे येरवडा कारागृही रवानगी झाली. या काळात रावसाहेब पटवर्धन, जनुभाऊ पटवर्धन, आचार्य जावडेकर, आचार्य भागवत, श्रीशंकरराव देव, एस्. एम्. जोशी हे आप्पांचे सहकारी होते. तुरुंगातही आप्पांची आध्यात्मिक साधना सुरूच होती. या बंदिवासात त्यांना झालेला लाभ म्हणजे स्थिर आसनावर स्वरुपानुसंधान टिकविण्याच्या अभ्यासाला मिळालेली उसंत ! जेलमधील मोकळ्या वेळात त्यांनी हा अभ्यास खूप वाढविला. त्यांची नित्य साधना व आनंदमय वृत्ती पाहून त्यांच्या समवेत असणारे, परमार्थसाधनेशी परिचय नसणारे सत्याग्रही त्यांना कौतुकाने 'स्वामी', 'मुनी' असे म्हणू लागले. दे. भ. देव, रावसाहेब पटवर्धन ही वडीलधारी पुढारी मंडळीही 'स्वामी मुनिवर्य' या संज्ञेचा वापर आप्पांशी बोलताना करू लागली.

म. गांधीजींनी सरकारविरोधी कायदेभंगाची चळवळ सुरू केली. म. गांधीजींना ते गोलमेज परिषदेला गेले असतानाच 'तुम्ही चळवळ सुरू कराल, तर पंधरा दिवसांतच ती नेस्तनाबूद करू' असे सांगितले. सरकारी दडपशाहीचा वरवंटा सर्वत्र फिरू लागला होता. वर्किंग कमिटीचे सभासद, थोर थोर कॉंग्रेस पुढारी पकडले गेले. मुंबई प्रांतात पाचशे संस्था बेकायदा ठरविल्या गेल्या. त्यात महाराष्ट्रातील सर्व राष्ट्रीय शाळा होत्या. टिळक महाविद्यालयही बेकायदा ठरले. सरकारच्या देशभर होणाऱ्या दडपशाहीमुळे स्वातंत्र्यासाठी तळमळणाऱ्या तरुणांचे रक्त सळसळू लागले. आप्पांचे मन या सर्व घटनांनी विषण्ण झाले.

येरवडा कारागृहातून मुक्त झाल्यानंतर आप्पांचा सक्रिय राजकारणाशी असलेला संबंध संपुष्टात आला. कारण इ. स. १९३४ साली त्यांना जो आजार झाला, त्यात आलेला अशक्तपणा पुनः कधीही संपूर्ण असा नाहीसा झालाच नाही.

## समारोप

आधुनिक संत सत्पुरुषांचे एक वेगळेपण प्रकर्षाने जाणवत रहाते. या काळातील आध्यात्मिक साधना करणारे स्वामी प्रज्ञानानंद, गुळवणी महाराज, स्वामी स्वरुपानंद इत्यादी मंडळी प्रचलित राजकारणापासून अलिप्त राहू शकलेली दिसत नाहीत. काही काळ तरी

परमार्थ आणि राजकारण या दोन्हींकडे सारखेच सहभागी झालेले आढळून येतात. स्वातंत्र्य लढ्यात सहभागी होऊन त्यांनी 'स्वातंत्र्य, समता आणि बंधुभाव' या संकल्पनांचा पुरस्कार केला. स्वदेशीचे व्रत आचरले. वृत्ती आध्यात्मिक असूनही स्वामी स्वरुपानंद तत्कालीन ऐहिक वातावरणाशी पूर्णतया समरस झालेले दिसतात. भारतात आलेल्या क्रांतीच्या लाटेत काही काळ तरी त्यांनी स्वतःला पूर्णपणे झोकून दिले होते. आणि वेळ येताच ऐहिक जीवनातून पूर्णतया निवृत्त होऊन विरक्तीयुक्त काया-वाचा-मनाने ते 'सोऽहं' साधनेत विलीन झाले.

स्वामींचे बरेचसे जीवन स्वातंत्र्यपूर्व काळातले आहे. ते कार्यनिष्ठ आहे. स्वातंत्र्योत्तर काळातील त्यांचे जीवन हे सिद्ध पुरुषाचे आहे; पण प्रसिद्धीची हाव कोठेही दिसत नाही. त्यांच्या प्रसिद्धीपराङ्मुख वृत्तीमुळे त्यांच्या सतत सान्निध्यातील मंडळींनासुद्धा त्यांच्या सिद्धत्वाची ओळख पटण्यास विलंब लागला. काही माणसे आपला संप्रदाय, त्याचा विशिष्ट पोषाख, मुद्रा यांचे स्तोम माजवतात. पण स्वामींनी असा अध्यात्माचा बाजार कुठेच मांडलेला दिसत नाही. 'जे प्राप्त कर्तव्य ते मनाशी अन् जनाशी प्रामाणिक राहून करावे !' इतकाच त्यांचा उपदेश असे.

आध्यात्मिक साधनेबरोबरच राष्ट्रभक्तीही किती जाज्वल्य होती याचा प्रत्यय त्यांच्या देशकार्यातून येतो. म. म. द. वा. पोतदार यांच्याच शब्दांत सांगायचे तर, 'मला हे माझे मोठे भाग्य वाटते की, काडीचेही सोंग नाही, ढोंग नाही, अवडंबर नाही, व्याख्यान-प्रवचन नाही. केले फक्त लेखन ! अखंड सोऽहं जप साधना ! अन्य काही नाही ! असा सोळा आणे सोलीव संत मी उभ्या आयुष्यात एकच पाहिला आणि तो म्हणजे स्वामी स्वरुपानंद ! अशा थोरांचे केवळ अस्तित्व हेच पुण्यकारक आणि मार्गदर्शक होते म्हणून मी त्यांचे नित्य स्मरण करतो !' अशा संत स्वामी स्वरुपानंद यांच्या चरणी शतशः प्रणिपात !

**सौ. सुमती देशपांडे**
सर्व्हे नं. ३६, प्लॉट नं. ४, पांडुरंग कॉलनी, संकल्प बंगला,
एरंडवणा, पुणे ४११ ०३८.

## संदर्भ ग्रंथ

१) स्वामी स्वरुपानंद : जीवन, काव्य-तत्त्वज्ञान - डॉ. रा. य. परांजपे
२) पावसचा प्रेमदीप - सत्यदेव
३) पावसच्या पमरहंसांच्या सहवासात - स्वामी सत्यदेवानन्द सरस्वती
४) 'प्रसाद' दिवाळी अंक - इ. स. १९७४ - संपादक - म. य. जोशी
५) श्री. दीपलक्ष्मी - स्वामी स्वरुपानंद विशेषांक - मे १९६९
६) स्वामी स्वरुपानंद - जीवन दर्शन - संकलक - डॉ. सुषमा वाटवे
८) हरिमुखे म्हणा - स्वामी स्वरुपानंद उत्सव - मंडप स्मरणिका स्वामी जयंती - १८ डिसेंबर १९८७

# स्वामी स्वरुपानंद : अनुभव आणि आठवणी

**सविता पारिजात**

*बी. ए. बी. एड., सहाय्यक शिक्षक म्हणून निवृत्ती. वृत्तपत्रे व मासिके यातून विविध विषयांवर लेखन. कविता लेखनाची विशेष आवड. पुणे आकाशवाणीवर विविध कार्यक्रम सादर. मुक्त पत्रकार १९७४ साली पू. स्वामींचा अनुग्रह. त्यानंतर विविध विषयांवर धार्मिक विशेषांक प्रसिद्ध. स्वामींच्या जीवन तत्त्वज्ञानाला वाहून घेतल्यावर ठिकठिकाणी ध्यान, शिबिरे आयोजित.*

स्वामी स्वरुपानंदांनी माझ्या आयुष्याला एक वेगळेच वळण दिले. स्वामींकडे जाण्यापूर्वी असलेला मी आणि स्वामींच्या अनुग्रहानंतर बदललेला मी यात जमीन-अस्मानाचा फरक आहे. किंबहुना असेही म्हणता येईल की माझा पुर्नजन्म झाला आहे. मी ज्या शाळेत नोकरी करीत होतो तेथे सौ. यमुताई कुलकर्णी शिक्षिका होत्या. आता त्या गुरुपदावर आरुढ झालेल्या आहेत. त्यांच्याकडून शाळेत वावरत असताना स्टाफरुममध्ये, कार्यक्रम प्रसंगी, सहलीच्या वेळी, अनेकदा स्वामींचे नाव ऐकले होते. त्या स्वामी या विषयांवर बोलायला लागल्या की त्यांचे स्वतःचे भान हरपेच. पण इतर माणसेही त्यांचे बोलणे शांतपणाने ऐकून घेत. कधी कधी आम्हा सगळ्यांच्या डोळ्यांच्या कडा पाणावलेल्या असत.

माझी आई गेली तेव्हाचा प्रसंग. अगदी शेवटच्या प्रसंगी तिने पेढे मागितले होते. पण ती अपरात्र असल्याने व जवळ कोणी जबाबदार व्यक्ती नसल्याने मला काही तिची इच्छा पुरवता आली नाही. प्रसंग घडून गेला असला तरी पुढे किती तरी दिवस मी पेढे खात नव्हतो. काही काळानंतर सौ. यमुताईनीच मला पावसला नेले. स्वामींच्या परिसरात प्रवेश करीत असतानाच साधकाश्रमामध्ये पाऊल टाकताच स्वामींच्या 'भावार्थ गीता' या ग्रंथाचे पठण ऐकू आले. त्यातील एक साकी अशी होती -

***नाशिवंत तें गेलें त्याचा शोक न करणे युक्त***
***जें सार्चे तें बँचे ना हें जाणुनि राहि अलिप्त***

का कुणास ठाऊक ती साकी ऐकल्यानंतर एकदम माझ्या मनात विचार आला जे नाशिवंत आहेत ते जाणारच. हे सत्य असताना आपण आपल्या आईच्या आठवणीने दुःखी का व्हावे ? हा विचार इतका प्रभावी होता की, आईच्या वियोगाचे राहिले साहिले दुःख मी तिथल्या तिथेच विसरून गेलो. पण बुद्धिवादी मन काहीतरी प्रचीती हवी म्हणून अडून बसले. तिथला कार्यक्रम संपल्यानंतर जो प्रसाद वाटला जात होता त्यात पेढे होते. तो प्रसादाचा पेढा मी इतक्या हावरटपणाने खाल्ला आणि मनाशी निश्चयही केला की असला काही संकल्प पुन्हा करावयाचा नाही व केलाही नाही.

स्वामींच्या दर्शनासाठी देसाई यांच्या अंगणात आम्ही सगळेजण बसलो होतो. आतून निरोप येण्यासाठी वाट पहात होतो. इतक्यात मनात विचार आला की, व्यावहारिक जीवनामध्ये आपण एकमेकांकडे गेलो तर ओळख सांगतो. भेटकार्ड पाठवतो अगर आल्याची वर्दी देतो. परंतु ज्यांच्याकडून आपल्याला आपल्या आयुष्याचे कोडे सोडवून घ्यायचे आहे त्यांनी आपणहून बाहेरच्या माणसाला ओळखले पाहिजे. आपण नाव सांगायची गरजच काय ? हा विचार येऊन एक-दोन सेकंद झाले असतील इतक्यात आतून स्वामींचा निरोप आला. त्यात माझ्या संपूर्ण नावाचा आणि गावाचा उल्लेख होता. यापूर्वी माझी आणि स्वामींची कधीच ओळख झालेली नव्हती. माझे नाव किंवा इतर कोणतीही माहिती त्यांना नव्हती. असे असताना नावासकट त्यांचे बोलावणे येणे हा चमत्कार नव्हे तर दुसरे काय ? त्यांच्या या अंतर्ज्ञानाची, अंतरीची खूण इतकी पटली की, मला पुढे कधीच त्यांच्या विषयी संशय वाटला नाही. त्यांच्यावर असलेली निष्ठा मात्र दृढ झाली.

माझा स्वभाव पूर्वीपासून तापट. विशेषतः मुलांवर रागवण्याचा सारखा सपाटा असे. त्यामुळे आम्हा बाप-लेकांमध्ये एक विशिष्ट अंतर पडल्याची जाणीव आणि दुःख माझ्या मनाला होते. माझी पत्नी कधी मधी मुलाची तरफदारी करून हे भांडण मिटवण्याचा प्रयत्न करी. पण त्यात फारसे यश येत नसे. एकदा असाच प्रपंचातल्या वैतागाने झोपलो असताना रात्री स्वामी स्वप्नात आले आणि मला म्हणाले, "भावार्थ गीता अकराव्या अध्यायातील एकशे दहावी साकी वाचा." तशा त्या विमनस्क अवस्थेत उठून बसून मी स्वामींनी सांगितलेले पान काढले. ती साकी अशी होती,

***सखा सख्याचे प्रिय प्रियाचे अपराध करी सहन***
***पिता मुलाचे तसे चि माझे तुवां क्षमावे पूर्ण ।***

त्यातील 'पिता मुलाचे तसे चि माझे तुवां क्षमावे पूर्ण' या ओवीतील पितृ भावना माझ्या अंतःकरणाला इतकी खोलवर जाऊन भिडली की, मुलावर रागवण्याचा स्वभाव त्याच क्षणापासून बदलला. नंतरच्या काळात आमचे बापलेकांचे मतभेद झाले असतील. परंतु त्याला भांडणाचे स्वरूप कधीच आले नाही. ही मी स्वामींची कृपा समजतो.

माझे थोरले बंधू एकदा मधुमेहाच्या विकाराने आजारी पडले. त्यांना पुण्याला 'रुबी नर्सिंग होम' मध्ये दाखल केले होते. मी तातडीने भेटायला गेलो. तेव्हा स्वामी सत्यदेवानंद सरस्वती यांचे पावसचा प्रेमदीप हे स्वामींच्या वरील चरित्राचे पुस्तक माझ्या हातात होते. ते वाचत असताना आमच्या बंधूंना बरे वाटावे अशी मी स्वामींना प्रार्थना केली

आणि घाईने पुण्याला त्या हॉस्पिटलमध्ये पोहोचलो. त्या वेळी आमच्या बंधूंची तब्येत एकदम सुधारली होती आणि त्यांना डिसचार्जही मिळाला होता. हा प्रसंग आता लिहिताना त्याचे गांभीर्य तितकेसे वाटत नाही पण प्रत्यक्ष अनुभव अनुभवताना त्यातला थरार वेगळाच होता !

माझे वडील मला नेहमी म्हणत, शहाण्या माणसाने कधीही कर्ज काढू नये आणि काढले तर ते फेडता येईल इतकेच काढावे आणि लवकर फेडावे. परंतु त्यांचा हा उपदेश दुर्दैवाने त्यांच्या हयातीत मला अमलात आणता आला नाही. माझ्या शिक्षणासाठी घेतलेले कर्जही त्यांनाच फेडावे लागले. एकदा वैतागाने ते म्हणाले, 'जिवंतपणीचे हे कर्जबाजारीपण मी कसेतरी सहन केले. परंतु मेल्यानंतर तरी माझ्या दहनापुरता स्वतःचा पैसा शिल्लक ठेव.'' त्यांचे हे वाक्य अंतःकरणात कुठेतरी खोलवर रुतून बसले. शेवटी त्यांना कॅन्सर झाला होता. पुण्याच्या ससून हॉस्पिटलमध्ये उपचार चालू होते. तब्येत बिघडत गेली. अगदी शेवटी ऑक्सिजनचे सिलेंडर लावले. का कुणास ठाऊक, मला वडिलांच्या त्या वाक्यांची सारखी आठवण येत होती. पुन्हा कर्जाच्या पैशातूनच सगळे व्यवहार होणार होते. इतक्यात हॉस्पिटलमधला शिपाई आला आणि एकदम म्हणाला, ''अब आखरी तैयारी करनी होगी । पाँच-दस मिनिटमे यह पेशन्ट खत्म् होगा । ॲम्ब्युलन्सकी तैयारी करो.'' मला काही सुचत नव्हते. इतक्यात तोच शिपाई पुढे म्हणाला, ''डरो मत । पुना मे मरना बहुत सस्ता है । ॲम्ब्युलन्स चार्ज पचास रुपया और वैकुंठ भूमी मे बर्निंग चार्ज पच्चीस रुपया !'' त्याचे हे बोलणे ऐकत असतानाच माझ्या हातात असलेल्या भावार्थ गीतेचे एक पान उघडले तर त्यात बरोबर पंच्याहत्तर रुपयेच होते. कधी तरी पावसला जाण्यासाठी म्हणून थोडे-थोडे पैसे काढून मी भावार्थ गीतेमध्ये ठेवत असे. त्याचा प्रत्यय या प्रसंगी आला होता. आणि मी खऱ्या अर्थाने कोणतेही कर्ज न काढता वडिलांचा अंतिम सोहळा पार पाडला. पुढच्या जीवनात खूप पैसे मिळवले आणि खर्चही केले. पण हा प्रसंग जसाच्या तसा आठवणीत राहिला तो या पंच्याहत्तर रुपयांच्या स्वामी कृपेमुळे !

व्यक्तिगत जीवनात स्वामींनी इतके भरभरून दिले आहे की, तक्रारीला कुठे वावच नाही. परंतु स्वामींची सेवा आणि कार्य करतानासुद्धा आम्हा भक्ताच्या इच्छा ते ताबडतोब पुऱ्या करतात, याचे अनेक अनुभव आहेत. स्वामी स्वरुपानंद भजनकेंद्राच्या वतीने आम्ही स्वामीभक्त मंडळी कोल्हापूर येथे पापाच्या तिकटीला जामसांडेकर यांच्या घरी प्रत्येक शनिवारी जमत असतो. सर्व भक्तांच्या म्हणण्याप्रमाणे दरवर्षी गुरुपौर्णिमेचा उत्सव मोठ्या प्रमाणात साजरा केला जातो. काही दिवस हा उत्सव साजरा करताना माझ्यावर जबाबदारी होती. हरिप्रसाद मंगल कार्यालयात खूप भक्तमंडळी जमत. भक्तांच्याकडून देणग्या आणि वस्तुरूप देणग्या कधी उत्स्फूर्तपणे तर कधी भेटीगाठी घेऊन गोळा केल्या जात. पण उत्सव पार पडेपर्यंत माझ्या मनावर बराच ताण असायचा. स्वामी करून घेतात ही भावना जरी असली तरी व्यावहारिक बाबी पूर्ण झाल्या नाहीत तर मनाला रुखरूख लागत असे आणि रात्री झोप येत नसे. एका उत्सवाच्या वेळी सगळी तयारी झाली होती. परंतु गोडेतेलाचा एक डबा आवश्यक होता. सगळ्या भक्तांच्याकडे देणग्या मागूनही आले होतो. मी जराशा काळजीत होतो. इतक्यात स्वामीभक्त डॉ. भद्रे पती-पत्नी आमच्या घरी आले आणि म्हणाले, ''आम्हाला उत्सवासाठी गोडेतेलाचा डबा द्यावयाचा आहे.'' त्यांना प्रत्यक्ष काही माहिती नसताना आंतरिक प्रेरणा कशा काय कार्य करीत होत्या याचे उत्तर मला अजूनही मिळाले नाही, ही एक स्वामीकृपा आहे. एवढाच त्याचा अर्थ मी माझ्यापुरता लावला !

स्वामींच्या समाधी सोहळ्याच्या वेळचा प्रसंग. समाधी सोहळ्याची खूप मोठी यात्रा पावस येथे निघाली होती. देसाई यांच्या दारात स्वरुपाश्रमासमोर आणि आश्रमाकडे जाणाऱ्या पुलावर असंख्य भक्तांनी दाटीवाटी केली होती. मी आणि माझे गुरुबंधू, श्री. पागे पावसच्या पुलावर उभे राहून शोभायात्रा पहात होतो. त्या वेळी पूर्णगडच्या रस्त्यावरून एक प्रकाशाचा झोत आमच्या दोघांच्या चेहऱ्यावर पडलेला होता. एखादा ट्रक थांबला असेल अशी आधी आमची कल्पना होती. परंतु नंतर पाहिल्यावर तिथे ट्रक वगैरे काहीही नव्हता. हा आगळा-वेगळा प्रकाश होता याची जाणीव त्या वेळी झाली. अजूनही त्या प्रकाशाची आठवण झाली की अंगावर रोमांच उभे राहतात. अशा प्रकारे स्वामींचा सहवास आणि जीवन अनेक चमत्कार आणि चमत्कृतीने भरलेले असले तरी त्यांनी मात्र चमत्काराला कधीही उत्तेजन दिले नाही, पण लोकांच्या श्रद्धाच इतक्या तीव्र असतात की, स्वामींचे मोठेपण सांगायला शब्द अपुरे पडतात. आपले जीवन जगत असताना ते प्रामाणिकपणे जगले पाहिजे हा त्यांचा कटाक्ष होता. पण आपल्या प्रामाणिक भक्तांचे संसार स्वामी मोठ्या आनंदाने करीत. असे अनेक प्रसंग, घटना, यांनी स्वामींच्या भक्तांचे जीवनही रसमय झाले आहे. कोणत्याही प्रसंगी काही उणे न पडू देता स्वामी कार्य करतात. आपल्याला एखादा ग्रंथ हवा असेल किंवा महत्त्वाचा संदर्भ पाहिजे असेल तर एखादा ओळखीचा स्वामीभक्त तो पूर्वसूचना दिल्याप्रमाणे आणून देतो. जगातील सगळे संत एकच आहेत अशी खूण आणि जाणीव स्वामी भक्तांना वारंवार देतात. साधना कमी पडत असेल अगर ध्यानात उणीव असेल तर अदृश्य रूपाने मार्गदर्शन करतात. कुणाची संकटे दूर करतात, तर कुणाला संकटाला-धैर्याने तोंड देण्याचे सामर्थ्य देतात. स्वामींच्या कृपेने आपल्या मनासारखी गोष्ट घडली म्हणून त्यांना सोन्याच्या पादुका अर्पण करणारे भक्त मला माहीत आहेत. त्याचप्रमाणे आपल्या मुलाची हार्टॲटॅकमधून सुटका झाली म्हणून 'स्वामी समाधी' पुढे सोन्याचे हार्ट अर्पण करणारी मंडळी आहेत. ज्याचा जसा भाव तसे त्याचे स्वामी ! सांगावे तितके थोडे ही स्वामींची कथा स्वामीचरणी अर्पण !

**सविता पारिजात**
'ध्यानी मनी नसता',
१२३७ ख, 'ए' वॉर्ड, शिवाजी पेठ,
कोल्हापूर - ४१६ ०१२. दूरध्वनी - ६२९६०६

# ॥ श्रीस्वरुपानंद माझी सद्‌गुरु माउली ॥

विशाल सोऽहं आम्रतरूची दाट साउली
श्रीस्वरुपानंद माझी सद्‌गुरु माउली
अभंग ज्ञानेश्वरी ज्यांनीं जगताला दिधली
ती स्वरुपानंद माझी सद्‌गुरु माऊली

नरसोबाच्या वाडीक्षेत्रीं पितामही गेली
तपश्चर्या दत्तगुरुंनी करुनी घेतली
सुवासिनीच्या सौभाग्याची बहरे मग वेली
कोकण-देशीं वैकुंठांतुन किमया अवतरली ॥

खेळामाजीं बाळपणाचीं वर्षे संपलीं
मौंजीबंधन संध्यावंदन वृत्ति रंगली
कदापि आज्ञा थोर जनांची नाहीं भंगली
जीवनाची पूर्वतयारी केली चांगली ॥

सत्त्वात् संजायते ज्ञानम् उक्ति ऐकली
भगवद्‌गीता अभ्यासाची गोडी लागली
मातुलांच्या मुखें गुरूंची महती आकळली
आवडीचें नाम जिह्वा घोकूं लागली ॥

सग्रिंथ घेउनि ग्रंथरूपें संतमंडळी
ज्ञानदीपें संतत अंतर तेजानें उजळी
शिष्य व्हाया पात्रता जैं सर्वांगी आली
अनन्यभावें श्रीगुरूंना शरणागति केली ॥४॥




सोऽहंघोष-गंगा जगतीं घोघावत आली
शिव-नवनाथांपासुन पुढतीं वाहत राहिली
ती स्वरुपानंदजींना भाग्यें लाधली ॥
इद गंगा गोरक्षनाथां पासोनि आली

ज्ञानेश्वरी-चिंतन-मननीं वर्षे चाललीं
सोऽहंध्यानें सिद्धावस्था आकारा आली
क्षीण दुर्बळ शरीराची पर्वा नच केली
जनकल्याणा ग्रंथ-संपद् सुंदर निर्मियली ॥

परंपरेची श्रीगुरुंची सेवा साधली
सद्‌गुरुपदवी समाजानें सहजीं दिधली
पात्रापात्र-विवेकाची कक्षा लंघिली
अनुग्रहाची समान वृष्टी सर्वांवरि केली ॥

बहुतांवरती मंत्रवृष्टी ऐसी जरि झाली
उत्तम शिष्यें-सखोल हृदयीं प्रेमें सांठविली
मंत्ररसाचा पान्हा देई सद्‌गुरु-माउली
सत्यदेवानंद-वाणी सुखें थांबली ॥८॥

विशाल सोऽहं आम्रतरूची दाट साउली
श्रीस्वरुपानंद माझी सद्‌गुरु माउली
ती स्वरुपानंद माझी सद्‌गुरु माउली

श्रीस्वामी सत्यदेवानंद सरस्वती

स्वामी स्वरुपानंद

मु. पो. पांवस
रत्नागिरी
ता. ६-३-६८

जय माताजी

चि. प्रियश्री रामभाऊ गोडबोले यांसी,

हरिस्मरण पूर्वक अनेक आशीर्वाद. विशेष. ईश कृपेने इकडील सर्व श्रेम.

तुमचे दिनांक २७-२-६८ चे पत्र पोहोचले. माझी प्रकृती साधारण बरी आहे. तथापी हिंडणे, फिरणे, लिहीणे, वाचणे होत नाही. अंथरुणावरच स्वस्थ बसून किंवा झोपून असतो.

भावभक्तिने नामस्मरण करीत असावे. ईश्वर प्रत्येकाला योग्य तीच परिस्थिती देत असतो. प्रतिकुल प्रारब्ध आजच्या सत्कृत्यानी अनुकूल करून घेता येते. आपल्या हातून पूर्वी (पूर्वजन्मी) काय दोष घडले हे जीवाला कळत नाही. पण या जन्मी नामस्मरण करीत यथाशक्ती सदाचरणात दिवस घालविल्याने पुढे अनुकूल प्रारब्ध निर्माण होणारच.

"सगुण निर्गुण एक आत्माराम ।
भक्तिभावे नाम घ्यावे त्याचे ॥१॥

तुमचे आई-वडिलांस आणि सर्वांस आशीर्वाद.
कळावे,

तुम्हा सर्वांचा

[redacted]

आत्मतृप्त
स्वरुपानंद



# स्वामी स्वरुपानंदांच्या सहवासात

**श्री. सुनील चिंचोलकर**

*बी. कॉम., १२ वर्षे सज्जनगड येथे व्यवस्थापक. १५-१६ पुस्तके प्रकाशित. अध्यात्माच्या प्रसारासाठी ज्ञानेश्वरी, दासबोध, गीता, रामायण, महाभारत, वगैरेंवर महाराष्ट्र व महाराष्ट्राबाहेर प्रवचने. ओंकार ट्रस्टचा 'वसुंधरा कृतज्ञता पुरस्कार' प्राप्त १९९९. समर्थ व्यासपीठाचा शिव-समर्थ पुरस्कार.*

स्वामी स्वरुपानंद हे अलिकडच्या काळातील एक महान सत्पुरुष होऊन गेलेत. ते सर्वकाळ सोहंभावामधे असत. माझ्या जीवनातील हे महान सद्‌भाग्य की अशा पुण्य पुरुषाच्या सहवासात मला जवळ जवळ सहा महिने रहाता आले. १९७१, १९७२, १९७३ ही तीन वर्षे साधनेसाठी दोन-दोन महिने मी पावसला राहिलो होतो. त्यांना प्रत्यक्ष पाहण्याचा, त्यांच्याशी बोलण्याचा अलभ्य लाभ मला झाला, तो स्वामी सत्यदेवानंद सरस्वती यांच्यामुळे. १९७१ साली सज्जनगडावर राहून मी ४० दिवस मौन धारण करून हनुमंताची उपासना केली होती. त्या वेळी स्वामी सत्यदेवानंद सरस्वती चातुर्मासासाठी सज्जनगडावर आले होते. स्वामीजींनी मला विचारले, 'अनुष्ठानाद्वारे कोणते फळ मिळावे अशी इच्छा आहे ?' तेव्हा मी त्यांना सांगितले की संतांचे दर्शन व्हावे अशी इच्छा आहे. तेव्हा स्वामींनी मला पावसला जाऊन स्वामी स्वरुपानंदांचे दर्शन घेण्यास सांगितले. त्यांनी माझ्यासाठी भाऊसाहेब देसाईना पत्र दिल्यामुळे पावसमध्ये माझी सगळी सोय झाली. स्वामीजींनी सांगितले होते, 'तुला स्वामी स्वरुपानंदांना जो काही प्रश्न विचारायचा असेल तो मनातल्या मनात विचार. तुला स्वामी तत्काळ उत्तर देतील.' त्यानुसार सकाळी साडेआठ वाजता मी स्वामीजींच्या खोलीत गेलो. स्वामीजी खूप हळू बोलत. त्यांचा आवाज त्या चिमुकल्या खोलीच्या बाहेर जाणार नाही एवढा सौम्य होता. मला त्यांनी बाकावर बसायला सांगितले. त्या वेळी 'चित्त-शुद्धी हाच खरा धर्म होय.' हे स्वामी विवेकानंदांचे वाक्य माझ्या मनावर खूप बिंबले होते म्हणून मी मनातल्या मनात स्वामीजींना विचारले, 'चित्तशुद्धी हाच जर खरा धर्म असेल तर चित्तशुद्धीचा उपाय काय ?' स्वामीजींनी माझ्याकडे पाहिले ते हसले.शेजारच्या स्टुलावरील 'संजीवनी गाथा' हे अभंगाचे पुस्तक त्यांनी मला घ्यायला सांगितले. मी पुस्तक हातात घेतल्यावर ते उघडायला सांगितले. पुस्तक उघडताना मी अचानक मधले कुठलेतरी पान उघडले. मी उघडलेल्या पानावरील अभंग त्यांनी मला वाचायला सांगितला तो अभंग होता -

***'चित्तशुद्धीचा उपाय । सदा चिंतावे हरि पाय ।***
***चोखी करावा अनुताप । आणि मुखी नाम जप ॥'***

अभंग वाचून झाल्यावर त्यांनी मला जायला सांगितले. या पहिल्या भेटीतच स्वामीजींनी माझ्या मनाचा ताबा घेतला. त्यानंतर श्रीभाऊसाहेब देसाईंच्या प्रेमपूर्ण सहकार्यामुळे काही दिवस मला तपोवनात राहता आले. तेथे जोशी व रेळेकर हे दोन सात्त्विक साधक रहात असत. रोज सकाळी साडेआठ वाजता स्वामीजींचे दर्शन घडत असे.

१९७१ साली मी विद्यार्थी असल्यामुळे माझ्याजवळ जास्त पैसे नसायचे. स्वामींच्या अभंग ज्ञानेश्वरीचे दोन खंड मला विकत घ्यावयाचे होते. पण माझ्याजवळ पुरेसे पैसे नव्हते. तेथील पुस्तक विक्री पाहणाऱ्या मुलाला ते खंड उधार मागितले. परंतु त्याने असमर्थता दाखविली. माझ्या मनाला चुटपुट लागून राहिली. पुन्हा पावसला येणे होईल की नाही आणि हे खंड आपल्याला मिळतील की नाही अशी काळजी वाटू लागली. शेवटच्या दिवशी निघताना स्वामींना प्रणाम केला तेव्हा त्यांनी ते दोन खंड आशिर्वादपूर्वक मला दिले. माझे अंतःकरण खूप भरून आले.

एकदा सज्जनगडावरील मारुतीबुवा रामदासी यांच्या बरोबर मी पावसला गेलो होतो. आम्ही दोघे आठवडाभर तिथे होतो. आमचे परतीचे आरक्षण रत्नागिरी-पुणे बसचे झालेले होते. त्या वेळी स्वामी स्वरुपानंद देह ठेवणार अशी वार्ता सर्वत्र पसरली असल्यामुळे पावसला पंढरपूरच्या जत्रेसारखी गर्दी होती. आरक्षणाशिवाय प्रवास करणे अशक्य होते. आम्ही परतण्याच्या वेळी स्वामीजींचा निरोप घेण्यासाठी गेलो तेव्हा स्वामी म्हणाले, 'आज गेलेच पाहिजे का ? दोन दिवस थांबा आणि मग जा.' आम्ही स्वामीजींच्या सांगण्यावरून दोन दिवस थांबलो. तिसऱ्या दिवशी स्वामीजींचा निरोप घेऊन आम्ही निघालो. रत्नागिरीच्या बसस्थानकावर प्रचंड गर्दी होती. पुण्याच्या सर्व गाड्यांची आरक्षण संपलेली होती. आम्हाला गाडी मिळणे अशक्य होते. तेवढ्यात एक तरुण साधक आमच्याकडे आला व त्याने विचारले, 'तुम्हाला पुण्याला जायचे आहे का ?' मी त्यांना 'हो' म्हटले. त्यांनी मला एका सद्‌गृहस्थांकडे नेले. ते सद्‌गृहस्थ म्हणजे स्वामीजींचे लाडके शिष्य बाळासाहेब वाकडे ऊर्फ स्वामी माधवनाथ होते. त्यांनी आम्हाला सांगितले, 'आम्ही सगळी बस बुक केली आहे. परंतु आमच्या गाडीत दोन माणसांची जागा आहे. तुम्हाला यायचे असल्यास आमच्या बसमध्ये बसा.' स्वामींनी दोन दिवस ठेवून तर घेतलेच पण आमच्या परतीच्या प्रवासाचीही सोय केली. प्रवासात माधवनाथ स्वामींचा परिचय झाला. पुढे या परिचयाचे दृढ प्रेमात रूपांतर झाले. माधवनाथांची अनेक व्यासंगपूर्ण प्रवचने ऐकायला मिळाली.

स्वामी स्वरुपानंद सतत पलंगावर निजलेले असत. त्यामुळे ते

आजारी आहेत अशी चर्चा लोक करत असत. परंतु वस्तुस्थिती मात्र वेगळी होती. स्वामीजींचे आरोग्य उत्तम होते. परंतु चोवीस तास सोऽहम् भावात असल्यामुळे त्यांना खूप सूक्ष्मता प्राप्त झाली होती. देह अत्यंत कोमल झाला होता. कोणताही लौकिक व्यवहार करणे त्यांना अशक्य होऊन बसले होते. त्यांचा आहारदेखील दीड-दोन वर्षाच्या मुलासारखा अत्यल्प होता. बोलणे तर कमालीचे हळुवार होते. अखंड अनुसंधानामुळे देहाला आलेली कोमलता म्हणजे आजार नव्हे. उलट भाऊसाहेब देसाई सांगत असत - 'जपान मधील तज्ज्ञ डॉक्टरांचे एक पथक पावसला आले होते. त्यांनी स्वामीजींच्या सर्व प्रकारे तपासण्या केल्या. त्यांच्या मते उत्तम आरोग्याच्या एवढ्या कसोट्यांना उतरलेले एवढे निरोगी शरीर क्वचितच पाहायला मिळते.' स्वामीजी जर खरच आजारी असते तर सतत निजून राहिल्याने त्यांच्या शरीराला जखमा झाल्या असत्या. त्यांच्या पूर्णवेळ सेवेत असलेला मोहन सांगत असे की, स्वामींना एवढ्या वर्षात जांभई देताना मी एकदाही पाहिले नाही. स्वामीजींची आंतरिक अवस्था अती उच्चकोटीची होती. ज्या सामान्य जीवांना त्याचे आकलन झाले नाही त्यांनी त्यांना आजारी ठरवून टाकले. स्वामीजींचा देह व हृदयाची स्पंदने भोवतालच्या विश्वाशी इतकी आबद्ध झाली होती की त्यांच्या खोलीपासून सुमारे ५०-६० फूट अंतरावरील रस्त्यावरून एखादा ट्रक किंवा एखादी बस वेगाने धावली तर त्याचा स्वामींना त्रास होत असे. म्हणून शेवटची काही वर्षे आश्रमासमोरील रस्त्यावरून वहाने कमी वेगाने धावत.

एकदा स्वामीजींच्या दुपारच्या विश्रांतीच्या वेळी स्वरुपाश्रमात बेळगावच्या एक बाई आल्या होत्या. त्यांनी स्वतःची गाडी आणली होती व त्यांना दोन तासांत लागेच परत जायचे होते. व्यवस्थापक मंडळाने त्यांना 'आता स्वामीजींची भेट होऊ शकणार नाही' असे ठामपणे सांगितले होते. हा संवाद स्वामीजींच्या खोलीपासून खूप दूर अंतरावर चालला होता. तो आवाज स्वामीजींपर्यंत पोहोचणे शक्य नव्हते परंतु आश्चर्य म्हणजे स्वामीजींनी मोहनला बोलावून घेतले व सांगितले, 'आश्रमात बेळगावच्या एक बाई आल्या आहेत. त्यांना दर्शनाला पाठवून दे.' त्या बाईंना हा निरोप मिळाला. मनासारखे झाल्यामुळे त्या खूप आनंदल्या. ही घटना घडली त्या वेळी मी पावसलाच होतो.

नागपूर येथील प्रसिद्ध लेखक व संत वाङ्मय गाढे अभ्यासक डॉक्टर शं. दा. पेंडसे पावसला आले होते. त्यांनी महाराष्ट्रातील भागवत् धर्म या विषयावरचे चार खंड लिहिले होते. त्यात संत ज्ञानेश्वर, संत नामदेव, संत एकनाथ व संत तुकाराम या चार संतांचा परामर्श घेतला होता. त्या नंतर डॉक्टर पेंडसे यांची प्रकृती खालावत चालली होती. समर्थ रामदासांचा पाचवा खंड आपल्या हातून लिहून पूर्ण होईल की नाही याबद्दल त्यांच्या मनात शंका होती. परंतु स्वामीजींनी त्यांना आशीर्वाद दिला व हे लेखन कार्य आपल्या हातून पूर्ण होईल असे ठामपणे सांगितले. हा पाचवा खंड डॉक्टर पेंडसे यांनी लिहिला. एवढेच नव्हे तर तो प्रसिद्ध झालेला पहिला आणि त्या नंतर आठच दिवसांनी देह ठेवला. राजगुरु रामदास या नावाचे ते पुस्तक म्हणजे समर्थ संप्रदायातिल एक अनमोल ठेवा आहे. संतांचे जीवन, त्यांचे बोलणे, त्यांचे वागणे कसे अद्भूत असते व म्हणून संतांच्या वचनावर विश्वास ठेवल्यास माणसाचे कसे कल्याण होते हे यावरून दिसून येते. अशा थोर सत्पुरुषाच्या सहवासात काही काळ रहावयास मिळाले ही नक्कीच गत जन्मीची पुण्याई म्हणावी लागेल. त्या वेळी तरुण असल्याने व रजोगुणाचा प्रभाव असल्यामुळे एवढ्या थोर महात्म्याच्या सहवासात राहूनही आपण काही घेऊ शकलो नाही, याची मनाला आजही खंत वाटते.

**श्री. सुनीलजी चिंचोलकर**
भागीरथी निवास, ३२१ शुक्रवार पेठ,
पुणे ४११ ०३०.

---

स्वामी स्वरुपानंद

मु. पो. पांवस
रत्नागिरी
ता. २१-६-५८

जय माताजी

प्रिय श्री 'राम' यांसी हरिस्मरणपूर्व अनेक आशीर्वाद विशेष. ईशकृपेने इकडील सर्व क्षेम. तुमचेकडून कुशल पत्र सुमारे महिन्याभरापूर्वी आले ते मिळालें. श्री. राजश्री लक्ष्मण भाऊ यांनी हि पत्र लिहिलें होतें, तेंहि मिळालें.

ईश्वरावर दृढ निष्ठा ठेवून आपापला व्यवसाय करीत असावें. अनुकूल प्रतिकूल परिस्थिती त्याला जी काय द्यायची असेल ती तो देईल.

'संपत्ति अथवा विपत्ति । जैसी पडेल काळगति ।
नामस्मरणाची स्थिति । सांडूं च नये ॥१॥'

देवाची कृपा होईल तर सर्व कांहीं अनुकूलच घडून येईल. तो सर्व शक्तिमान् त्याला अनन्यपणें शरण जाणें एवढेंच आपलें काम.

'देव करी तरी काय न होई ।
दगडाचेनि नई तरिजेल ॥१॥
सूर्यकिरणांवरी मुंगियांची हारी ।
अग्नीच्या पाठारीं पीक होय ॥२॥
फुटोनियां पाय चालतील भिंती ।
मेरू मशक येती समतुका ॥३॥
ज्ञानदेव म्हणे अघटित घडे ।
गुरुकृपें जोडे परब्रह्म ॥४॥'

जुलईमध्यें कागद खरेदी होऊन ऑगस्ट पासून श्रीमत् अभंग ज्ञानेश्वरी ग्रंथ छपाईस सुरवात होईल. चि. रा. लक्ष्मण भाऊ यांस आशीर्वादप्रविष्ट करणे. सर्व मंडळींस आशीर्वाद.

कळावे हे आशीर्वाद,

[redacted]

आपला,
स्वरुपानंद.

# स्वामी स्वरुपानंद - एक अंतर्ज्ञानी

**श्री. मेघश्याम तुळशीदास गांधी**

*स्वामी स्वरुपानंदांचे अनुग्रहीत. ६ वर्षे स्वामींची सेवा.*

स्वामींचे अनुग्रहीत श्री. गांधी यांची भेट घेतली असताना स्वामी स्वरुपानंदांविषयी काही गोष्टींचा उल्लेख केला तो त्यांच्याच शब्दांत देत आहोत.

'मला लहानपणापासून कीर्तन, प्रवचन ऐकण्याची आवड होती. आमचे भोर गावी लक्ष्मणबुवा निजामपूरकर यांची कीर्तने होत असत. त्या कीर्तनाला मी आनंदाने जात असे. मी बरीच वर्षे नामस्मरण करीत असून गुरुचरित्र व संतचरित्र वाचीत असे. सद्गुरु भेटावे म्हणून मी बरेच ठिकाणी जाऊन आलो. परंतु मनाचे समाधान झाले नाही.

माझे किराणा मालाचे दुकान असल्यामुळे गिऱ्हाईक म्हणून श्री. बाबा देसाई यांची कन्या दुकानात येत असे. त्यांनी मला स्वामींचे चरित्र वाचावयास दिले. ते मी श्री. पांडे (स्वामी विद्यानंद) श्री. काणे या उभयतांना दाखविले. त्या चरित्रवाचनाचा परिणाम म्हणजे आम्ही तिघे पावसला गेलो. आमची गाडी रत्नागिरी स्टँडला गेल्यावर एक गृहस्थ विचारत होते की, या गाडीत गांधी म्हणून कोणी आहेत का ? मी हो म्हणून सांगितल्यावर ते म्हणाले की, स्वामींनी मला पाठविले असून भाट्याची तर ओलांडायला मदत करायला मी आलो आहे. त्यांनी आपले नाव श्री. मालवणकर असे सांगितले. हे सर्व पाहून आम्हाला आश्चर्याचा धक्का बसला. कारण आम्ही स्वामींना पावसला येत आहोत असे कळवलेही नव्हते.

स्वामींचे प्रथम दर्शन झाल्यावर आनंद व समाधान वाटले जे मला इतर ठिकाणी मिळाले नव्हते. आम्ही स्वामींना भेटायला गेल्याबरोबर आमचे प्रत्येकाकडे, बघून त्यांनी आमची नावे बरोबर सांगितली. आमची माहिती विचारली. माझ्या मनात काही शंका होत्या त्या अशा : आपले शिक्षण नाही, आपला व्यवसाय-व्यापार त्यामुळे आपण परमार्थ मार्गाला योग्य आहोत का ? स्वामींनी संजीवनी गाथा हे पुस्तक हातात देऊन त्यातील एक पान उघडावयास सांगितले. त्यातील पहिली ओवी आली चोविसावी व त्या ओवीपासून सत्तावीस पर्यंत वाचण्यास सांगितले. त्या ओव्या अशा :

(२४)

*धरिसील जरी हरीसी अंतरीं । तरी चि संसारीं सुखी होसी ॥१॥*
*होतां लाभ-हानि प्रियाप्रिय दोन्ही । समान मानुनी वर्ते बापा ॥२॥*
*पुत्र-वित्त-गोत लौकिकीं समस्त । असों दे अलिप्त चित्त सदा ॥३॥*
*पाळुनी स्वधर्म भोगीं अर्थ-काम । गांठी मोक्ष-धाम स्वामी म्हणे ॥४॥*

(२५)

*प्रकटतां नारायण । विश्व एकरूप जाण ॥१॥*
*द्विज गज गाय श्वान । हीन चांडालादि वर्ण ॥२॥*
*नर-नारी सखे वैरी । भेद-भाव ठेला दूरी ॥३॥*
*सोनें मृत्तिका पाषाण । सर्व जाहलें समान ॥४॥*
*स्वामी म्हणे वासुदेवें । विश्व व्यापिलें स्वभावें ॥५॥*

(२६)

*विश्वासे आपणां मानितील थोर । तरी तूं सत्वर थोर होसी ॥१॥*
*लेखितील जरी आपणासी क्षुद्र । तरी ते अभद्र पाठीं लागे ॥२॥*
*जो जो मनोभावें करिसील जप । ते ते आपोआप तुज प्राप्त ॥३॥*
*म्हणोनियां करीं हरीचें चिंतन । तेणें समाधान स्वामी म्हणे ॥४॥*

(२७)

*प्रारब्ध संचित आणि क्रियमाण । हरीसी अर्पण करोनियां ॥१॥*
*सुखें हरिपायीं राहिलों निवांत । जाहलों निश्चिंत कर्माकर्मीं ॥२॥*
*हरि-ध्यान हा चि वर्णाश्रम-धर्म । तीर्थ व्रत नेम हरि-नाम ॥३॥*
*स्वयें आत्माराम वाहे योग-क्षेम । ऐसें भक्त-प्रेम स्वामी म्हणे ॥४॥*

या चार ओव्यांतच माझ्या शंकांचे पूर्ण निरसन झाले होते. नंतर अभंग ज्ञानेश्वरी वाचावयास देऊन त्यातील ओवी 'रायाची कांता काय भीक मागे मनाचिया जोगे सिद्धी पावे' या ओवीपाशी थांबावयास सांगितले. या ओवीचा अर्थ मी चांगला साधक आहे, असा स्वामींचा सांगण्याचा हेतू असावा असे मला वाटले. आम्ही एकंदर तीन दिवस पावसला होतो. एक दिवस स्वामींनी सोऽहं साधना सकाळी समजून सांगितली व दुपारी परत बोलावून आमचेकडून करून घेतली व नंतर अनुग्रह दिला.

आतापर्यंत मी गुरुशोधार्थ पुष्कळ भटकलो होतो. पण समाधान होत नव्हते म्हणून ठरवले होते की कुठे गुरु शोधार्थ जाऊ नये, परंतु स्वामींना भेटल्यानंतर गुरु भेटल्याचे समाधान झाले. घरी आल्यावर मी सोऽहं साधना सुरू केली व दर महिन्याला स्वामींच्या दर्शनाला पावसला जाऊ लागलो.

मला चार बहिणी असून त्यातील एकीचे लग्न होत नव्हते. ही गोष्ट मी स्वामींच्या कानांवर घातली. ते म्हणाले, 'काळजी करू नकोस. प्रयत्न करीत रहा.' लग्न जमवण्याचा एक भाग म्हणून मी बहिणीला घेऊन माझी मावशी 'मोडासा' जिल्हा हिंमतनगर, गुजरात इथे असून

तिथे घेऊन गेलो. दोन-तीन दिवस राहून लग्न जमवण्यासाठी बरेच प्रयत्न केले. पण यश आले नाही. निराश झालो. स्वामींचे स्मरण केले. ज्या दिवशी आम्ही पुण्याला येण्यासाठी निघणार होतो त्या दिवशी पहाटे ४ चे सुमारास माझे स्वप्नात पूज्य स्वामी येऊन त्यांनी सांगितले की, 'आज संध्याकाळी चारपर्यंत वाट बघ. नाहीतर पुण्याला परत जा.' दुपारचे जेवण झाल्यावर मी व माझा मावस भाऊ झोपाळ्यावर बसलो होतो. दारातून एक व्यक्ती चालली होती. ती माझ्या मावस भावाच्या ओळखीची असल्यामुळे त्याने त्याला हाक मारली. चेष्टेतच त्याने विचारले, 'अरे तू लग्न करतो आहेस का ?' त्यावर तो 'हो' म्हणाला. मुलीबद्दलची सर्व माहिती सांगून माझ्या बहिणीला बघण्याचा कार्यक्रम झाला. त्याला पसंत पडल्यामुळे त्याच्या आई-वडिलांना माझी बहीण दाखवली. त्यांनीही तिला पसंत केले. लग्नकार्याबद्दलचे सर्व निश्चित ठरवून मी पुण्यास परत आलो. लग्नकार्य छान पार पडले. त्यांनी उभयता पावसला जाऊन स्वामींचा अनुग्रह घेतला. आमच्या सर्व बहिणींत ती फारच भाग्यवान ठरली.

माझे धाकटे बंधु हे डिप्लोमा इन इंजिनिअरिंग झाले असून ते नोकरी करीत होते. मी त्यांना घेऊन पुण्याच्या श्रीरामकृष्ण आश्रमात जात असे. रामकृष्ण आश्रमाच्या पवित्र वातावरणाचा परिणाम होऊन नोकरी सोडून तो आश्रमात आजीवन कारवारला राहावयास गेला. माझे वडील पुण्याला माझेजवळ रहात असत. त्यांना भेटण्यासाठी तो अधून-मधून पुण्याला येत असे. त्या वेळेला माझे वडिलांनी स्वामींचा अनुग्रह घेतल्याचे त्याला सांगितले व मी सोऽहम् साधना करतो असे म्हणाले. त्यावर माझे धाकटे बंधु म्हणाले, 'सोऽहम् साधना संसारी माणसाला करणे कठीण आहे.' असे सांगणारा कोण आहे ? मला पहावयाचे आहे.' मी दर महिन्याला पावसला जात असल्यामुळे एकदा त्याला घेऊन मी पावसला गेलो. मी पुढे जाऊन स्वामींना भाऊ आल्याचे सांगितले. स्वामींनी त्याला सकाळी दहा वाजता भेटावयास बोलावले. तो ज्या वेळेला आत आला त्या वेळेस त्याने स्वामींचे मांडीवर डोकेच ठेवले. स्वामी कोणालाही स्पर्श करू देत नसत. उलट स्वामींनी त्याला मिठी मारली. हे बघून मला आश्चर्य वाटले. तो इतक्या आनंदात आणि समाधानात बाहेर आला की, मला म्हणाला, 'मला साक्षात् रामकृष्णांचे दर्शन झाले.' स्वामींनी आपला सर्व ग्रंथसंग्रह आपल्या हाताने त्याला दिला. हे बघून मी भारावून गेलो. माझे बंधु सध्या कारवारला असून 'स्वामी भवेशानंद' या नावाने रामकृष्ण आश्रमाचे अध्यक्ष आहेत.

दर महिन्याला मी पावसला जात होतो. स्वामींच्या खोलीबाहेरच दारात मी झोपत असे. स्वामींची मी सर्व प्रकारे सेवा केली. स्वामींना पडवळ व मोसंबी फार आवडत असत. म्हणून मी या वस्तू जास्तीतजास्त पुण्याहून पाठवत असे किंवा पावसला जाताना घेऊन जात असे.

स्वामी सत्यदेवानंद हे स्वामींचे चरित्र लिहीत असताना एक दिवस मला अचानकपणे म्हणाले की, 'चरित्राची प्रुफं घेऊन पावसला स्वामींना दाखवावयास जा.' मी रात्रीचे बसने रत्नागिरीला जाण्यासाठी स्वारगेटला आलो. रत्नागिरी बसला चिकार गर्दी होती. मला जागा मिळणार किंवा काय या चिंतेत मी होतो. त्याच वेळेला एक इसम रिझर्वेशन घेऊन ओरडत माझेजवळ आला व रत्नागिरीला जायचे आहे का ? असे म्हणून मला रिझर्वेशन दिले व तो एकदम दिसेनासा झाला. माझेजवळ रिझर्वेशन असल्यामुळे गाडीत बसण्यास व्यवस्थित जागा मिळाली.

स्वामींनी १५.८.७४ रोजी समाधी घेतली. त्याचे आधी आठ दिवस पहाटे मला दृष्टांत दिला की, 'मी आता समाधी घेणार आहे.' मला जाग आली आणि वाईट वाटले. मी कुणालाही ते समाधी घेणार आहेत हे सांगितले नाही. समाधी घेतल्यानंतर मी पावसला गेलो. माझे हाताने स्वामींना समाधीस्थानी बसवले. माझेबरोबर श्रीयुत गोडबोले, श्रीयुत मारुतीबुवा व स्वामी सत्यदेवानंद होते.

स्वामींच्या अनुग्रहानंतर व सहवासानंतर माझे जीवन बदलले. मला आयुष्यात समाधान व शांतता मिळाली. कुठल्याही संकटाबद्दल भय अगर भीती वाटत नाही.'

**श्री. मेघश्याम तुलसीदास गांधी**
११४०, सदाशिव पेठ, गीताधर्म मंडळाजवळ,
पुणे ४११ ०३०.



# श्रीगणेशनाथ सद्गुरुंची कृपा

**श्रीमती मृणालिनी जोशी**

नामा मामा म्हणजे अप्पांचे मामा, केशवराव गोखले. हे मुंबईला गणपतभाऊंच्या आनंदी चाळीजवळच 'द्वारका' चाळीत रहात होते. त्यांचा अप्पांवर फार लोभ होता. ते नाथसंप्रदायी बाबामहाराज वैद्य यांचे अनुग्रहीत होते. अप्पांचा सात्विक पिंड ओळखून या आपल्या भाच्यालाही श्रीचरणी नेऊन ठेवावं या हेतूने त्यांनी त्याला मुद्दाम बोलावलं होतं. अप्पा स्वतःशीच म्हणाले, 'आईला कसं सांगायचं हे ? तिला वाटतंय निराळंच, पण मामांनी मला बोलावलय ते नश्वर नोकरीसाठी नव्हे, अक्षर आनंदासाठी !'

अप्पा लहानपणापासून गीतेचं, ज्ञानेश्वरीचं आणि इतर संतांच्या वाङ्मयाचं वाचन करीत असत. त्यात सद्गुरुदर्शनाचा उल्लेख आला, सद्गुरुकृपेचं वर्णन आलं की अप्पा अस्वस्थ होत. त्यांना वाटे, 'आपल्याला कधी होईल गुरुमाऊलीचं दर्शन?' अशा वेळी त्यांना आजोबांची आठवण व्हायची. बालवयात कानी पडलेले त्यांचे शब्द स्पष्टपणानं आठवायचे. 'ते म्हणाले होते तसे, सद्गुरु माझी खरोखरच वाट पाहत असतील का? ज्ञानेश्वर माऊलींनी दिलेल्या आश्वासनाप्रमाणे ते मला आपोआप भेटतील का? त्यांच्या भेटीला मी योग्य केव्हा होईन? निर्मळ कधी होईन?' असे अनेक प्रश्न अप्पांच्या मनात उभे राहत. ते बेचैन होत. तळमळ असह्य झाली की, विश्वेश्वराला हात जोडीत. त्याची मनापासून प्रार्थना करीत. आज त्यानं अप्पांची विनवणी ऐकली होती. त्यांची आर्तता जाणून सद्गुरुंचा सांगावा पाठवला होता. त्या मायमाऊलीनं माहेरवाशिणीला मूळ धाडलं होतं.

सद्गुरुभेटीच्या आनंदमय लाटेवर तरंगत अप्पा मुंबईला निघाले. तसाच मुंबईचा प्रवास. तशीच बोट, तोच समुद्र. तसं वरवर पाहिलं तर अप्पाही तेच. पण आज या वेळी त्यांना दिसत होते -

गहिनीनाथ आणि निवृत्तिनाथ.

निवृत्तिनाथ आणि ज्ञाननाथ.

ज्ञानदेव आणि मुक्ताबाई.

मुक्ताबाई आणि चांगदेव.

समर्थ रामदास नि शिवाजीमहाराज.

रामकृष्ण परमहंस आणि त्यांचे जगद्विख्यात शिष्य स्वामी विवेकानंद.

या गुरुशिष्यांच्या नुसत्या स्मरणानंही अप्पांच्या अंगावर रोमांच उभे राहात होते. सद्गदित होऊन ते म्हणत होते, 'मलासुद्धा असाच आनंद होईल ना ? कशी बरं अनुभूती येईल ? सद्गुरु स्पर्श होताक्षणी समाधी लागेल का ? विश्वाच्या पसाऱ्यामागे असणाऱ्या शक्तीचं कां आकलन होईल. मग आपल्याला या देहाची जाणीव राहील की नाही ? आपल्याला भीती तर नाही ना वाटणार ? नाहीतर विवेकानंदांसारखं आपणही ओरडू, घाबरून विचारू, बाबा ! अहो माझं करताहात तरी काय ?'

'बाबा !' अप्पांनी बाबांचं नाव मामांच्या तोंडून बरेचदा ऐकलं होतं. त्यांचा स्वभाव जरा कडक आहे म्हणतात. पारख केल्याशिवाय अपात्री उपदेश देत नाहीत. आपण उतरू का त्यांच्या कसोटीला ? एक ना दोन... अनेक प्रश्न. पण साऱ्यांचा विषय एकच. बाबामहाराज वैद्य ! त्यांच्याशिवाय दुसरं काही सुचेनासंच झालं अप्पांना !

अप्पांना घेऊन नानामामा पुण्याला आले. साऱ्या प्रवासात सद्गुरुसंकिर्तन चाललं होतं. मामा प्रेमभरानं, भक्तिभावानं सांगत होते आणि त्यांचा हा भाचा अधीर होऊन ऐकत होता. गुरुभेटीचा क्षण जसजसा जवळ येत होता, तसतशी अप्पांची उत्सुकता उत्कट होत होती.

बाबामहाराजांचे घर आले तेव्हा अप्पांचं हृदय धडधडू लागलं. नकळतच त्यांनी मामांचा हात धरला.

मामा-भाचे आत गेले. महाराज तक्क्याला टेकून बसले होते. समोर आवडती ज्ञानेश्वरी होती. अजून वाचनाला सुरुवात मात्र झाली नव्हती. नाना मामांना पाहताच त्यांच्या तेजस्वी मुखावर हलकीशी स्मितरेषा उमटली. नानांनी लगेच गुरुचरणी मस्तक ठेवलं. बाबांनी हात किंचित उंचावून आशीर्वाद दिला आणि अप्पांकडे पाहिलं.

'हा अप्पा. माझा भाचा. मी आपल्याला लिहिलं होतं यांच्याबद्दल.'

मामा बोलत असतानाच अप्पांनी पुढे होऊन बाबामहाराजांचे पाय धरले. मनोभावानं त्यांना वंदन केलं.

अप्पा उठून उभे राहिले तेव्हा बाबामहाराज त्यांना न्याहाळीत होते. दोघांची दृष्टादृष्ट झाली. मनोमनी ओळख पटली. अप्पांच्या मनानं कौल दिला की हाच आपला आधार, हेच आपले सद्गुरु !

'बाबा, वय लहान असलं तरी कर्तृत्व मोठं आहे. माझा भाचा म्हणून आपुलकीपोटी वाढवून नाही सांगत, खरोखरच मोठा गुणी मुलगा आहे आमचा अप्पा.' नानामामांना किती सांगू आणि किती नको असं झालं होतं.

बाबा नुसते हसले. ही सारी ओळख मामांनी करून द्यायची गरज

थोडीच होती ! दृष्टी टाकल्याबरोबर जर माणूस ओळखता आला नाही, त्याचा अनंत जन्मांचा प्रवास जाणता आला नाही, त्यांची तयारी अजमवता आली नाही तर मग सद्गुरुपदाची शान ती काय राहिली ! मुंगीचंही मनोगत जाणणाऱ्या त्या ज्ञानी पुरुषाला अप्पाचा भूतकाळ आणि भविष्यकाळ समोर स्वच्छ दिसला होता.

'याला आपल्या चरणी ठेवला आहे, बाबा.' नानामामा हात जोडून विनयानं म्हणाले.

'तुम्ही ठेवला आहे, पण त्यांची काय इच्छा आहे ?'' बाबांनी सारं काही समजूनही मुद्दाम प्रश्न केला. त्यांना अप्पांची इच्छा त्यांच्याच मुखातून ऐकायची होती. माऊलीनं म्हटलंच आहे ना, 'ते ही सांगती, पुशिले' - ते सांगतात. पण साधकानं पुसल्यावर. उत्सकतेनं, आर्ततेनं विचारल्यावर.'

'मी तर आपल्या कृपेसाठी कधीचा आसावलो आहे.' अप्पा सद्गदित होऊन म्हणाले. बाबांकडे पाहिल्यापासूनच त्यांना असं भरून येत होतं. आतून गलबलून येत होतं.

बाबांनी क्षणभर डोळे मिटून विचार केला. अंतरीची साक्ष घेतली आणि मग अप्पांकडे प्रेमळ दृष्टीनं पहात म्हणाले, 'उदयीक सकाळी या.'

बाबांना पुन्हा एकदा वंदन करून दोघं मामा-भाचे आनंदाने परतले.

रस्त्यानं येताना आणि रात्री झोपेपर्यंत दोघांच्या बोलण्याचा विषय एकच - 'बाबामहाराज वैद्य' अप्पा उत्सुकतेनं विचारीत होते आणि मामा तितक्याच उत्साहानं सांगत होते.

दुसरे दिवशी ते दोघं गुरुगृही येऊन पोहोचले तेव्हा बाबा आसनावर बसले होते. त्यांचे अर्धोन्मीलित नेत्र अंतरीच्या समत्वाची साक्ष देत होते.

मुखावरची प्रसन्नता मन वेधून घेत होती. परतत्त्वाचा स्पर्श झाल्याची ग्वाही देत होती. आनंदाची अनुभूती त्यांच्या अंगाअंगातून प्रतिबिंबित होत होती. त्यांच्या या दिव्य दर्शनानं अप्पा हेलावून गेले. भान हरपल्यागत तटस्थ उभे राहिले. नित्य परिचयामुळे मामा मात्र सावध होते. त्यांनी प्रथम बाबांना वंदन करून मग अप्पाला म्हटलं, 'ये... चरणांवर फुले वाहा. गळ्यात हार घाल. धर, हं ऽ- आता या उदबत्त्या लाव आणि श्रीफल देऊन नमस्कार कर.'

अप्पांनी आधी कृतज्ञेनं नाना-मामांना नमस्कार केला. 'अरे, अरे सद्गुरुंसमोर मला नाही हो नमस्कार करायचा. आपण साऱ्यांनी डोकं ठेवायचं ते त्यांच्या पायांवर.' असं म्हणत मामांनी अप्पांना हलकेच थोपटलं.

अप्पांनी बाबांची मनोभावानं यथासांग पूजा केली आणि प्रेमभरानं त्यांच्या चरणी मस्तक ठेवलं.

'बाबा महाराज' भावातच मग्न होते. स्वरुपानंदात लीन होते. पायांना स्पर्श झाला तेव्हा मात्र त्यांनी पापण्या वर करून अप्पांकडे पाहिलं. त्यांच्या त्या करुणामय दृष्टीनं अप्पांना जणू आपल्यात सामावून घेतलं.

बाबांनी 'बसा' अशी खूण केली तेव्हा अप्पा त्यांच्यासमोर बसले. बाबांनी बोलायला सुरुवात केली. त्यांचे शब्द खोल कुठूनतरी उमटल्यासारखे धीरगंभीर असे येत होते. ते म्हणाले,

'आपला नाथसंप्रदाय आहे. याचे आद्यप्रणेते आदिनाथ शंकर. त्यांनी पार्वतीमाईला उपदेश केला त्या वेळी मत्सीच्या पोटात असलेल्या मत्सेंद्रांनी तो सहजच ऐकला. ग्रहण केला. त्यांच्यापासून ही, 'सोऽहं' वर अधिष्ठित असलेली श्रेष्ठ परंपरा आपल्यापर्यंत चालत आली आहे. त्या सर्वांचं स्मरण करायचं. सिद्धांना आणि भगवद्भक्तांना वंदन करायचं आणि मग सद्गुरुंनी दाखवलेल्या खुणेप्रमाणे सोऽहं भजन करायचं.'

अप्पा पद्मासन घालून बसले. सद्गुरुंच्या मुखातून स्रवणाऱ्या रसवंतीचं ग्रहण करू लागले. त्यांच्या नेत्रांतून निघणाऱ्या अमृतमय तेजाला हृदयात साठवू लागले.

बाबांच्या मागोमाग उच्चार करू लागले –

*''ब्रह्मानंदं परमसुखदं केवलं ज्ञानमूर्तिम् ।*
*द्वन्द्वातीतं गगनसदृशं तत्त्वमस्यादिलक्ष्यम् ।*
*एकं नित्यं विमलमचलं सर्वधीसाक्षिभूतम् ।*
*भावातीतं त्रिगुणरहितं सद्गुरुं तं नमामि ॥१॥*
*प्रल्हाद नारद पराशर पुण्डरीक -*
*व्यासाम्बरीष शुकशौनक भीष्मदाल्भ्यान*
*रुक्मांगदार्जुन वसिष्ठ बिभीषणादीन्*
*पुण्यानिमान्परम भागवतान् स्मरामि ॥२॥*
*आदिनाथं मच्छिन्द्रं च गोरक्षं गहिनीं तथा*
*निवृत्तिं ज्ञानदेवाय देवचूडामणीभ्रमः*
*अखंडानंतरूपाय समज्ञान प्रदायिने,*
*भवभ्रान्ति विनाशाय*
*गुंडाख्य रामचंद्र महादेव*
*रामचंद्र... विश्वनाथ...''*

इतकं म्हणून 'गणेशनाथ सद्गुरुंना वंदन असो' असं नुसत्या शब्दांनीच न म्हणता अप्पांनी चटकन् पुढे वाकून बाबांच्या पायांवर मस्तक ठेवलं. गहिवरून म्हटलं, 'श्रीमत् सच्चिदानंद सद्गुरू गणेशनाथाय नमः ।'

शिष्याच्या हृदयात उचंबळून आलेला हा प्रेमभाव गणेशनाथांनाही जाणवला. त्यांनी अप्पांच्या पाठीवरून मोठ्या वत्सलतेनं हात फिरवला. म्हणाले, 'आता पुढची गुरुगम्य खूण नीट समजून घ्या. मंत्राचा अर्थ लक्षात घेऊन त्याच भावात नित्य रंगून राहायचं. असा सः अहं, सोऽहं भावाच्या जाणिवेनं केलेला अभ्यास तत्काळ सिद्ध होतो.'

बाबामहाराजांनी तीन वेळा मंत्र उच्चारला. अप्पांकडून म्हणून घेतला. मग 'सोऽहं' ची प्रक्रिया समजावून दिली. त्यांच्याकडून करूनही घेतली. म्हणाले,

*'सोऽहं आत्मा स्वानंद घन । अजन्मा तो तोचि जाण ।*
*हे चि सद्गुरुचे वचन । सुदृढ धरावे ॥'*

यालाच गीतेत भगवंतांनी, 'ॐ इत्येकाक्षरं ब्रह्म' असं म्हटलं आहे. आमच्या ज्ञानाईमाऊलीच्या शब्दांत सांगायचं तर -

*'पै गुरुशिष्यांचिया एकांती ।*
*जे अक्षरा एकाचि वदंती ।*

असे हे 'सोऽहं' स्वरूपी एकाक्षर आज तुम्हाला समजावून सांगितले आहे.'

माऊलीची आठवण निघाल्याबरोबर बाबांचं लक्ष समोर

व्यासपीठावर ठेवलेल्या ज्ञानेश्वरीकडे गेले. किंचित्काळ डोळे मिटून त्यांनी पोथी उघडली. अध्याय निघाला चौथा आणि ओवी समोर दिसली ती एकशेबहात्तरावी.

***'आजच्या दिवसासाठी माऊलीनं हा जणू संदेश दिला आहे आपल्याला.' बाबामहाराज प्रसन्नपणानं म्हणाले आणि ओव्या वाचू लागले,***

***'जरी कल्मषाचा आगरु । तूं भ्रांतीचा सागरू ।***
***व्यामोहाचा डोंगरू । होऊनि असलि ॥***
***तरी या ज्ञानशक्तिचेनि पाडे । हे आघवेंचि गा थोकडे ।***
***ऐसे सामर्थ्य असे चोखडे । ज्ञानी इये ॥***

ऐकलंत रामभाऊ, आपल्यासारख्याच्या मनात येतं की हे आपल्याला कसं जमावं ? आपण अज्ञानी, आपण चुकणारे, मोहाच्या पाशात गुंतणारे, आपल्याला हे ज्ञानाचे स्वरूप कसे कळावे ? पण बाबांनो, हे ज्ञान इतके शक्तिसंपन्न आहे, इतके प्रकाशमय आहे, इतके दैदिप्यमान आहे की इथे तू जरी पातकांचं आगर असलास, भ्रमाचा सागर असलास किंवा महामोहाचा डोंगर असलास तरीसुद्धा या ज्ञानाच्या सामर्थ्यानं तुझी ती अगणित पापं भस्म होऊन जातील. भ्रमाचा सागर आटून जाईल. महामोहाचा डोंगर जमीनदोस्त होईल आणि अज्ञानाचा अंधार फिटून तू प्रकाशमय होशील.'

'हे राजविद्येचं ज्ञान कसं आहे ते श्रीकृष्णानं नवव्या अध्यायात आणखी स्पष्ट केलं आहे. भगवंत म्हणतात -

***'जे जाणितलेयासाठी । संसार संसाराचिये गाठी ।***
***लावुनि बैसवी पाटी । मोक्षश्रियेच्या ॥***
***आणि धर्माचे निजधाम । तेविंचि उत्तमाचेंही उत्तम ।***
***पै जया येतां नाही काम । जन्मांतराचे ॥***
***पै गा आणिकही एक याचे । जे आता आलिया न वचे ।***
***आणि अनुभविता काही न वेचे । वरी विटेहि ना ॥'***

'हे ज्ञान नुसतं शब्दांचंच नव्हे तर अनुभूतीचं आहे. आणाभाकांचं नसून रोकडी प्रचीती अनुभवण्याचं आहे. एकदा हे जाणले की संसाराचा पाश आपोआप गळून पडतो. म्हणजे काय होतं की या देहाची आणि जन्ममरण असणाऱ्या या संसाराची ते ज्ञान परस्पर गाठ घालून देते आणि एकदा साधकाला देहापासून अलिप्त होता आलं की तो सहजच मोक्षश्रीच्या सहवासात अखंड आनंद भोगतो. असं हे उत्तमातलं उत्तम सर्वोत्तम ज्ञान आहे, हे मिळालं की मग, 'पुनरपि जननं पुनरपि मरणं' हा फेरा थांबलाच म्हणून समजावं.

'गुरुमुखातून 'मोटकं'च बाहेर पडणारं, पण शिष्याच्या हृदयात नित्य सिद्धच असलेलं हे ज्ञान आणखी कसं आहे ? अहो, या ज्ञानाचा विशेष हा की इतर वैषयिक सुखासारखा याचा आनंद अनुभव घेऊन विटत नाही. कितीही आस्वाद घ्या, याची गोडी कणानंही कमी होणार नाही. गोडी कमी होत नाही तसं हे ज्ञानही कमी होत नाही. संपत नाही. बरं, ठेवून ठेवून विटेल म्हणता ! तर तेही नाही... 'वरि विटेहि ना !''

'अक्षय, अव्यय, नि आनंदमय अशी ही राजविद्या आपल्याला सद्गुरुकृपेनं लाभली आहे. आता तिचाच अभ्यास करा. सोऽहं- सोऽहं- सोऽहं-''

बोलता बोलता बाबामहाराज भजनात तल्लीन झाले. सद्गुरुमुखींची वचनं कानामनाची मिळणी करून, जिवाभावानं श्रवण करत असलेल्या अप्पांचीही भावसमाधी लागली आणि नानामामा हा सुखसोहळा देखून आनंदाच्या लाटेवर तरंगू लागले. सर्वच स्वानंदात रंगून गेले.

असा थोडा वेळ गेला आणि अप्पांची भावसमाधी उतरली. सोऽहं वृत्ती ओसरली नि देहबुद्धी जागृत झाली. आनंदाच्या आकाशात विहार करणारं मन पृथ्वीवर येऊन उभं राहिलं. आपण पुन्हा पूर्वस्थितीतच आलो म्हणून अप्पा खट्टू झाले. त्यांना वाईट वाटलं. ते स्पर्शाबरोबर होणारं परिवर्तन, ते दृक्‌पातासरशी होणारं आत्मज्ञान, ते दैवी स्थित्यंतर यांतलं आपल्या बाबतीत काहीच कसं घडलं नाही ? थोडा वेळ आनंद झाला खरा. देहभाव विसरला होता खरा, पण ती अनुभूती लगेच कशी नाहीशी झाली ? अप्पांना या विचारानं चैन पडेना. याचं कारण विचारायचं कुणाला ? गुरुंनाच ना ? अखेर त्यांनी मनाचा हिय्या करून विचारलंच. म्हणाले, 'महाराज, आतापर्यंत जे वाचलं ते आज अनुभवाला कसं आलं नाही ?'

'काय वाचलंत ?'

'संत म्हणतात की सद्गुरु शिष्याला तत्काळ आपल्यासारखं करतात. सद्गुरुपदी नेऊन बसवतात. परिस लोहाचं सोनं करतो. पण सद्गुरुकृपेचा परिस शिष्याला परिसच करतो. हे जर खरं असेल तर मला तसाच अनुभव का आला नाही ?'

बाबा महाराज किंचित हसले. जरा वेळ स्तब्ध बसून म्हणाले, ''तुम्ही म्हणता तसे तत्काळ मुक्त होणारे मुमुक्षू फार थोडे आहेत. अशा व्यक्ती जवळ जवळ सिद्धावस्थेला आधीच पोहोचलेल्या असतात. माऊलीनं अठराव्या अध्यायात म्हटल्याप्रमाणे,

***'कानावमनाचिये भेटी । सरिसाचि पै किरीटी ।***
***वस्तु होऊनियां उठी । कवणी ऐकु जो ॥'***

किंवा

***'परि हेचि आत्मसिद्धि । जो कोण भाग्यनिधि ।***
***श्रीगुरुकृपालब्धि । काळी पावे ॥***
***तैसे ज्या कोणासी दैवे । गुरुवाक्य श्रवणाचि सवे ।***
***द्वैत गिळोनि विसंवे । आपणपा वृत्ति ॥'***

अशी तत्क्षणीच पूर्णबोधावर येणारी माणसं अपवादात्मक आहेत. ती अवतारी असतात. त्यांची उदाहरणं आपल्यासाठी नाहीत. आपल्याला झटून अभ्यास केला पाहिजे. प्रयत्न केला पाहिजे.

'प्रयत्न करायचा म्हणजे काय करायचं, महाराज ?'

'आता तुम्हाला दाखवलं तसं सोऽहं भजन करायचं. मनाची लय साधायची.'

'महाराज, मला येईल ना ?'

'यायलाच हवं. हे बघा रामभाऊ, हळूहळू सर्व होईल. धीर धरायला पाहिजे. अहो, आपण दुधाला विरजण लावतो. विरजण लावल्यावर लगेच त्याचं दही होतं का ? नाही ना ? बरं, ते दही होत नाही. मग दूध राहते का ? तसेच आहे. हे परिवर्तन व्हावं म्हणून दुधात दही घातलं आहे. योग्य वेळी आपोआप त्याचा परिणाम दिसून

येईल. तुकाराम महाराज म्हणतात, 'तिथे चालत नाही तातडी,' प्राप्त काळ- घडी आल्यावर सर्व घडतं. सूर्योदय झाल्यावर लगेच काही दुपार होत नाही. बरं तुम्हाला अनुभव आला नाही असं नाही. थोडा वेळ तल्लीन झाला होतात ना ?'

'होय.'

'मग आता त्या थोडा वेळ आलेल्या अनुभवाचाच ध्यास घ्यायचा. सोऽहं- तो मी... ते चिरंतन् 'सत्-चित् आनंदमय' असलेलं तत्त्व तेच मी या भावाचा नित्य अभ्यास करायचा. म्हणजे आपोआप पूर्ण स्थितीचा अनुभव येईल.'

अप्पा आणि मामा बाबामहाराजांचा निरोप घेऊन निघाले तेव्हा महाराजांनी अप्पांना पुन्हा जवळ बोलावलं. त्यांना थोपटल्यासारखं करून म्हटलं, मनात विकल्प नको. स्वतःचा उद्धार स्वतःच करायचा असतो. आपणच कष्ट करायचे. काय लक्षात ठेवायचं ? -

'जितकी भक्ती तितकी प्राप्ती.'

अनुभव हवा ना ? मग अभ्यास हवा ?'

अभ्यास अभ्यास अभ्यास

**श्रीमती मृणालिनी जोशी**
'अमृता' फ्लॅट नं. ४७, तुळशीबागवाले कॉलनी, सहकार नगर नं. २, पर्वती, पुणे २.

(अमृतसिद्धी या पुस्तकावरून पुनर्मुद्रित.)

## 'सारथी'

देहरूपी रथाचा या जीव झाला रथी
इंद्रियांचे घोडे त्यांची काय सांगू गती
विषयांचा महामार्ग संपता संपेना
देह झाला वृद्ध पण भोगणे टळेना

घोडे वेगात धावले, त्यांना नाही आवरले
तेव्हा आवरू पहाता बळ हातातले गेले
मन-बुद्धीचा लगाम उपयोग नाही केला
'मी' च सारथी राहीन वेडा हट्ट उगा केला
विकलांग देह झाला, त्याचा मोह कां मी केला ?
बाल्य अज्ञानात गेले, काळ तारुण्याचा गेला.
आता अंत नको पाहू पसरले दोन्ही बाहू
'तू' च होसी रे सारथी वाट किती वेळ पाहू ?

**सौ. मंजिरी कुलकर्णी**

# पावसचा महान योगी - स्वामी स्वरुपानंद

**सौ. प्रभा करंदीकर**

*रेल्वे खात्यात ३१ वर्षे नोकरी. नंतर स्वेच्छानिवृत्ती. दासबोध अभ्यास, समर्थ विद्यापीठ शिवथर घळ उपासक. पदवी परीक्षा उत्तीर्ण. मानीनी मासिकातून अध्यात्मिक व सामाजिक लिखाण.*

सोऽहं साधना म्हटली की पावस येथील संत स्वरुपानंद यांची शांत, प्रसन्न, तेजस्वी, आत्मतृप्त व त्यामुळेच आत्मानंदी सदैव मग्न अशी मूर्ती नजरेसमोर उभी राहते. सद्गुरु कसा असावा याचा मूर्तिमंत आदर्श त्यांच्यांत आपल्याला दिसून येतो. श्रीसमर्थांनी दासबोधात सद्गुरु लक्षणे सांगताना म्हटले आहे की -

***'मुख्य सद्गुरुचे लक्षण । आधी पाहिजे विमळ ज्ञान ।***
***निश्चयाचे समाधान । स्वरुपस्थिती ॥५-२-४५॥***
***याहीवरी वैराग्य प्रबळ । वृत्ति उदास केवळ ।***
***विशेष आचारे निर्मळ । स्वधर्मविषई ॥५-२-४६॥'***

शुद्ध ज्ञान, स्वरुपानुसंधान, प्रखर वैराग्य, उदासीन (अलिप्त) वृत्ती, निर्मल शुद्ध आचरण या गोष्टी आपल्याला स्वामींचे ठायी दिसून येतात. स्वधर्मआचरणाविषयी म्हणाल तर हा योगी पुरुष सदैव -

***'स्वरुपी रहावे तत्वतां । स्वरूप होऊनी ।'***

या समर्थोक्तिनुसार नित्य स्वरुपानुसंधानात असे.

सर्व संतांचे एक वैशिष्ट्य आहे. त्या सर्वांना आलेला आत्मानुभव सारखाच असतो आणि आत्मज्ञानतृप्त अशा या संतांना हाच अनुभव शिष्यांना - सत्पात्र शिष्यांना द्यावासा वाटतो म्हणूनच मुमुक्षूने संतांना पूर्णपणे शरण जावे. स्वामी स्वरुपानंद म्हणायचे -

***'जन्मोनिया काय साधिले स्व-हित ।***
***केली यातायात प्रपंचाची ॥***

'बुडते हे जन देखवेना डोळा' अशी या संतांची स्थिती म्हणून ते सतत अत्यंत तळमळीने स्व-हित साधा - नरदेह सार्थकी लावा - स्वहित साधा असा सतत उपदेश करतात.

खरोखर स्वामी स्वरुपानंद हे विसाव्या शतकातील एक असामान्य व्यक्तिमत्त्व ! ७०० वर्षापूर्वीची भाषा सामान्य माणसाला समजायला कठीण हे लक्षात घेऊन दुर्गम वाटणारे ज्ञानेश्वरी, अमृतानुभव, चांगदेवपासष्टी, गीता यासारखे ग्रंथ आधुनिक मराठी भाषेत स्वामींनी सर्वसामान्यांसाठी उपलब्ध करून दिले.

मूळ भाव यत्किंचितही न बदलता, स्वामींनी अनुवाद केलेल्या सोप्या, सुंदर अभंगांतून गहन तत्त्व कसे उलगडून दाखवले आहे ते आपण पाहू या -

***मूळ ओवी - आपुलिया बुबुळा । दृष्टि असोनि अखम डोळा ।***
***तैसा आत्मज्ञानी दुबळा । ज्ञानरूप जो ॥३१॥ (चां. पा.)***
***अनुवाद - पाहू शके काय दृष्टिलीच दृष्टि । असोनिया शक्ति देखायाची ॥६४॥***
***तैसी स्वयमेव वस्तु जी चिद्घन । आपणा आपण जाणे कैसी ॥६५॥***
***मु.ओ. - जयाचेनि आयांगपाते । बद्ध मोक्षपणी आतें ।***
***भेटे जाणतया जाणते । जयापाशी ॥४॥***

*(अमृतानुभव प्रकरण २)*

***अनु. कृपादृष्टिक्षेप । जयाचा होताच । बंधचि तो साच । मोक्ष होय ॥९॥***
***ज्ञाता ज्ञेय ज्ञान । सर्वथा आटोन । भेटे शुद्ध ज्ञान । जयापाशी ॥१०॥***
***मु.ओ. आपणचि निउनि दुहिता । की न मम म्हणे पिता ।***
***तो सुटे की प्रतिग्रहिता । जावाई शिरके ॥२३४॥ ज्ञाने. अ. १८***
***अनु. पिता आत्मजेचे करोनिया दान । 'न मम' म्हणोनि मुक्त होई ॥४२४॥***
***परी तो जामात तिजस्वीकारोन । ममत्वे गुंतोन जाय जैसा ॥४२५॥***

ही आधुनिक मराठी आपल्या परिचयाची. त्यामुळे अर्थ स्पष्टपणे उलगडत जातो.

हे भाषेचे सौंदर्य प्रासादिकच म्हणून अधिकच वेड लावणारे ! सर्वसामान्य माणसाने हे ग्रंथ अभ्यासावे ही त्यांची तळमळ.

माणूस सुखासाठी आयुष्यभर धडपडत असतो. पण आयुष्याच्या सायंकाळी त्याच्या लक्षात येते की केलेली धडपड व्यर्थच गेली. सुख तर लांबच राहिले. वस्तुतः मनुष्याचा आत्मा सुखरूपच आहे कारण आनंद, सुख, शांती, समाधान हे तर त्याचे मूळ स्वरूपच आहे पण देहबुद्धिमुळे हे विसरून निरनिराळ्या विषयांच्या द्वारा मिळणाऱ्या सुखासाठी तो आयुष्यभर धडपडतो, त्यापायी अनेकानेक उपाधि मागे लावून घेतो, त्यापायी वेदना, क्लेश भोगीत राहतो आणि सुख मात्र मृगजळाप्रमाणे लांबच लांब जाताना दिसते. अगदी त्याला वेडावीत राहते म्हणा ना ! कधी कधी अपेक्षित सुख त्याला मिळालेसे वाटते. पण कालांतराने त्यातील मिथ्यत्व त्याच्या लक्षात येते. क्षणभंगुरत्व समजते.

मग काय ? आयुष्यात स्वस्थ बसून राहायचे का ? नाही. कारण संसार / प्रपंच पूर्णपणे टाळता येणार नाही हे खरे पण -

'संसार त्याग न करता । प्रपंच उपाधि न सांडता' त्याच संसारात साक्षीभावाने राहता येणार नाही का ? आपला स्वधर्म (कर्तव्यकर्म) पार पाडीत असताना उपाधि, व्याप वाढणारच. पण मनुष्याने त्यात आसक्त होता कामा नये. वैभवाची- होय, ऐहिक वैभवाची अपेक्षा ठेवावी पण त्यात लिप्त होऊ नये. वैभव सन्मार्गाने येईल याविषयी जागरूक राहावे. खोट्या सुखाच्या मागे धावताना 'जनामाजि सार्थकता

विचारेचि होय' हे विसरून कसे चालेल ?

चिंता, दुःख, अपयश, कोणालाच नको असतात. मग त्या दूर करता येणे शक्य आहे का ? असल्यास, कशा तऱ्हेने ? याचा विचार करण्यासाठी माणसाला ईश्वराकडून मिळालेल्या असामान्य देणगीचा- बुद्धीचा वापर करून निर्णय घ्यायला हवा. जगद्गुरु शंकराचार्य देखील म्हणतात, 'हे मूढा ! विचार कर.' 'कस्त्वं ? कोऽहं ? कुत आयातः ? का मे जननी, को मे तात : ?' याचा शोध घे. आईच्या गर्भात असताना सोऽहं म्हणणारा जीव बाहेरच्या विश्वात पदार्पण करताच देहबुद्धिच्या प्रभावाने कोऽहं म्हणू लागतो आणि 'मी कोण' हा प्रश्न मृत्यूपर्यंत त्याचा पाठपुरावा करतो. अत्यंत तळमळपूर्वक या नरदेहातच कोऽहंचा शोध घ्यायला हवा तेव्हा कोठे सोऽहं चा साक्षात्कार होईल. स्वामी म्हणतात, सोऽहं साधनेने अद्वैताचा शोध घेणे शक्य आहे. नवविधा भक्तितील शेवटची पायरी म्हणजे आत्मनिवेदन आणि आत्मनिवेदन म्हणजे सोऽहं. म्हणूनच स्वामी स्वरुपानंद म्हणतात -

*'कैसा होतो सोऽहं शब्देवीण ध्वनि घेई विचारोनि संतांपाशी ।'*

'सोऽहं' 'तोच मी', 'सः अहं' स्थूल शब्दांपलिकडे जाऊन सूक्ष्म असा, श्वासाबरोबर होणारा सोऽहं ध्वनि ऐकायचा आहे. सोऽहंमधून स् व ह् काढला तर काय उरते ? 'ओम्' व ॐ हेच एकाक्षर ब्रह्म आहे. मी व ब्रह्म एकच आहोत असा अनुभव आला की मग –

*'धन सुत दारा असो दे पसारा । नको देऊ थारा आसक्तीने ।*
*स्वामी म्हणे राहे देही उदासीन । पाहे रात्रंदिन आत्मरूप ॥*

या स्वामींच्या अभंगओळी ध्यानी येतात. ते म्हणतात, धन, सुत, दारा हा पसारा भोवती असू दे. तेथेच आपल्याला अलिप्तपणे साक्षीपणे राहता आले पाहिजे. 'मी' व 'माझे' जाऊन 'तू' व 'तुझे' मनी ठसले तरच अलिप्तता / साक्षित्व येऊ शकेल. 'मी' व 'माझे' जाताच कर्तेपणाचा वृथा अभिमान, देहभाव नष्ट होतो व त्याच क्षणी 'तू' व 'तुझे' हा भाव स्थिर होतो. तरीदेखील सः अहं हा द्वैतभाव राहिलाच हेही जाऊन 'मी' नाहीच सर्व काही 'तूच' आहेस - हा खरा बोध पूर्ण बोध होय. मग 'मी' शिल्लकच राहात नाही.

*'तत्त्वी गुंतता म्हणे कोऽहं । विवेक पाहता म्हणे सोऽहं ।*
*अनन्य होता अहं, सोऽहं मावळली ॥'*

साहजिकच मग जीवनातील कर्तव्यकर्मे चालू राहतातच पण निष्काम व अलिप्त भावाने ती पार पाडली जातात. आत्मभाव स्थिर होतो. हाच भाव मग दृढ होत जातो व एक क्षण मग असा येतो की साधक अंतरात्म्याला जाणतो. आत्मरूपच होतो. मग त्याच्याभोवती वैभव, सुखसाधने, पुत्र, कन्या, पती, पत्नी यांचा पसारा असला तरी साधक अलिप्त, उदासीन अगदी स्थितप्रज्ञ होऊन राहतो आणि -

ही किमया सोऽहं साधना घडवून आणते. संत एकनाथ म्हणतात, 'प्राणाचे गमनागमन, तेथे सोऽहं, हंसःचे नित्य धान.' - श्वास घेताना सः, सोडताना हं - माणसाचा श्वासोच्छवास जन्मापासून मृत्यूपर्यंत अखंड चालू असतो. म्हणून हा अजपाजप होय. स्वामी स्वरुपानंद म्हणूनच म्हणतात,

'नाभिपासोन ब्रह्मरंध्रांत सोऽहं ध्वनि असे खेळत' मात्र या सोऽहंच्या जपाला सदाचार, सद्हेतू यांचीही जोड हवीच. आपले कुळाचार कुळधर्मही योग्य प्रकारे पार पाडायला हवे असतात.

समर्थांनी टाकळीला १२ वर्षे तप केले आणि त्यांना श्रीरामदर्शन झाले. अगदी त्याचप्रमाणे स्वामींनीदेखील १९३५ ते १९४७ हा बारा वर्षांचा काळ अखंड सोऽहं साधना केली आणि त्यांना साक्षात् विष्णूचे दर्शन झाले. पावससारख्या गावी ४० वर्षे एकांतात राहून या संताने दिव्यानुभूती घेतली. १९३४ साली अगदी तरुण वयात, वयाची जेमतेम तिशी उलटते न उलटते तोच केवळ सहा महिन्यांच्या आजाराने स्वामींची शारीरिक शक्ति हिरावून नेली, ते बरे झाले खरे. पण त्यामुळे त्यांचा जणू पुनर्जन्मच झाला. जीवनाची दिशाच बदलून गेली. अखंड सोऽहं साधनेद्वारा त्यांनी ईश्वरदर्शनाची दिव्यानुभूती प्राप्त करून घेतली.

पावस सोडून स्वामी कधीही कोठेच गेले नाहीत. या उत्तुंग व्यक्तिमत्त्वाच्या आत्मज्ञानी संताला भेटण्यासाठी अनेक श्रेष्ठ व्यक्ती पावसला आल्या. त्यात श्रीगोळवलकर गुरुजी, सरसंघचालक हेदेखील होते. श्रीश्रीधरस्वामी व संत दासगणूमहाराज यांना स्वामींचे भेटीचे आमंत्रण मिळताच तेही पावसला स्वामींना भेटायला आले होते.

एखाद्या विवेकी, शांत, अगदी वैराग्याची मूर्ती असलेल्या आपल्या प्राचीन ऋषींप्रमाणे स्वामी अनेक वर्षे एकांतात पावसला राहिले. ते अत्यंत कमी बोलत. तेही दर्शनार्थीशीच. दर्शनार्थीच्या हातात ते एखादा ग्रंथ देत आणि तो उघडून कोणतेही पान वाचायला सांगत आणि आश्चर्याची गोष्ट म्हणजे तेथेच त्याला स्वतःच्या प्रश्नांची उत्तरे मिळत. याचा अर्थच असा की स्वामी अंतर्ज्ञानी होते. समोरच्या माणसाचे मन, विचार त्याच्या समस्या, दुःख त्यांना अंतर्ज्ञानाने कळायचे.

नंतर नंतर तर ते एखादाच शब्द बोलत. अखंड सोऽहं साधना चालूच असे. ते सदैव आत्मानुसंधानात असत. एवढे असूनही दैनंदिन कार्यक्रम सावधपणे चालूच असत. स्वामी दैवी गुणसंपन्न होते. संत हे भूमीवरचे चालते-बोलते ईश्वरच होत. ज्ञानी पुरुष एका जन्मात अचानक ज्ञानी होत नसतात. अनेक जन्मांच्या सुकृत संचयाने ते आत्मज्ञानी, साक्षात्कारी संत या पदवीपर्यंत पोचलेले असतात. ते जीवनमुक्तच असतात.

अशा साक्षात्कारी संतांचे वाङ्मय प्रासादिकच असते. स्वामींचे गद्य वाङ्मय कमीच आहे. मात्र त्यांचे पद्यवाङ्मय विपुल आहे. परतत्त्वस्पर्श हा त्यांच्या काव्याचा आत्मा आहे. अमृतधारा, मृत्यूपत्र, संजीवनी गाथा यासारखे त्यांचे ग्रंथ त्यांची अलौकिक व प्रासादिक प्रतिभा, कवित्वशक्ति दर्शवतात. संजीवनी गाथेतील त्यांचे शब्द , अभंगरचना अप्रतिम आहेत.

*आता तुझे पाय न सोडि विठ्ठला ।*
*जावो जरी गेला जीव माझा ॥*
*यातील आर्तता हृदयाला जाऊन भिडणारी आहे - तर*
*अखंड एकांत आवडे जीवास ।*
*लौकिकाचा त्रास वाटतसे ॥*

या ओळी त्यांची एकांतप्रियता तसेच परमविरक्ती यांच्याच निर्देशक नाहीत का ?

स्वामींच्या पूर्वायुष्यात त्यांनी आश्रमशाळा, जी स्वावलंबनाश्रम शाळा म्हणून ओळखली जाई काढली होती. राष्ट्रीय चारित्र्य उंचावणारे शिक्षण तिथे दिले जाई. ब्रिटिश राज्यात हा देशद्रोहच समजला जायचा. साहजिकच सरकारी भीतीने शाळेला हवा तेवढा प्रतिसाद मिळाला नाही. महात्मा गांधींच्या स्वातंत्र्य चळवळीतदेखील स्वामींनी काही काळ तुरुंगवास भोगला आहे. असे हे तेजस्वी, क्रांतिकारी व्यक्तिमत्त्व होते.

मात्र १९३४ मध्ये झालेल्या ४-६ महिन्यांच्या आजारात त्यांना प्राणांतिक धक्का बसला. शरीर अशक्त झाले तरी उर्वरित जीवन त्यांनी ईश्वरार्पण केले. अखंड सोऽहं साधनेचे व्रत घेतले. स्वामी त्याला सोऽहं भजन म्हणत. आजारामुळे फार मोठी शारीरिक हानी होऊनही ते खचले नाहीत. ते, अचानक परिवर्तन (त्यांचा पुनर्जन्मच जणू) त्यांनी स्वीकारले. प्रथमपासून संत वाङ्मयाचा अभ्यास होताच संस्कृत भाषेवर प्रभुत्व होते. घरात धार्मिक वातावरणाचे संस्कार होते. याचबरोबर गीतेसारख्या धार्मिक ग्रंथाचे पाठांतरही होते. या सर्व गोष्टी साधनेच्या वाटचालीत स्वामींना वरदानच ठरल्या. त्यातही आजारातून उठल्यावर स्वामींची साधना तीव्र झाली.

मृत्यूची चाहूल लागून तो परत गेला की माणसाची मनोवृत्ति, स्वभाव सर्वच बदलून जाते. दृष्टिकोन व्यापक होतो. उर्वरित आयुष्य हे बोनस मिळालेले आयुष्य आहे, असे वाटते. जीवनाकडे बघण्याची दृष्टीच आमूलाग्र बदलून जाते.

तसेच स्वामींचेही झाले असणार. आजारानंतर मिळालेले जीवन हे आता माझे नसून ईश्वराचेच आहे. या भावनेनेच त्यांनी ते जीवन ईश्वरी कार्याला अर्पण केले असावे.

मात्र या आजारातून उठल्यानंतरच्या त्यांच्या कार्याने त्यांना अमर केले. माऊलींनी म्हटलेच आहे की -

*तै शरीरभाव नासती । इंद्रिये विषय विसरती ।*
*जै सोऽहं भाव प्रतीती । प्रगट होय ॥ २-३०१॥*

मी देह आहे, या बोधापासून मुक्त होऊन मी तो परमात्मा आहे, असा बोध होण्यासाठी जीवाच्या पूर्वपुण्याईने त्याला अद्वैत ग्रंथाची गोडी लागते. त्यातूनच तो प्रगती करीत असताना सद्‌गुरुकृपेने श्वासोच्छ्वासाबरोबर सोऽहं करण्याची रीत कळली की देहभाव गळून जाऊन आत्मबोध प्राप्त होतो. विषयांपासून पूर्णपणे परावृत्त होऊन साधकाला परमात्म प्राप्ती होते व त्याचे जीवन सफल होते.

सोऽहं भावानेच अंतर्बाह्य जे व्यापलेले आहेत अशा स्वामी स्वरुपानंदांच्या पायाशी विनम्र होताना त्यांचेच एक नमन म्हणू या -

*नमितो योगी थोर विरागी तत्त्वज्ञानी संत ।*
*तो तत्त्वविवर परात्पर सद्‌गुरु ज्ञानदेव भगवंत ॥*

**सौ. प्रभा करंदीकर**
४०१, माणिकदीप - श्री २२, तुळशीबागवाले कॉलनी,
सहकार नगर नं. २., पुणे ४११ ००९.



# आज मी परमहंस पाहिला

**श्री. भा. द. खेर**

*एम. ए. रविवार केसरी व सह्याद्रीचे निवृत्त संपादक.*
*अनेक सामाजिक व ऐतिहासिक पुस्तकांचे लेखन / संपादन.*

सत्पुरुषांचे दर्शन हे नेहमी योगायोगानेच घडत असते. दर्शन घ्यायचे म्हणून ते कधी घडत नाही किंवा टाळायचे म्हणून टळत नाही. श्रीसमर्थ स्वामी स्वरुपानंद यांच्या बाबतीत मला हाच अनुभव आलेला आहे.

स्वामी स्वरुपानंदांचा 'अभंग' ज्ञानेश्वरी हा प्रासादिक ग्रंथ प्रसिद्ध झाला, तेव्हा त्या ग्रंथावर 'केसरी' त अभिप्राय देण्याच्या निमित्ताने स्वामीजींचे नाव प्रथम कानांवर आले. तो अलौकिक ग्रंथ मी त्याच वेळी सहज चाळून बघितला आणि प्रत्येक अभंगात मला दैवी प्रसादाचा साक्षात्कार घडला. त्या ग्रंथाने मनात कायमचं घर केलं. पण त्या दैवी ग्रंथाचा आणि ग्रंथकर्त्याचा संबंध तेथेच राहिला. पुढे तो विस्मृतीत दाखल झाला. नवे वाचन-लेखन होत राहिले.

कारणपरत्वे कित्येक जुन्या स्मृती, विस्मृतींचा कोश फोडून स्मृतीपृष्ठावर येतात तसाच प्रकार घडला. १ ऑगस्ट १९६९ रोजी लोकमान्य टिळकांची पन्नासावी पुण्यतिथी रत्नागिरीला माझ्या अध्यक्षतेखाली साजरी झाली. ही पुण्यतिथी रत्नागिरीच्या नगरपालिकेतर्फे फार मोठ्या प्रमाणावर साजरी झाली. त्या वेळी रत्नागिरीला चार दिवस माझा मुक्काम होता. तेथील कार्यक्रम आटोपल्यावर पावस आणि गणपतीपुळे येथे जाऊन दर्शनाचा कार्यक्रम करण्याचा मानस त्या वेळचे तरुण नगराध्यक्ष श्री. बने यांना मी बोलून दाखविला. त्यांनीही अर्थात मान्यता दिली.

कोकणचा पाऊस कोसळत होता. त्या तशा धुंवाधार वृष्टीत मी गणपतीपुळ्याला जाऊन आलो. तेथून आल्यावर पावसला जाण्याचे मी ठरवले. पण ठरवणारा मी होतो, माझा तो दर्शन-कार्यक्रम पार पाडण्याचे ठरवणारा दुसराच कोणीतरी होता. त्या 'कोणाला' मला शरण जावे लागले. पर्जन्यवृष्टी कोसळतच होती. दर्शनाच्या वाटेवर पाणी पडले. मी त्या वेळी पावसला जाऊ शकलो नाही. पुण्यात परतल्यावर पावसातील पाण्यात पारखे झालेले पावस विसरून गेले. दैनंदिन कार्यक्रमात बुडून गेलो.

गेले वर्ष फारच गडबडीत गेले. या वर्षीच्या प्रारंभापासून मात्र स्वामींच्या दर्शनाची ओढ लागली. 'काशीस जावे, नित्य वदावे' असा प्रकार चालू होता. पण योग जुळून येत नव्हता.

२४ नोव्हेंबरला कोल्हापूरला परिषद होती. त्या परिषदेला उद्घाटक म्हणून मला निमंत्रण आले. त्या निमित्ताने कोल्हापूरला माझे आणखी एक व्याख्यान ठेवण्यात आले. कोल्हापूरच्या या निमंत्रणावर मी अक्षरशः झडप घातली. कोल्हापूरची दोन व्याख्याने आटपून पावसला जाण्याचा संकल्प मी सोडला. आणि त्या संकल्पाची या खेपेस सिद्धी झाली. स्वामीजींच्या दर्शनाचा योग हा असा आला. माझ्याबरोबर सौ. संजीवनी हिनेही येण्याचा हट्ट धरला. दोघांचेही योग मोठे जबरदस्त होते हीच गोष्ट खरी ! माझे परममित्र श्री. ग. दि. माडगूळकर हे कोल्हापूरच्या ग्रंथालय परिषदेचे अध्यक्ष होते. त्यांना मी विचारणा केली. त्यांचीही दर्शनाला येण्याची इच्छा होती. पण त्यांचे जमले नाही. आमचे मात्र जमले.

सोमवार दि. २५ नोव्हेंबरला आम्ही पावसला जाऊन पोहोचलो, तेव्हा आठ वाजण्याचा सुमार होता. चांगलेच अंधारून आले होते. आम्ही गेलो तेव्हा रात्रीची आरती नुकतीच सुरू झाली होती. बाहेरूनच आरतीचा आवाज कानांवर आला. आनंदाचे शहारे उठले. तो शुभशकून वाटला. शेजारच्या आश्रमात घाईत बाडबिस्तरा टाकला आणि हात-पाय धुवून धावत पळत आरतीला जाऊन उभे राहिलो. आरतीच्या वेळी आनंद वाटला.

भाऊसाहेब देसाई यांच्या घरातील माजघरात आरतीचा कार्यक्रम तर चांगलाच पार पडला. गोष्टी जुळायच्या असल्या म्हणजे भराभर जुळत जातात. आरती संपल्यावर बाहेरच्या ओटीवर आलो. ओटीवरच्या खोलीत स्वामींचा निवास असतो. स्वामी रात्रीच्या वेळी सहसा दर्शन देत नाहीत, असा रिवाज असल्यामुळे दर्शनाची कल्पना मनातही नव्हती. श्री. तात्या पथारे व अन्य मंडळी यांनी तत्परतेने येऊन विचारपूस केली. दर्शनाची कल्पना नसल्यामुळे मन भोजनाकडे साहजिकच धाव घेत होते. मुंबई-पुणे या भागातील बरीच मंडळी आलेली होती. जेवणाकडे गडबड सुरू झालेली दिसत होती. पाने मांडल्याची सूचना येत होती. त्या भोजनमंडळीत सामील होण्याची मी वाट बघत होतो.

एवढ्यात कोणीतरी माझ्या जवळ आले आणि मला स्वामींनी आत बोलावल्याची वर्दी दिली.

हा योग अनपेक्षित असल्यामुळे मी आनंदचकित झालो. आम्ही दोघे तातडीने आत गेलो. जे अपेक्षिले नव्हते ते प्रत्यक्षात उतरले होते. अनपेक्षित आनंद हा नेहमी अधिक सुखदायक वाटतो.

बाहेरच्या काहीशा झगमगीत प्रकाशातून मंद प्रकाशाच्या खोलीत गेलो. त्या ठिकाणी मंद प्रकाशाला तेजोवलयाने लोटल्याचा भास झाला. ते तेज स्व-रूपाच्या ब्रह्मानंदांत लीन झालेले दिसले. खोलीतील मंद प्रकाशाला जणू आनंद-दीप्तीची झिलई भासत होती.

आम्ही शेजारच्या बाकावर बसलो. गेल्या गेल्या कॉटवर माथा टेकून दर्शन घेतलेच होते. शाश्वत अशा चिन्मयानंदात लीन झालेले स्वरूप बोलू लागले परावाणीने ! संवाद सुरू झाला. कर्णेंद्रिये तत्पर झाली. चित्त एकाग्र झाले.

प्रथम आठवण निघाली वीस वर्षांपूर्वीची ! आषाढी-कार्तिकी हे संतचरित्रावरील माझे पुस्तक मीच विसरून गेलो होतो. एका पुस्तकाची वीस वर्षे आठवण कोण ठेवणार ? पण ठेवणाराने ती ठेवली होती. स्वामींना नेमकी आठवण राहिली ती त्या माझ्या पुस्तकातील ज्ञानदेवांची! स्वामींची आणि ज्ञानदेवांची आंतरिक सोयरिक फार जुनी ! माझ्या 'आषाढी-कार्तिकी' या पुस्तकाच्या आधीची ! ज्ञानेश्वरांचे संकीर्तन स्वामींच्या आवडीचे. 'आषाढी-कार्तिकी' हे केवळ निमित्तमात्र ! पण आम्हा सामान्यांना आनंद वाटला. कारण त्या विस्मृत पुस्तकातही आमचा अहंकार गुंतलेला !

स्वामीजी हलक्या आवाजात म्हणाले, 'वीस वर्षं मी तुमचं नाव ऐकतो आहे. आज भेट होत आहे.'

पुन्हा 'आषाढी-कार्तिकी' या पुस्तकाचे थोडे कौतुक झाले. 'यज्ञ' कादंबरी वाचल्याचे व आवडल्याचे आवर्जून सांगितले. 'अमृतपुत्र' ही नवी कादंबरी पाठवून देतो, असे मी सांगितले.

मध्येच केव्हातरी 'मी तुमची वाट बघत होतो', असेही म्हणाल्याचे आठवले. हा सारा दर्शन-सोहळा फार तर आठ-दहा मिनिटांचा ! पण खूप ऋणानुबंध सांगून गेला.

तेथून बाहेर पडलो ते आनंदाच्या भरातच ! मन काठोकाठ भरले होते आणि अपरंपार भारावले होते. भूक निमाली होती. आमची व्यवस्था भाऊंच्या घरीच झाली. म्हणजे स्वामींच्या सान्निध्यातच ! ही व्यवस्था स्वामींच्या सांगण्यावरून झाली होती की काय कुणास ठाऊक !

सकाळी साडे-सात वाजता दर्शन मिळणार आहे, हे कळल्यावर झोप बेपत्ता झाली. त्या रात्री केव्हा डोळा लागला ते समजले नाही. सारी रात्र स्वामींच्या सान्निध्यात गेली. स्वप्नेही तीच ! रात्रभर मला स्वामींचीच स्वप्ने पडत होती, असे मी सांगतो. पण खरा प्रकार काय होता कोणास ठाऊक ! ते सारे स्वप्नात घडत होते, असे आजही वाटत नाही. परंतु मग काय घडत होते हेही सांगता येत नाही. दृष्टांतासारख्या गोष्टी आपल्या वाट्याला कधी काळी येतील हे मला संभवत नाही. साहित्याच्या परिभाषेत सांगावयाचे तर एवढेच सांगता येईल की तो एक नवा अनुभव होता. जे प्रतीत झाले ते स्पष्ट होते. एक स्वप्न तर पक्के स्मरते. ते स्वप्न खूपच सूचक होते. पण ते कथन करण्याचे हे स्थळ नव्हे. आपापला अनुभव आपण आपापल्या स्मृति-कोषात जतन करून ठेवावा, हे बरे ! तो सांगून भोळ्या समजुतीचा अश्रद्ध आरोप आपल्यावर कशाला करून घ्या ?

दि. २६ नोव्हेंबरची सकाळ फारच रम्य होती. पूर्व क्षितिजावर गहिऱ्या गुलाबाची फुले उधळलेली दिसत होती. सारे प्रातर्विधी उरकले. स्नान झाले. एवढ्यात साडे-सात वाजायला आले. भाऊंनी एका कागदात पाच-सहा गुलाबाची टपोरी फुले आणून दिली. वाटले, जणू पूर्व क्षितिजावर आपण देखलेली फुलेच त्यांनी गोळा करून आणून दिली असावीत. कोणीतरी असोल्या नारळ हजर केला.

आम्ही दोघांनी आत पाऊल टाकले; आणि एकदम मनात माझे कविमित्र मधुकर कुलकर्णी यांनी स्वामींच्यावर केलेली कविता साक्षात् उभी राहिली - 'आज मी परमहंस पाहिला.' परमहंसांचे ते मूर्तिमंत साजिरे स्वरूप पलंगावर बसले होते. मोठे प्रसन्न दिसत होते. आधी-व्याधींची लक्तरे क्षितिजावर वाळत टाकून जणू साक्षात् सूर्यतेज सृष्टीवर उतरले होते. ते रूप पाहून मी दिपून गेलो. सत्पुरुषांच्या चरणांना कमलपुष्पांची उपमा नेहमी देतात. ती उपमा सार्थ वाटली.

स्वामींच्या दर्शनाला जाताना माझ्या दोन मनीषा होत्या. त्यांच्या त्या चरणकमलावर माथा टेकविण्याची माझी एक इच्छा होती. ती मी त्वरेने पुरी करून घेतली. स्वामींकडून प्रतिकार झाला नाही. भीड चेपली. बरे वाटले. नंतर दुसरी मनीषा होती ती त्यांच्या हस्तस्पर्शाची ! सत्पुरुषांचा हस्तस्पर्श कित्येक वेळा किमया करून जातो - लोहाला परिसाचा स्पर्श व्हावा त्याप्रमाणे ! मी त्यांच्यासमोर असता त्यांनी मला नारळ परत दिला तो अशा तऱ्हेने की, देताना त्यांचा हस्तस्पर्श व्हावा ! तो नारळ देताना काही काळ त्यांनी माझे हात धरले. अंगातून तेज सळसळून गेले. तोही अनुभव शब्दांत पकडण्यासारखा वाटला नाही. शर्करेची गोडी शर्करा खाल्ल्यावरच समजते. अनुभव हेच प्रत्यक्ष प्रत्यंतर !

मग 'संजीवनी गाथा' काढली; आणि सौ. संजीवनीला कोणतेही पान उघडून वाचायला सांगितले. सौ. संजीवनीने ज्या ज्या सत्पुरुषांची दर्शन घेतली आहेत त्या साऱ्या संतांचे स्तवन त्या अभंगात आले. त्यानंतर माझी पाळी होती. माझ्या हाती ज्ञानेश्वरी नित्यपाठ दिला. माझ्या मनात एक प्रश्न होता. मी त्या नित्यपाठाचे पान उघडले आणि माझ्या मनातील त्या प्रश्नाचे उत्तरच मिळाले. 'तू मानस नियम करी, निश्चलु होय अंतरी.' या ओवीचा अर्थ मी मनोमन ताडला. मला हवे ते उत्तर मिळाले होते.

आता सारे काही झाले होते. उठायला हरकत नव्हती. पण बसायला सांगितले. पुन्हा 'आषाढी-कार्तिकी' आणि 'यज्ञ' यांचा उल्लेख निघाला. मी माझे लेखनसंकल्प सादर केले. स्वामी त्यावर म्हणाले, 'आता ती तुमची सहजप्रवृत्ती झाली आहे. खूप यश मिळेल. काळजी नसावी.'

हात वर उचलून आशीर्वाद दिला. मी निष्काळजी झालो.

'अभंग ज्ञानेश्वरी' वर प्रसाद-भेट म्हणून स्वाक्षरी केलीच होती. ज्ञानेश्वरी नित्यपाठावर स्वाक्षरी केली. २६ नोव्हेंबर हा दिनांक घातला.

तेथून जाताना परत बोलावले. सोळा तासांतील हे तिसरे दर्शन ! पुन्हा येण्याबद्दल सांगितले. आशीर्वादासाठी हात उचलला. पाय निघायलाच हवा होता. पाय निघाला. मन मात्र तेथेच राहिले. तेथेच ते राहायला हवे होते. भाऊंना स्वामींचे निरंतर सान्निध्य लाभते. भाऊंच्या सद्भाग्याचा हेवा करीत पावस सोडले. मन तेथे ठेवून परतलो आहे. पुढे काय घडते ते बघावे. स्वामींच्या भरघोस आशीर्वादाचा अमोल ठेवा मात्र बरोबर घेऊन आलो आहे.

**श्री. भा. द. खेर**
आनंदी निवास, आनंद नगर, सिंहगड मार्ग, पुणे ४११ ०५१.
(श्री. भा. द. खेर यांच्या सौजन्याने स्मृतिगंगामधून पुनर्मुद्रित).

# पावसचे श्रीस्वामी स्वरुपानंद

**श्री. श्रीकांत गणेश आंबेकर**

*अनेक संत / सत्पुरुषांचा सहवास.*

स्वामींची माहिती अनेक वेळा मी ऐकली होती. मलाही मनातून एकदा दर्शनाला जावे असे वाटत होते. पण योगच येत नव्हता. दरखेपेस मित्रांबरोबर जाण्याचे मी ठरवित असे. पण प्रत्यक्ष वेळेस ते सर्व जाऊन येत असत व नेमका मी एकटाच जाऊ शकत नसे. शेवटी जोपर्यंत स्वामींच्याच मनात नाही तोपर्यंत आपण जावू शकणार नाही ही खात्री झाली. स्वामींची आज्ञा (श्रीअक्कलकोट स्वामी) झाली तरच जायचे नाही तर इथूनच नमस्कार असे मनाशी ठरविले आणि एके दिवशी स्वप्न पडले. एका खाटेवर श्रीअक्कलकोट स्वामी विश्रांती घेत आहेत. मी गेलो आणि पायावर डोके ठेवले. नंतर स्वामींच्या चेहऱ्याकडे पाहिले. तो चेहरा स्वामी स्वरुपानंदांचा होता. क्षणात परत स्वामींचा परत स्वरुपानंदांचा असे ३/४ वेळा झाले. स्वप्न संपले. हीच आज्ञा मी समजतो आणि खरोखरच आश्चर्य पावसला जाण्याचा योग आला. दि. २ नोव्हेंबर ७१ रोजी आम्ही नातेवाईक मंडळींनी गणपतीपुळे येथे टेंपो ठरवून जाण्याचे ठरविले. सर्व कोकण फिरून यावे असे ठरले. तेव्हा पावसलाही जावे ही माझी कल्पना सर्वानाच पटली आणि आम्ही प्रथम पावसला निघालो. आम्ही नातेवाईक मंडळी मोठी ८ व लहान मुले ३/४ इतके जण होतो. जाताना पेट्रोल पंप फक्त 'हातखंबा' या गावातच आहे. तेथे पेट्रोल, डिझेल घेऊनच पुढे जावे लागते. नाहीतर पंचाईत होते. आमचा ड्रायव्हर नवीन असलेमुळे पावसच्या अलीकडे जवळ जवळ २० कि.मी. अंतर आल्यावर त्याच्या लक्षात आले. दुपारची वेळ. ऊन नुसते रणरणत होते. पाणी व दुधासाठी लहान मुले नुसती गोंधळ घालीत होती. मागे जावे तरी जितके अंतर तितक्याच अंतरावर पावस. काय करावे, प्रत्येकाचे मत वेगळे. आमच्यात एक गृहस्थ अगदी नास्तिक होते. ते मिलिटरीमध्ये नोकरीस होते. हे गृहस्थ आज इतके आस्तिक आहेत की हेच का ते असा कोणालाही संभ्रम व्हावा. असो ! ते मला म्हणाले, 'आपण पावसलाच जावू. तुमचे स्वामी आहेत ना ? त्यांना नाही का काळजी आपली ?' मला जरा डिवचल्यासारखे वाटले आणि मी खरोखरच पावसला गेलो. मागे पेट्रोलसाठी वळलो नाही. पावसच्या दारात पोचतो तो माझे स्नेही पुण्यातील डॉ. साठे पुण्यास येण्यास निघाले होते. आमच्या दोघांच्या गप्पा झाल्या. डॉ. म्हणाले, 'पेट्रोल आणले आहे ना ? नेहमी येणारे विसरतात मग नंतर मुद्दाम हातखंबास जाऊन आणावे लागते.' मी नाही म्हणालो. ड्रायव्हर नवीन असल्यामुळे गोंधळ झाला. ताबडतोब डॉ. नी एक कॅन मला दिला. मी पैसे दिले. माझे काम झाले होते. हा सर्व प्रकार ते नास्तिक गृहस्थ पहात होते. मी काही न बोलता नुसते त्यांच्याकडे बघितले. मला काय म्हणायचे आहे हे त्यांना मी न बोलता कळले. आम्ही आंघोळी केल्या. देसाई मंडळींनी आमचे चांगलेच स्वागत केले. वास्तविक आम्ही दुसऱ्या दिवशी पुण्यास जाणार होतो. पण तुळशीचे लग्न करून जा म्हणून एक दिवस मुक्काम वाढला. ज्या दिवशी आम्ही तेथे गेलो त्याच दिवशी दुपारची गोष्ट. मी स्वामींना भेटण्याचे ठरविले. वास्तविक त्या दिवशी स्वामी भेटणार नव्हते. दुसऱ्या दिवशी सकाळी दर्शन देणार होते हे माझे लक्षात आले. मी स्वामींच्या खोलीत गेलो त्यावेळेस ते शांतपणे एका खाटेवर पडून होते. आवाज अत्यंत क्षीण होता. मी आत असताना नुसते त्यांच्या चेहऱ्याकडे पहात होतो. त्यांनी मला त्यांच्याजवळ बोलावले व म्हणाले, 'मी अगदी क्षीण झालो आहे. बोलतासुद्धा येत नाही. काय पहाता आहात ?' आणि ते मंदपणे हसले. तो चेहरा मी कधीही विसरणार नाही. मी म्हणालो, 'स्वप्नातील चेहरा हाच आहे का हे मी पडताळून पहात आहे.' आणि मी स्वप्न सांगितले. त्यांनी नुसते हात जोडले व 'या' म्हणाले. तेथे त्यांचा एक शिष्य होता. मी त्यांना स्वामींचे पाय चेपायचे आहेत, अशी विनंती केली. तसे करता येणार नाही. बाबांना नमस्कार करा. पाद स्पर्शही करू नका, असे सांगितले. इतक्यात त्या सेवेकऱ्याला कोणीतरी हाक मारली. तो बाहेर गेला. मी एकटाच स्वामींसमोर होतो. स्वामींनी डोळे मिटले होते. मी अगदी सावकाश स्वामींचे पादसंपादन केले. १/२ मिनिटे तरी मी ही सेवा केली असेन. तो सेवेकरी येत होता. मी लगेच मागे झालो व हात जोडून जणू त्यांच्या पायाशी काहीतरी प्रार्थना करतो आहे असा देखावा निर्माण केला. त्याला काही कळले नाही. मी नंतर निघून गेलो. दुसऱ्या दिवशीचे पहाटे सुमारे सकाळी ४॥ ते ५ वाजण्याचा सुमार. आम्ही वरच्या मजल्यावर झोपलो होतो. तेथे एक दुसरा सेवेकरी आला व मोठ्याने 'तुमच्यापैकी आंबेकर कोण आहे ? त्यांना स्वामी बोलावत आहेत.' असे म्हणाला. मी डोळे चोळत उठलो. तोंडावर पाणी मारले व खाली गेलो. स्वामींना नमस्कार केला. त्यांनी त्यांच्याजवळ बोलावले व क्षीण आवाजात म्हणाले, 'सहस्रबुद्धे महाराजांचे चरित्र लिहीत आहात. शक्यतो त्यांच्या तरुण वयातील घटनांचा अभ्यास करा. नंतरची माहिती तुम्हाला सहज प्राप्त होईल. चांगल्या कार्याला नेहमी विलंब लागतो. आशीर्वाद आहेतच.' मी नमस्कार करून निघून गेलो. दुपारी परत सर्वांबरोबर दर्शन घेतले.

त्या वेळेस बोलणे काहीही झाले नाही. ते कोणाशीच बोलले नाहीत. बोलणे ते कोणाशीच करीत नाहीत असे सेवेकऱ्याकडून समजले. मलाही त्यांनी पुस्तक सही करून दिले व श्लोक काढून दिला. नंतर दुसऱ्या दिवशी पौर्णिमा होती. आम्ही गणपती पुळ्याला गेलो. समुद्राला भरती होती. आम्ही सर्वांनी अभिषेक केले. सर्व अभिषेक झाल्यावर शेंडे गुरुजी निघून गेले. सर्व समुद्रावर गेले. मी एकटा गाभाऱ्यात बसलो. बाहेर लाटांचा प्रचंड आवाज आणि आत भयाण शांतता. येथेच चरित्र लेखनाचा आरंभ करावा असे वाटले आणि भराभर मी जे सुचले ते लिहिण्यास प्रारंभ केला. तो दिवस २ नोव्हेंबर १९७१, त्रिपुरी पौर्णिमा हा होता. बाबांची जयंती हाही एक अपूर्व योगच. पुढे दि. २१ जानेवारी ७४ रोजी स्वामींच्या सहीने मलाएक पत्र आले. त्यात त्यांनी आशीर्वाद कळविले. आता मी समाधीवर जमेल तसे जातो. ७ नोव्हेंबर ७७ रोजी मला एक त्यांच्या सहीचे पत्र आले होते. त्या वेळेस मी त्यांना भेटलो नव्हतो. पुढे एक वर्षाने भेटलो. या पत्रांत त्यांनी मला एक अभंग पाठवला.

*'जपा हरिनाम जपा हरिनाम । मार्गे हा सुगम वैकुंठीचा ॥*

इतकाच या सत्पुरुषाचा व माझा संबंध आला.

**श्री. श्रीकांत गणेश आंबेकर**

माधवबाग कॉलनी, पौड रस्ता, कोथरुड, पुणे ४११ ०३८.

श्री. श्रीकांत आंबेकर यांच्या सौजन्याने भवसागर नावाडीमधून पुनर्मुद्रित.

॥ जय माताजी ॥ दि. २५-१-५८

प्रिय श्री 'राम' यांसी हरिस्मरणपूर्वक सप्रेम अनेक आशीर्वाद विशेष.

ईशकृपेनें इकडील सर्व क्षेम तुमचे दि. १७।९।५७ व २०।१।५८ चे अशी दोन्ही पत्रे मिळाली. चि. रा. काशिनाथ यांस सध्या त्याच बाजूला नोकरी असल्यामुळे तुमच्या त्याच्या आपुलकीत आता सहजच भर पडणार आहे. तुम्ही आपला उद्योगधंदा-दूधदुभत्याचा-चिकाटीने लक्ष लावून चालवावा; व मिळेल पैसा तो अगदी काटकसरीने खर्च करावा. संसार दक्षतेने करावा. सर्वांशी मिळून मिसळून वागावे. वडील माणसांना संतोष होईल असे वर्तन ठेवावे. म्हणजे गरिबीचा संसार ही सुखाचा होतो व मीठभाकर ही गोड लागते. कर्ताकरविता एक ईश्वर आहे अशी दृढ बुद्धि असावी. मनाला नामस्मरणाची ओढ असावी. नामस्मरणाने अंतःकरणावरील मळ जसजसा दूर होईल तसतसा आनंदाचा-स्वानंदाचा अधिकाधिक प्रत्यय येत जाईल. असो.

येत्या फेब्रुवारी महिन्यापासून माझ्यासाठी दरमहा आठ आणे (रुपया) जेवढी शक्य होईल तेवढी रक्कम वेगळी काढून ठेवावी. हा क्रम सतत दोन वर्षेपर्यंत चालावयाचा आहे. दर सहा महिन्यांनी जमेल ती रक्कम माझे नावे मनीऑर्डरने पाठवीत जावे.

सदर रकमेचा विनियोग 'श्रीमत अभंग ज्ञानेश्वरी' ग्रंथाच्या प्रकाशनाकडे होणार आहे. त्यासाठी काही परिचित मंडळींस लिहीत आहे. सर्वांनी आपापला वाटा उचलल्यास सहजी काम होणार आहे.

*दावली ज्ञान-भानूते । अज्ञान-तम नाशिते ।*
*सुख शाश्वत जी देते । ती विद्या मिळवू इचे ॥१॥*
*दैन्य दुःख लया नेते । शोक ताप निवारिते ।*
*चित्तास शांतता देते । ती विद्या मिळवू इचे ॥२॥*
*आनंदी जन्म जी घेते । आनंदे विश्व कोंदिते ।*
*आनंदी लीन जी होते । ती विद्या मिळवू इचे ॥३॥*
*सर्व मंडळींस आशीर्वाद. कळावे हे आशीर्वाद.*

आपला
स्वरुपानंद

# स्वामींचा अनुग्रह

**सौ. गीता रविंद्र देसाई**

*स्वामी स्वरुपानंदांच्या अनुग्रहित.*

श्रावणाचा महिना. जिकडे तिकडे हिरवीगार वनश्री बहरलेली. थंडगार आल्हाद वाऱ्याच्या झुळकांनी सारा कोकणचा परिसर निनादलेला अशा सुंदर वातावरणातून मनमोराचा पिसारा हलत-डुलत पावसच्या ती. गु. अप्पांच्या ऐकलेल्या आठवणींवर स्वार होत चालला होता आणि त्या स्वच्छंद विहारातून अचानक पावस समोर येऊन ठाकलं हे कळलंच नाही.

लग्नानंतर प्रथमच आम्ही पावसला जात होतो आणि मी तर प्रथमच 'स्वामींचं' दर्शन घेणार होते. पावसचा तो रम्य परिसर पाहून मी तर भारावूनच गेले. मन हरखून गेलं आणि उगाचच वेड्या-वाकड्या बोलात अप्पांचं रूप डोळ्यांपुढे साकारू लागलं. इतक्यात ती. आत्तेंचा आवाज आला, 'अरे बापू, दोणीवर हात-पाय धुवून अप्पांना नमस्कार करून आत या बरं का.' मी मान वर करून कोण आत्ते म्हणून पुढे बघेपर्यंत त्यांचा तुकडा ओवाळून, पायांवर दूध-पाणी घालूनसुद्धा झालं.

'अगोबाई ! ह्या एवढ्या वृद्धत्वाकडे झुकणाऱ्या आत्ते ? पण मग ? ह्यांनी ह्या, 'संन्याशी स्वामींना आधी नमस्कार करायला कां बरं सांगितलं असेल ? नववधू-काय ? 'नव-दांपत्यांनी' आधी घरच्या देवांना नमस्कार नको का करायला ? इतक्यात आम्ही 'ती. अप्पांच्या' खोलीच्या दारात उभे ठाकलो आणि आतून 'धीर-गंभीर' प्रसन्न, तेजस्वी असे एक अतिशय शांत स्वरूप नजरेसमोर अवतरलं. आवाज आला, बापू आधी देवाला नमस्कार करून या हो. मी नकळत दचकले, बावरले. अरे, माझ्या मनीच्या चुकचुकलेल्या पालीचा आवाज ती. अप्पांपर्यंत कसा काय पोहोचला ? आणि एकदम हे म्हणाले, 'अगं ! देवघर इकडे आत आहे.' देवांना नमस्कार करून आम्ही ती. अप्पांच्या खोलीत आलो. मी नमस्कार करून पटकन बाहेर यायच्या विचारात होते. तोच अप्पा म्हणाले, 'अरे म्हणतायत कुठले - खुणेनेच बाकावर बसण्याचा इशारा केला. आम्ही बाकावर बसलो. मला भावार्थ गीतेतला एक श्लोक वाचायला सांगितला. तो वाचताच त्याच्या भावातून मी काय ते जाणले - आणि अप्पांच्या चरणधुळीनंतर मंत्रमुग्ध अवस्थेतच खोलीतून खडीसाखरेचा प्रसाद घेवून बाहेर आले.

मन त्या प्रसाद भेटीत डुंबून गेलं होतं. सावरून बाहेर येतानाच विचार आला, मी किती-किती वेडी ? एवढ्या मोठ्या अधिकारावर विराजमान झालेल्या 'अप्पांना' नमस्कार करताना का बरं हे विचारांचं वादळ उठलं. असेच काही दिवस गेले. वर्ष-दीड वर्ष लग्नानंतर आम्ही अचानक पावसला जाण्याचा योग आला. रत्नागिरीतल्या मुक्कामानंतर पावसला दर्शनाला आलो तर नुकताच उत्सव पार पडला होता.

पुण्याहून श्री. बाळासाहेब वाकडेंच्या ज्ञानेश्वरी मंडळातले बरेच जण पावसला आलेले होते. सर्वचजण पुण्यातली मंडळी. ती आम्हाला ओळखणारी, परिचित होती. त्यातल्या एक-दोघी मावश्या, आजी त्या मला म्हणाल्या, 'अगं गीता, तुमच्या घरात एवढे मोठे 'स्वामी स्वरुपानंद' असताना तू अजून अनुग्रह वगैरे घेतला नाहीस हे कसं ?'

झालं ! मन तर काय नादावलेलच. वेडं ते 'लागलं वाऱ्यावर भरकटायला. पण लगेच दुसरं मन म्हणालं, अरे पण मी कसं अप्पांना म्हणणार की, मला अनुग्रह घ्यायचाय. आणि हो ! आपण तर वाचलंय आणि ऐकलंयसुद्धा की गुरुच शिष्याला शोधत येतात. आपण थोडच विचारायचं. झालं. दुसऱ्या दिवशी ह्याच विचारात नमस्कार करून झाला. पण तिकडून काहीच विचारणा नाही. घडलं दुसरंच. 'ती. अप्पांनी' एक 'नित्य पाठाची' प्रत व खडीसाखर हातावर ठेवली. मी सुन्न मनाने खोलीतून बाहेर आले. म्हटलं खरंच ! आपण कधीही रोजची उपासना, वाचन काहीही करत नाही. त्यामुळे ह्या 'नित्यपाठाच्या' ओव्या पाठ करण्याचा आदेशच आपल्याला मिळालाय जणू !

आणि काय विचारता ? गीताने रोज नित्यपाठ मुखोद्गत करण्याचा उपक्रम सुरू केला. तदनंतर अचानक तिरुपती, रामेश्वर, मदुराई मीनाक्षी' अशी सर्व यात्रा घडली. मुलगा चि. सचिन लहान होता. सर्व तीर्थक्षेत्रांचे दर्शन घेऊन आल्यावर उत्सवाला परत एकदा पावसला जायचा योग आला. त्याच वेळेस माझी आईसुद्धा पावसला आली होती. परत तेच! समस्त ज्ञानेश्वरी मंडळ, अगं गीता ! तू स्वामींना अनुग्रहाचे विचार, हा चान्स डावलू नकोस.

इतक्यात माझी आई ती. अप्पांच्या खोलीत नमस्काराला गेली. 'स्वामी तिला म्हणाले, 'तुम्ही तर अनुग्रहीत आहात. मग तुमच्यापैकी कुणाला उपदेश घ्यायचा आहे ?' हे ऐकताच आईला पण आनंद झाला. ती म्हणाली, आमच्या मंदाला अनुग्रह घ्यायचाय. पण ती विचारायला घाबरतेय.

तदनंतर मी 'ती. अप्पांच्या' खोलीत प्रवेश केला. मन हेलकावे खात होतं. जीव केव्हाच वाऱ्यावर आरुढ होऊन झेपावत होता. ओढ लागली होती की, 'ती. अप्पा' केव्हा मला म्हणतायत, मी तुला अनुग्रह देणार आहे.

कारण ! आईनी मला सांगितलं होतं की, 'स्वामी' तुला मंत्र देणार आहेत. मी वेडी, उतावीळ, कासावीस झालेली. पण तिकडे खोलीत आसनावर विराजीत 'ती. अप्पा' मात्र शांत. त्या दिवशी आम्ही दुपारच्या गाडीने रत्नागिरीला जाणार होतो म्हणून मी दर्शनाला गेले होते.नमस्कार केला. गादीवर 'ती. अप्पांच्या' पुढ्यात माथा टेकवताच शेजारी उभ्या असलेल्या आमच्या ती. बाबांनी (माझ्या सासऱ्यांनी) मला सांगितलं आज तुम्हाला इथेच थांबावं लागेल, असं 'ती. अप्पा' सांगताहेत. ते म्हणतायत, उद्या सकाळी स्नानानंतर मग अनुग्रह देणे योग्य होईल. त्यामुळे मनपाखरू लगेचच गगनी विहरू लागलं. उद्या मी 'अप्पांची' शिष्या होणार ह्या आनंदातच खोलीतून बाहेर आले. ती. आत्तेंना तसेच आईला म्हटलं, उद्या सकाळी अप्पा मला अनुग्रह देणार आहेत. त्यामुळे त्यांनी आता आपल्याला इथेच रहायला सांगितलंय.

ती. आत्तेंना म्हटलं, 'अप्पांनी' असं असं सांगितलंय. त्या पण अतिशय खूष झाल्या. माझ्या पाठीवर थोपटलं, मला म्हणाल्या, अग् वेडाबाई तू खरंच भाग्यवान आहेस. तुला आपण होऊन अप्पा आपली शिष्या म्हणवणार आहेत. मग मी म्हटलं म्हणजे मी काय, कसं, करायचं ते मला काहीच माहीत नाही. तेव्हा नेमकं काय मी सकाळी करायचं.

ती. आत्तेंकडून सांगणं झालं. तू सकाळी लवकर तुझं अंघोळ, वेणी, फणी उरकून तयार हो. मी सर्व तयारी करते. मग भल्या पहाटेच मी उठून तयार झाले तर आत्ते म्हणतायत, अगं, तू तयार आहेस पण अप्पांचं सगळं रोजचं सकाळचं आन्हिक, पूजा हे सर्व झाल्यावर तुझं.

ती आत्तेंनी केळीचा फणा, नारळ, फुलं सर्व तयारी ठेवली होतीच. मी खोलीत प्रवेशताच मला नमस्कार करून होताच, एक भावार्थ गीतेची प्रत 'ती. अप्पांनी' स्वतः मला दिली. त्यातले एक पान उघडून चार ओव्या वाच असे सांगितले. उघडलेल्या पानावर स्वहस्ताक्षरात सही करून प्रसाद भेट म्हणून लिहून दिले व बाकावर बसून नेम कसा करावा 'सोऽहं' चा जप कसा करावा हा उपचार माझ्या कानी पडला आणि मी सर्वस्वी भान हरपून तो 'अनुग्रह' कानी साठवून मनी रुजवला.

तो क्षण मी कधीच विसरणार नाही.

सौ. गीता रविंद्र देसाई
केदारेश्वर सोसायटी, शिवदर्शन चौक, पुणे ४११ ००९.

# नामें पाषाण तारिले

**मेजर माधवराव रानडे**

१९७६ च्या अखेरपासून तर श्रीस्वामींवरील श्रद्धा व भक्ती फारच वाढली.

त्याचं असं झालं : आमची आई सौ. रमाबाई उर्फ बनुताई रानडे यांच्या साठीशांतीच्या निमित्तानं आम्ही सारी भावंडं १९७६ च्या डिसेंबरमध्ये देवगडला आमच्या घरी जमलो. माझं पोस्टिंग त्या वेळी श्रीनगरच्याही पुढे बांदीपूर या 'वुलर लेक'च्या भोवती वसलेल्या निसर्गरम्य ठिकाणी होतं. मी आकस्मिक रजेवर असल्याकारणानं मला लगेचच परतणं भाग होतं.

सतत प्रवासाच्या दगदगीनं व ठीक विश्रांती न मिळाल्यानं, कोल्हापूर ते पुणे या ट्रेनच्या प्रवासात मी टायर थ्रीस्लीपर बर्थवर अगदी गाढ झोपलो होतो.

पुण्याच्या २-३ स्टेशन्स आधी मी वरच्या बर्थवरून झोपेतच कोलमडून खाली पडलो व माझ्या डाव्या हाताचा स्कॅप्यूला फ्रॅक्चर झाला. शॉकमुळे काही क्षण बेहोशीत गेले. लोकांनी मला उठवून बसवल्यानंतर मी आजूबाजूला पाहिलं व हात अतोनात दुखत असतानाही मनात विचार आला की आज खरा कपाळमोक्षच व्हायचा ! गुरुकृपा म्हणूनच जिवावर बेतलेलं शेपटावर निभावलं. खरंतर कोणतंही दुःख, दर्द, पीडा झाली तर मनाची सर्वसामान्य प्रतिक्रिया म्हणजे माणूस वैतागतो, शिव्याशाप देतो. पण अशा अवस्थेतही ही गुरुकृपाच होय, म्हणून आपण थोडक्यात वाचलो, हा विचार मनात येणं अत्यंत सुखावह वाटत होतं. कारण याचा सरळ सरळ व उघड उघड अर्थ हाच होता की श्रद्धेची बीजं मूळ धरू लागली होती. परिपक्व होऊ लागली होती.

हाच विचार पुढे ४ जानेवारी १९७९ रोजी जीप ॲक्सिडंट झाला, त्या वेळीही मनात आला.

श्रीस्वामी म्हणायचे, 'खरा परमार्थ सुखाची प्राप्ती करून देत नाही तर, प्राप्त परिस्थितीत सुख शोधायची कला शिकवतो.' श्रीसद्गुरुंचा या उक्तीचा हळूके हळूके प्रत्यय येत होता.

देवगड (जिल्हा रत्नागिरी) येथील दत्तमंदिरात राहणारे दत्तोपासक श्री. वासुदेवशास्त्री रानडे कुठल्याशा लेखातील एक वाक्य नेहमी सांगायचेः 'परमार्थाचा वारा सतत वाहात असतो - तुम्ही आपली शिडे उभारा.'

याच सच्छील सत्पुरुषांनी आमच्या दोघांच्या वयामध्ये केवढं तरी अंतर असताना देखील मला वेळोवेळी अगदी मैत्रीच्या नात्यानं सदुपदेश केला. एकदा ते माझ्याबरोबर पावसला श्रीस्वामींच्या दर्शनाला देखील आले होते. आज कैक वर्षाच्या अनुभवानंतर मी खात्रीलायकरीत्या असं म्हणतो की, श्रीस्वामींनीच वेगवेगळ्या व्यक्तींकरवी, वेगवेगळ्या पुस्तकांद्वारे कालानुपरत्वे योग्य असा उपदेश माझ्याप्रत पोचविण्याची योजना केली.

'दासबोध' एकदा तरी वाचच अशी अगत्यानं विनंती करणारे व पुनःपुन्हा त्याची आठवण करून देणारे सद्गृहस्थ श्री. वासुकाका रानडेच. अष्टसात्विक भाव जागृत होणं हा कुंडलिनी जागृत होण्याएवढाच किंबहुना त्याहूनही श्रेष्ठ अनुभव आहे, हे त्यांनीच समजावलं.

सद्गुरुंचा फोटो सतत नजरेसमोर असल्यानं त्यांच्या नित्य दर्शनानं, त्यांचा फोटो अंगावर असण्यानं अंतरंग हल्के हल्के उजळण्याच्या दृष्टीनं होणारे फायदे त्यांनीच समजावले मला.

परिणामस्वरूप मी आप्पांचे, माझ्या आवडत्या स्वामींचे, माझ्या सद्गुरु माऊलीचे तीन वेगवेगळ्या आकारांचे फोटो पावसला विकत घेतले. एक लॉकेट फोटो गळ्यातील रुद्राक्षाखाली गोठवून घेतला.

१९७७ च्या जूनमध्ये माझं बांदीपूरहून त्रिपुरामध्ये तेलियामुरा या जागी पोस्टींग झालं. तेलियामुराला मुलांच्या शिक्षणाच्या दृष्टीनं सोय नसल्यानं सौभाग्यवती मुलांना घेऊन सालबगान-अगरतला या त्रिपुरा स्टेटच्या राजधानीच्या ठिकाणी राहिली. मी एकटा ६० मैल दूर तेलियामुराला ऑफिसर्स मेसला लागून असलेल्या एका खोलीत राहू लागलो.

नाही, पण आता एकटा म्हणता येणार नव्हतं. कारण माझ्याबरोबर त्या खोलीत राहत होते माझे आवडते आप्पा. बांदीपुरहून निघताना तेथील स्टाफनं नक्षीकाम केलेली अक्रोडच्या लाकडाची फ्रेम मला त्यांची प्रेमभेट म्हणून दिली होती. त्यात विराजमान होती सद्गुरुमाऊलींची ध्यानमग्न मूर्ती. खरंतर फोटो फ्रेम करून घेण्यासाठी मीच माझ्या स्टेनोला दिला होता, पण तो फ्रेम होऊन येईपर्यंत माझी बदली झाल्यानं माझ्या स्टाफनं विनंती करून फ्रेमचे पैसे त्यांच्याकरवी देऊन ती प्रेमळ अनमोल भेट मला दिली.

त्या छोट्याशा खोलीत त्या फ्रेममधील तो फोटो चांगलाच नजरेत भरत असे. दुसरा, या पुस्तकातील फोटो मी माझ्या ऑफिसमधील टेबलावर ठेवला व तिसरा पैशाच्या पाकिटात.

श्री. वासुकाका रानड्यांनी मला एक नेम पण सांगितला. तो असा की घराबाहेर पडताना गुरुवंदना करून, गुर्वाज्ञा घेऊन बाहेर

पडायचं; म्हणजे त्यांच्या सान्निध्यात अंतर येऊ नये व त्यांचे आशीर्वाद सोबत असावेत. त्यांनी सांगितलं की, गुरुवंदना करताना -

'गुरुर्ब्रह्मा गुरुर्विष्णुः गुरुर्देवो महेश्वरः ।
गुरु साक्षात् परब्रह्म तस्मै श्री गुरवे नमः ॥'

अथवा 'गुरु महाराज गुरु जयजय परब्रह्म सद्गुरू' असा आपल्या सद्गुरुंचा जयजयकार करावा.

श्री. वासुकाकांच्या या प्रेमळ उपदेशामुळे, गुरुवंदना करूनच बाहेर पडायच्या परिपाठाचं व्यसनच जडलं आणि मग 'जे जे का निमिख देखेल माझे सुख...' या श्रीज्ञानोबा माऊलीच्या ग्वाहीची सत्यता अनुभवास येऊन निमिखे वाढू लागली.

मी तेलियामुरला हजर झालो तेव्हाचे माझे कमांडेण्ट श्री. आर. एस्. राठोर हे विद्वान व गीतेचे व्यासंगी. त्यांनी धार्मिक प्रवृत्ती पाहून मला 'ॲटोबायोग्राफी ऑफ योगी' हे परमहंस योगानंद यांचं पुस्तक माझ्याकडे आहे ते नेऊन वाच, असं सांगितलं होतं; पण त्याकडे त्या वेळी तरी दुर्लक्षच झालं.

१९७८ च्या मे महिन्यात सुट्टीवर घरी देवगडला गेलेला असताना 'साद देती हिमशिखरे' हे पुस्तक वाचनात आलं व त्यातील एका परिच्छेदावर वडिलांशी चर्चा करत असताना वडिलांनी श्री. गुरुदेव रानडे या आमच्याच कुळातील अधिकारी पुरुषाच्या असीम विद्वत्तेसंबंधी व त्यांच्या परमार्थ क्षेत्रातील श्रेष्ठत्वाबद्दल बऱ्याच गोष्टी सांगितल्या. त्यांचं चरित्र मोठं मननीय असल्याचंही सांगितलं. स्वकुलातील ह्या जगद्वंद्य पूर्वजांचं चरित्र वाचावयाचंच असा मी निश्चय केला. पण वडिलांना त्याची प्रत शोधूनही मिळाली नाही.

परतीच्या प्रवासात पुण्याला वडील बंधूंच्या घरी थांबलो असता मनात घोळत असलेला गुरुदेव रानड्यांचा विषय मी काढला तर ते म्हणाले, 'अरे ते पुस्तक श्री. ज. वा. भाव्यांनी मला वाचायला म्हणून दिलंय. तू घेऊन जा.' आंधळा मागतो एक अन् देवानं द्यावे दोन, तद्वतच वाटलं मला. आणि 'श्री. गुरुदेव रानडे : चरित्र आणि तत्त्वज्ञान' या त्या पुस्तकाची मी आधाशासारखी पारायणं केली व कित्येक गोष्टींचा मनाला उलगडा झाला.

एक गोष्ट मात्र मनाला डाचू लागली की, आपल्या सद्गुरुंनी आपल्याला 'नाम' दिलं नाही. श्री. गुरुदेव रानड्यांनी नामाची महती व तीही सबीज नामाची (म्हणजेच सद्गुरुंकडून प्राप्त झालेल्या नामाची) फार महती सांगितली आहे. श्री. गोंदवलेकर महाराजांच्या चरित्रातील व इतरत्रही अनेक ठिकाणी वाचनात आलेलं नामाचं माहात्म्य डोक्यात घोळू लागलं. 'संजीवनी गाथे' - तील 'राम-नाम धरा कंठी' या अभंगाच्या कडव्याभोवती मन रुंजी घालू लागलं, पण अस्वस्थपणा जाईना. सारखा हाच विचार मनात येऊ लागला की, स्वामींनी 'नाम' देण्याएवढीही लायकी समजली नाही या जिवाची.

आप्पांनी मला स्वहस्ते 'आत्मप्रभा' हे पुस्तक एका भेटीत दिलं होतं व त्यातील काही उतारे वाचूनही घेतले होते. पुढे एक भेटीत मी त्यांना 'सोऽहं' संबंधी काही प्रश्न विचारले असता त्यांनी मला 'सो ऽ हं साधना' हे श्री. म. दा. भटांचं पुस्तक वाचायला सुचवलं; पण 'नामा' बद्दल कधी काही उल्लेख केल्याचं आठवत नव्हतं.

अस्वस्थता इतकी वाढली की शेवटी मी खोलीतल्या आप्पांच्या फोटोशी हुज्जत सुरू केली, की आप्पा असं का केलंत ? का वंचित ठेवलंत मला नामसुखापासून ?

पण लवकरच स्वामींच्या –

***'नाभीत कस्तुरी असता जवळी । हिंडे रानोमाळी मृग जैसा ।'***

या वचनांचा मला प्रत्यय आला.

मनात विचार आला की, आपण आपल्या सद्गुरुंनी सांगितलेली पुस्तकंही जर पूर्णपणे वाचली नाहीत तर नामाविषयीचा हा दुराग्रह का? विचाराची ताबडतोब अंमलबजावणी करण्याच्या हेतूनं मी माझ्या पुस्तकांच्या पेटीतून श्री. म. दा. भटांची 'सोऽहं साधना, 'पंथराज' इत्यादी पुस्तकं काढली.

अन्, अहो आश्चर्यम् ! एका पुस्तकातून, नीट जपून ठेवलेलं श्रीस्वामींचं दुसरं पत्र हाती लागलं. ज्यात सद्गुरुंनी स्पष्टपणे लिहिलं होतं –

'रामकृष्ण हरि उच्चारी वैखरी ।
भक्त तो संसारी भाग्यवंत ॥'

मन नुसतं आनंदानं नाचू लागलं. मला हवं ते उत्तर मिळालं होतं. हृदय सद्गदित झालं, डोळे पाणावले. मनात आलं आप्पांनी म्हटलंय् ते किती खरं आहे–

***'भाविकाची चिंता वाहे भगवंत । पाहे हिताहित तोचि त्याचे ॥***
***जे जे वांछी मन ते तया देऊन । न्यून करी पूर्ण भाविकाचे ॥***

पत्र वाचून मला मिळालेल्या सबीज नामाविषयी डोक्यात लख्ख प्रकाश पडला. हे पत्र मला १९७२ च्या जूनमध्ये मी बिकानेरला असताना माझ्या मुलीच्या जन्मानंतर आलं होतं.

पण पत्रातला मजकूर समजायला तब्बल सहा वर्षे लागली होती. कारण... कारण उघड आहे; नुसत्या बुद्धीने वा तर्कानें कळणारा विषय नव्हे हा. 'हे हृदयीचे हृदयी' घालायची ही क्रिया फार नाजूक आहे. अनुभूतीचा, संक्रमणाचा भाग आहे. नामाचा उलगडा झाल्यानंतर मात्र मी नामाचा पिच्छाच पुरवला, काही दिवस तरी. अन् या साऱ्याला तेलियामुराचा एकांतवास परिपोषक ठरला.

मी जपासाठी माळही आणली. पुढे ही माळ खाली पडून तुटली. त्यानं मन उदास झालं. वाटलं हा अपशकून झाला. पण सद्गुरुंनी इशारा दिला– वेड्या आता माळेची जरूर काय? चित्तात स्थिरावलेल्या त्या नामाला एकचित्त होऊन कधीही ऐक ना. त्या स्फुरणाकडे अनुसंधान ठेव.

जपाचं अजपात रूपांतर झालं. पुढे पुढे नादश्रवणाचे वगैरे अनुभवही आले व भक्तीला एक प्रकारची दिशा मिळाल्याचा आनंद वाटू लागला.

***नामे पाषाण तारिले । नामे पापी उद्धरिले ॥***

या श्रीस्वामींच्या वचनाची यथार्थता अनुभवाला आली.

(मेजर माधवराव रानडे यांचे सौजन्याने पुनर्मुद्रित).

**मेजर माधवराव रानडे**
स्वरूप सावली, फ्लॅट नं. २५९, २८ सेक्टर निगडी, पुणे.



# पावराचा प्रेमदीप

**सौ. विजया प्रभुणे**

***बोलेन ते होवो तुझेचि स्तवन ।***
***चिंतीत ते होवो ध्यान तुझे ।***
***घडे तो व्यापार तीचि तुझी पूजा ।***
***होवो केशवराजा स्वामी म्हणे ।***

स्वामी स्वरुपानंदांचे हे अमृतमय बोल डोळ्यांत साठवावेत, वाचेने उच्चारावे, मनाने चिंतावे असेच आहेत. या थोर संतश्रेष्ठाने केलेली आयुष्याची वाटचाल, काहीशी ध्येयनिष्ठ, नंतर लोकविलक्षण भक्तिमयता आणि गुरुनिष्ठा व त्या गुरुकृपेच्या बळावर नंतरचे संपूर्ण आयुष्य सोऽहं ध्यासामध्ये आकंठ एकरूप झालेले स्वामी अशा तीन विभागांत आपल्याला पहावयाला मिळते.

संत तुकाराम महाराज म्हणतात - शुद्ध बीजापोटी फळे रसाळ गोमटी. या त्यांच्या अभंग वचनाचे प्रत्यक्ष प्रत्यन्तर म्हणजे स्वामींचे इहलोकी आगमन होय. स्वामीजींची आजी गंगाबाई आणि आजोबा परशुरामपन्त यांचा संसार कसाबसा साधा अगदी सामान्य रीतीने चालला होता. पण एकदा गंगाबाईच्या हातून त्यांच्याही नकळत एक चूक होऊन गेली. त्यांचे वय होते अठरा-एकोणीस वर्षांचे. त्यांच्या सावत्र सासूने आपल्या लहान बाळाला झोपविण्यासाठी गंगाबाईला सांगितले, अगं त्या बाळाला थोडी अफू घाल. या नवीन मुलीला किती घालावी ते कळेना. गंगाबाईने बरीच अफू पाजली. परिणामी ते मूल दगावले. मृत झाले.

गंगाबाईच्या मस्तकावर जणू आकाश कोसळले. दुःखाचा पर्वतच तुटून पडला. कारण सासू, सासरे, दीर खुद्द नवरासुद्धा त्यांच्यावर आग पाखडू लागला. चारी बाजूंनी चाललेले वाक्तांडव, निंदानालस्ती, शिव्याशाप, आई-वडील माहेरचा उद्धार हे सर्व सहन करता करता गंगाबाईना जीव नकोसा झाला. सासू थयथयाट करून आरडून-ओरडून म्हणू लागली, तूच माझ्या मुलाला मुद्दाम मारलेस ! तुझा सावत्र दीर ना? माझे वाटोळे केलेस. तू स्त्री नाहीस, डाकीण आहेस. मुलं खाणारी राक्षसीण आहेस. जा कुठेही ! तोंड काळं कर. चालती हो.

सरळ स्वभावाच्या गंगाबाईना ही मानहानी सहन झाली नाही. त्या उठल्या आणि पायी-पायी चालत भूक-तहान सहन करीत ऊन, पाणी, वादळ सोसत-सोसत नरसोबाच्या वाडीला आल्या. मनात विचारांची वावटळं चालूच होती. हे दयाघना, परमेश्वरा मला सोसण्याचे सामर्थ्य दे.

***सुखदुःख दोन्ही संसारी भोगणे***
***सुटकाच नाही ध्यानात ठेवणे***
***आनंदी आनंद दत्तगायनात***
***शांतिसुख लाभे नाम स्मरणात***

आपले दुर्दैवी जीवन आता फक्त दत्तसेवेत घालवायचे हा पक्का निर्धार ठरला. एक ना दोन तब्बल बारा वर्षे त्यांनी एकाग्रतेने, निष्ठेने दत्तात्रेयाची उपासना केली. त्यांचे पती परशुरामपंत यांनी दुसरा संसारही थाटला. पण स्वामींची आजी गंगाबाई यांना ना त्याची खंत ना खेद. त्या मनी म्हणत - दत्त चरणांचा ध्यास लागो मना । ध्यानी मनी स्वप्नी अवधूत जाणा - आनंदी आनंद दत्तगायनात.

विषयांचे सुख नश्वर मायिक । तेथे अरोचक असो द्यावे । स्वामी म्हणे माळ घालिते विरक्ती । बळाविता प्रीति आत्मरूपी । हा स्वामींचा उपदेश त्यांच्या पुण्यवंत आजीने आधीच प्रत्यक्ष आचरला होता. त्यांच्या पोटी आलेला हा नातू दिव्य अलौकिक असणारच. नामरूपगुण मिथ्या नाशिवंत । एक ते शाश्वत आत्मरूप ।

संस्कृतीचा भोवरा कितीही गरागरा फिरू दे माझे चित्र स्थिर राहू दे हरिनामी । हे बाळकडू त्यांना बालपणापासूनच मिळाले. गंगाबाईना दृष्टान्त झाला. तुमच्या गोडबोले घराण्यात तुझ्या मुलाच्या पोटी साक्षात् दत्त अवतार घेणार आहेत. वडील विष्णूपंत, आई रखमाबाई हे देखील संसारी उदासीन, अलिप्त पण ईश्वरभक्त होते.

स्वरुपानंद उर्फ अप्पा याने शिकावे, चांगली नोकरी धरावी, सगळे मिळून असणाऱ्या सात माणसांच्या कुटुंबाला हातभार लावावा, असे त्यांच्या आईचे स्वप्न होते. अप्पांच्या वडिलांना संसाराचा गाडा रेटताना फारच कष्ट पडत होते. पण रामचंद्र (स्वामींचे लहानपणीचे नाव) या शिकणाऱ्या बालकाला त्याचे काहीच नव्हते. देशसेवेचे खडतर व्रत हा त्यांचा आदर्श होता. ते म्हणतात -

***शास्त्र, विद्या कला काय ती शिकोन ।***
***इच्छिता कल्याण जगताचे ।***
***यत्ने संपादिले व्यवहार चातुर्य ।***
***कराया सत्कार्य योजीना ते ।***

निष्काम लोकसेवा व देशसेवा याकरिता आपल्या सुखसर्वस्वावर लाथ मारण्याच्या या तरुणाचे वय होते फक्त अठरा. ते म्हणतात, ध्येयासाठी सोसू सुख-दुःखे । ध्येयासाठी सुखे वेचू प्राण । सत्यासाठी मारू स्वार्थावर लाथ लौकिकाची मात दूर ठेवू । सामान्यातून असामान्यत्व प्राप्त करून घेण्यासाठी मानसिक, शारीरिक, बौद्धिक जडण-घडण प्रदीर्घ कालपर्यंत घडवावी लागते, तेच या तारुण्यात स्वामींच्या बाबतीत घडत होते.

धनमान, कीर्ती, संपत्ती हे सारे दीन-दुबळ्यांचा कैवारी म्हणून आणि एक निष्ठावन्त देशसेवक म्हणून वेचायचे ठरले. व्याख्याने, भाषणे, कीर्तन, प्रवचने या सर्वांमधील मकरंद मनात साठविणारा हा सावधचित्र 'मधुप' (भृंग) खऱ्या अर्थाने अष्टावधानी चौफेर ज्ञानी होत चालला आणि मध्येच शिक्षणाला रामराम ठोकून तो रामचंद्र उर्फ अप्पा पावसला परतला. लहान मुलांना सुशिक्षित, सुसंस्कृत, सुविचारी बनवण्याच्या ध्येयाने झपाटूनच त्याच प्रेरणेने त्यांनी स्वावलंबनाश्रम नावाची शाळा काढली. मुलांच्या निष्पाप, मुग्ध कलिकेचे पूर्ण विकसित, सुसंस्कारी पुष्प करण्यासाठी होती ही सारी खटपट. सगळीच ही निष्काम समाजसेवा.

परंतु 'बाबा महाराज' या थोर सद्गुरुंनी त्यांचे मन भरून-भारून टाकले आणि त्यांना सोऽहम् या नाममंत्राची दीक्षा दिली. ध्यानधारणा शिकवली. त्या वेळी अप्पाची स्थिती कशी होती सांगू का ?

*कंठ सद्गदित स्तब्ध झाले चित्त ।*
*होती विगलित सर्व गात्रे ।*

सतत नामस्मरणाचा अखण्ड ध्यास लागला - रामरंगी रंगले मन। आत्मरंगी रंगले । रामरूप जाहले मन । विश्वरंगी रंगले ।

इतर सर्व ध्यास सुटले. गुरुसेवा हेच काम झाले ! त्यांचे गुरु बाबामहाराज एकदा जिन्यावरून पडले. मांडीचे हाड मोडले. त्या वेळी या सत्शिष्याने अखंड सेवा केली. जीर्ण झालेली पोथी गुरुंना वाचता येईना म्हणून संपूर्ण ज्ञानेश्वरी हाताने लिहून दिली. स्वामी म्हणतात,

*गुरु माता पिता । गुरु ची देवता*
*गुरु मुक्ती दाता । ऐसे मानी*
*गुरु सेवेवीण जाऊ नेदी क्षण ।*
*तेथे तो प्रसन्न स्वामी म्हणे ।*

त्यांची समाजसेवा तशी चालूच होती. पण ती जीवनाची इतिकर्तव्यता वाटेना.

हरि नाम, हरिनाम तेची माझे संध्यास्नान । स्वामी करी हरिध्यान। तेथे नित्यसमाधान ।

पाठीचा कणा ताठ, दृढ मांडी घातलेले, अर्धोन्मिलित दृष्टी, मंद श्वासोच्छ्वास, निश्चल शरीर अशा अवस्थेत बसलेल्या रामचंद्र गोडबोले उर्फ अप्पाला त्यांचे गुरु प्रसन्न चित्ताने म्हणाले, अरे तू आता सत् स्वरूपाचा आनंद अनुभवायला योग्य झालास. म्हणून तुला अखिल महाराष्ट्र स्वामी स्वरुपानंद या नावाने ओळखेल. सर्वोच्च आत्मानुभूति घेतलेला अर्थात् आत्मसाक्षात्कारी संत म्हणून हा पावसचा प्रेमदीप सर्वांना तेजोमय, मंगलमय प्रकाश देवू लागला. जीवनाला अमूलाग्र कलाटणी देणारा हा गुरुकृपेचा प्रसंग घडला त्यांच्या अवघ्या सत्ताविसाव्या वर्षी !

स्वामी आपल्या जीवनाच्या तिसऱ्या टप्प्यात जनसामान्यांना लौकिक नव्हे तर शाश्वत कल्याणाचा मार्ग आपल्या अभंगाद्वारे दाखवू लागले. त्यांची सर्वच काव्यरचना उत्स्फूर्त, ईश्वराला मनापासून घातलेली साद आहे. ते म्हणतात- क्षणोक्षणी करावा हाची विवेक काय ते मायिक काय सत्य । आपल्या या शिष्योत्तमाची ही अध्यात्मिक प्रगती पाहून सद्गुरु पूर्णतया संतुष्ट झाले. गुरुकृपेचे कोंदण असलेला हा ज्ञानहिरा अंगीच्या आत्मबलाने लखलखू लागला. सद्गुरुच्या संगे शिष्य बी घडला शिष्य बी घडला सद्गुरुची झाला, तरी स्वरुपानंद सद्गुरुंना चरणवंदन करून म्हणत होते, सांगशील तैसा वर्तेन सद्गुरुराया । जाणतसे सत्ता तुझी एक ।

परमार्थ मार्गावरची वाटचाल करताना स्थितप्रज्ञता अंगी बाणविण्याची फार मोठी खटपट त्यांनी केली. त्यासाठी आपल्या मनातील असंख्य विचारांचे पदर हळूवारपणे सोडवून त्याकडे अलिप्तपणे कसे पहायचे हे ते शिकले आणि मग आपल्या लोकांना शिकवू लागले.

ही गोष्ट आहे इ. स. १९६५ मधील. दिवाळीचे दिवसांत स्वामीजी उचकी येणे या विकाराने त्रस्त झाले. नुसते त्रासले नाहीत तर अत्यवस्थ झाले. पुण्याचे त्यांचे मित्र मधुभाऊ लगेचच पावसला पोहोचले. त्या वेळी स्वामी क्षीणपणे हास्य करीत म्हणाले, 'अरे, मधुभाऊ एवढा घाबरतोस कशासाठी ? अरे इतका वेळ वेदपुरुष आणि काळ पुरुष यांचा झगडा चालला होता. पण वेदपुरुषाचा विजय झाला. प्रसंग भला-बुरा कसाही असू देत पण तुम्ही स्थिर चित्त राहण्याचा प्रयत्न करा.'

*निर्वातीचा दीप तेवतो निवान्त ।*
*तैशी वृत्ति शान्त असो द्यावी ।*

इ. स. १९३० ते १९३४ या कालखंडात स्वामींच्या जीवनात एका तरुणीचा प्रवेश झाला. त्यांचा परिचय वाढत गेला. प्रपंचाचा पाश ओढत होता तर दुसरीकडे परमार्थ मार्ग खुणावीत होता. कारण कामासक्ती त्यांच्याजवळ नव्हतीच. परंतु सहवासाने प्रेम वाटत होते. एकदा स्वरुपानंद टेकडीवर फिरायला गेले असताना काय झाले कोणास ठाऊक ? त्यांना इतका प्रचंड घाम आला की त्यांचा फार मोठ्या प्रमाणावर शक्तीपात झाला व ते बेशुद्ध झाले. लोकांनी त्यांना उचलून घरी आणले. त्या क्षणापासून बिछान्याला खिळले ते खऱ्या अर्थाने पुन्हा कधी ठणठणीत झालेच नाहीत. आपल्यासारखा सामान्य माणूस खचूनच गेला असता. परंतु 'एक ते शाश्वत आत्मपद' हे गुरुकृपेने मनोमन

ठसल्याने स्वामी शांत होते, प्रसन्न होते. ईश्वर भक्तीत लीन होते. नामस्मरणी दंग होते. स्त्रीच्या मोहात अडकू पाहणारा माझा आत्मा जगन्नियन्त्याने हे संकट आणून पूर्ण विशुद्ध ठेवला, असे म्हणून भगवान दत्तात्रेयाचे आभार मानू लागले. ते म्हणतात, प्रयोग निःसंग प्रेमाचा माझा पूर्ण यशस्वी व्हावा यास्तव आयुष्यी गमे ही योजना दैवी। आपल्यावर आलेल्या संकटाचा सुंदर अर्थ त्यांनी लावला. आघात हसतमुखाने पचवला आणि पावसचा हा सिद्धयोगी पुन्हा एकदा नामस्मरणी रंगला.

त्यांचा जीवात्मा परमात्म्याशी पूर्णाद्वैत होयून म्हणू लागला,

*पूर्ण सेजेवरी आम्ही रंगरंगूनी डोलू ।*

*राममय वृत्ती झाली आता काय उणे ।*

ते म्हणतात - भावबळे आम्हा हरिचे दर्शन । नित्य समाधान स्वामी म्हणे ।

चिकाटी अभ्यास, प्रयत्न, दृढ श्रद्धा या गोष्टी उपासकाजवळ असल्याखेरीज ते त्याला अनुग्रह कधीही देत नसत. पुण्यामधील एक व्यापारी स्वामीजींचे परमभक्त होते. स्वामी चरणी जबरदस्त निष्ठा होती. नितान्त आदरही होता पण ते सारखे स्वामींना म्हणत, माझ्या साधनेचा काहीच प्रत्यय वा अनुभूती मला येत नाही. काहींना प्रकाश दिसतो. काहींना दत्तात्रेय मिटल्या डोळ्यांसमोर येतात. मीच साधनेत मागे आहे काय ?

यावर स्वामी शांतपणे म्हणाले, 'मी दोन मणाचे ओझे एकदम तुमच्या खांद्यावर ठेवू काय ? ते तुम्हाला झेपेल काय ? शिष्याच्या पात्रतेनुसारच सद्‌गुरु त्याला देत असतो.

एक थोर साहित्यिक आणि त्यांचे मित्र यांचा विषय झाला. मित्र म्हणाला, 'अहो लेखक महाशय, आपण पावसला जाऊन माझ्या सद्‌गुरुंचे दर्शन घेवू या ! येताय का तुम्ही ? ' याावर ते साहित्यिक अगदी तोऱ्यात अभिमानाने म्हणाले, 'मी स्वामी वगैरे मानत नाही. मी येतो, पण नमस्कार वगैरे करणार नाही. बाजूला उभा राहीन.'

तो स्वामीभक्त मित्र आणि ते नास्तिक लेखक महाशय स्वामींच्या खोलीत गेले. स्वामी स्वरुपानंद आपल्या भक्ताबरोबर अत्यंत शांतपणे अगदी हळूहळू बोलत होते. बाजूला उभे असलेले ते लेखक ओरडून म्हणाले, 'अहो स्वामी, जरा मोठ्याने बोला की ? मला जरा कमी ऐकू येते.' यावर मिस्कीलपणे म्हणाले, 'अहो लेखक महाशय, तुम्ही बहिरे आणि मी मुका आहे.' (मौन धारण केलेला).

ज्याची श्रद्धा नाही त्याला सांगणे म्हणजे पालथ्या घड्यावर पाणी नाही काय ? .

पावसच्या या प्रेमदीपाचे अर्थात् स्वरुपानंदांचे व्यक्तिमत्त्व सदाचरणाने शुद्ध झालेले होते आणि म्हणूनच त्यांचे मन निर्मळ आणि विशुद्ध होते. निर्मलंच विशुद्धंच मानसम् देवमंदिरम् - हे तर त्रिवार सत्यच आहे.

*हरिनाम हरिनाम*

*हेचि माझे परमधाम*

*स्वामी जपे हरिनाम*

*तेणे अंतरी विश्राम*

संसाराच्या संकटाने त्रस्त झालेल्या प्रापंचिकांना ते हाच दिलासा देत असत. आपल्या संग्रही असलेला असा काही सदग्रंथ देत आणि विशिष्ट पान उघडून वाचायला सांगत. चमत्कार असा होई त्या अभंगात अथवा ओवीत त्या दुःखी माणसाला शांत करणारा विचार असे.

स्वामींचा देहभोग तर इतका कठीण होता की त्यांना गादीवर उठून बसणेही अशक्य होते.

म. म. कै. दत्तो वामन पोतदार म्हणतात, एवढा अशक्त, दुर्बल माणूस मला चार-चार पानी पत्रे लिहितोच कशी ? ज्ञानेश्वरीची सुबोध ज्ञानेश्वरी करतो कशी ? सारे काही अघटित व अतर्क्य आहे. याचे उत्तर एकच हे देणे ईश्वराचे. ते आपल्या एका अभंगात म्हणतात,

*देवा तू सागर मी तुझी लहरी ।*

*दोघासी अंतरी भेद नाही ।*

*देवा तू सुवर्ण मी तुझे भूषण ।*

*दोघा एकपण सर्वांपरीचि ।*

खरा भक्त कोण ? याचे विवेचन त्यांनी फारच सुंदर केलेले आहे. नुसते तोंडाने रामनाम घेतले, पण मनात कामक्रोध ठासून भरलेले आहे तर त्याचा काय उपयोग ? भक्तीचा जिव्हाळा अंतरी नसेल तर गळा माळ घालून काय उपयोग ? स्वामी म्हणे व्यर्थ पूजा घंटानाद । भेटेना गोविंद भक्तीविण -

स्वामी स्वरुपानंदांची थोरवी तर अशी होती -

*काय सांगू संतकृपेचा नवलाव*

*प्रकटला देव अंतर्यामी ।*

असा हा पुण्यपुरुष १५ ऑगस्ट १९७४ (श्रावण वद्य द्वादशी) ला महासमाधीत लीन झाला. परंतु भाविकांच्या शांत-प्रशान्त भावार्थाचे पोषण ते आजही आपल्या अभंगाद्वारे करीत आहेत आणि म्हणूनच माझ्या लेखणीतून शब्द उमटतात :

*संसार तमाती । होसी तू भास्कर ।*

*तुज नमस्कार । गुरुराया ।*

**सौ. विजया प्रभुणे**

१/१९, ब, श्रीमान् सोसा. परिसर, भगिनी निवेदिता बँकेसमोरील लेन, गजानन महाराज मंदिरापुढे, कर्वेनगर, पुणे ५२.

फोन : ५४१०६२७.



# पावस - दर्शन

**श्री. बाळकृष्ण गणेश गोडबोले**

अगदी १९४२ पासूनचं पावस गाव आठवतं ! त्या वेळी मुंबईहून आम्ही प्रथम रत्नागिरी येथे बोटीने जात असू. 'चंद्रावती', 'रुख्मावती' अशी बोटींची नावे होती. हलत-डुलत एकदाची बोट रत्नागिरी बंदरात उभी राही - म्हणजे हालतच राही. मग खपाट्यातून/पडावातून धक्क्यावर जावं लागे. पडाव लाटेबरोबर काही क्षण बोटीजवळ येई तेवढ्यात १-२ जणांना बोटीतून पडावात उतरता येई. पण नावाडी सरावलेले असायचे. मग पडाव एकदाचे धक्क्यावर लागत.

आजोळ रत्नागिरीचंच. तेथे पोहोचल्यावर आम्ही आल्याचा निरोप कोणाबरोबर तरी पावस येथे जाई. त्यानंतर भाट्याच्या पलीकडे बैलगाडी कोणत्या दिवशी पाठविणार त्याचा निरोप पावसहून आजी-अप्पांकडून (स्वामी) येई.

त्या दिवशी मग आजोळहून पांढऱ्या शुभ्र धष्टपुष्ट बैलांच्या सजविलेल्या 'सारवट' गाडीने राजीवड्यापर्यंत जायचं. तेथून शिडाच्या होडीने खाडी पार करून भाट्ये गावात जायचं. तोपर्यंत उन्हं वर आलेली असायची. तेथून पुढे कांबळं अंथरलेल्या बैलगाडीतून ५ कोसांचा आणि ३-३॥ तासांचा प्रवास पावसपर्यंत. (५ कोस = १० मैल = १६ किमी). बैलगाडीचा एकूण वेग असा की मध्येच गाडीतून उतरावं, चालत चालत बाजूची करवंदं खुडावी व पुन्हा खुशाल गाडीत जाऊन बसावं !

पण प्रवास असा जिकिरीचा असला तरी पावस गावाचं दर्शन झालं की प्रवासाचा शीण केव्हाच निघून जाई.

तांबडे रस्ते, नारळी पोफळीच्या रस्त्याच्या दोन्ही बाजूला असलेल्या बागा, फुललेली आमराई, पक्ष्यांची किलबील, रहाटांचे अणि पाण्याचे आवाज, गाई-म्हशींचा हंबरडा, बैलांच्या गळ्यातील घुंगरांचे आवाज, जवळून वाहणारी नदी आणि गावाला चारी बाजूंनी वेढणारे हिरवेगार डोंगर !

बैलगाडीतून उतरून घराकडे जावं तो आजी ओवाळणी घेऊन दारातच उभी ! तिला विचारलं, 'आम्हा आलो हे तुला कसं समजलं ?' ती म्हणाली, 'अरे, बाबा बैलांच्या घुंगरांचा आवाज वर रस्त्यावर थांबला. तेव्हा म्हटलं, तुम्हीच आला असणार !'

ठराविक घराणी म्हणजे गोडबोले-देशमुख-फडके-देसाई-जोशी. प्रत्येकाचं कंपाऊंड आणि मध्ये घर. थोडी भात-शेती आणि आंब्याची कलमं. चलनाचा उपयोग फार कमी. पण लोक खाऊन-पिऊन सुखी होते. प्रेमळ आणि आदरातिथ्य सांभाळणारे !

असं हे ४,००० वस्तीचं छोटं, निसर्गरम्य गाव एरव्ही कोणाला माहीत होण्याचं कारणही नव्हतं.

पण तेथेच १० पिढ्या वस्ती करून स्थायिक झालेल्या गोडबोले घराण्यात 'स्वामी स्वरुपादंनदां'चा जन्म झाला.

१९३४ पासून सतत ४० वर्षे 'सोऽहं' साधनेत मग्न असलेल्या स्वामींची कीर्ती हळूहळू पसरू लागली. फूल उमललं की त्याला 'सुगंध दे' असं सांगावं लागत नाही. जिज्ञासू साधकांची आणि भक्तांची ये-जा सुरू झाली आणि पावस गावाची महती वाढली.

मग भाट्ये-पावस अशी प्रथम खाजगी बस व नंतर एस.टी. बस सुरू झाली. १९८५ मध्ये भाट्ये खाडीवर पूल झाल्यावर रत्नागिरी-पावस अशा गाड्या सुरू झाल्या. सुरुवातीला दिवशी २ गाड्या असत, तर आता दर ½ तासाला गाडी असते.

स्टँडपासून अगदी जवळ पुलाच्या टोकाशी श्री. देसाई यांचे घर आहे. त्यांच्या घरातील बाहेरच्या खोलीत स्वामींचे ४० वर्षे वास्तव्य होते. त्या खोलीचे दर्शन घ्यावे.

पारायणासाठी श्री. देसाई यांचे घरासमोरच 'स्वरुपाश्रम' आहे. 'स्वामी स्वरुपानंद सेवा मंडळातर्फे' तेथे भक्तांची रहाण्या-जेवण्याची सोय केली जाते. तेथून पुढे गेल्यावर भक्तांसाठी 'भक्त निवास' आहे. तेथेही सोयी आहेत.

पावस स्टँडपासून सुमारे १ मैलावर पू. स्वामींची संजीवन समाधी आहे. समोरच स्वामींचे जन्मगृह आहे व जन्मखोली दर्शनाची व्यव्यस्था आहे.

समाधी-मंदिरातील 'ध्यान-गुंफे' मध्ये थोडा वेळ बसावं आणि आगळी-वेगळी शांतता आणि आनंद अनुभवावा !

**श्री. बाळकृष्ण गणेश गोडबोले**

४, आनंदी शास्त्री हॉल, ग्रँट रोड, मुंबई ४००००७

# निसर्गाचे लेणे - कोकणची भूमी

प्रा. लक्ष्मण माळुसरे

*एम.ए.एम्.एड. एस्.एन्.डी.टी. कॉलेजमध्ये २० वर्षे अध्यापन. एस.एस.सी. बोर्ड व बालभारती येथे भूगोल अभ्यास मंडळाचे सदस्य. मूल्यशिक्षण, सामान्य ज्ञान, भूगोल पाठ्यपुस्तकांचे लेखन, शिक्षक प्रशिक्षण वर्ग, प्रज्ञाशोध परिक्षा व १० वी आणि १२ वी विद्यार्थ्यांना मार्गदर्शन. सकाळ व लोकसत्ता मध्ये लेखन.*

पर्यटन, प्रवास ही माणसाची सहज ऊर्मी... निसर्गाच्या सानिध्यात रममाण होण्याची, परमेश्वराकडे काही साकडे घालण्याची, थोरांच्या पवित्र स्थानांना वंदन करण्याची, प्रेरणा मिळविण्याची, परमेश्वराच्या कलाकृतीचा जवळून आस्वाद घेण्याची संधी मानव कधी सोडणार नाही. निसर्ग प्रवासातील छोटे छोटे अनुभव आपणास विविध शैक्षणिक अनुभव देत असतात. निसर्ग आणि आपण, त्यातील नैसर्गिक ओढ, परस्पर संबंध, समजाऊन घेण्यासाठी प्रत्येकजण धडपडत असतो.

कोकणही आपल्या सश्य-शामल भूमीच्या महावस्त्राची जरतारी चंदेरी किनार आहे. सह्याद्रीच्या आधारावर व कल्पतरुंच्या छायेत विसावलेली कोकणची रम्यभूमी पर्यटकांना सारखी खुणावत असते. अथांग रत्नाकराचे घनगंभीर रूप पाहून मनातील चिंता दूर होतात. किनाऱ्यावरील चंदेरी वाळू, आकाशात गवसणी घालण्यास निघालेले माड, समुद्र पक्ष्यांची भरारी, सागर लहरींची गाणी आपल्यासमोर स्वर्गच उभा करतात. अशा कोकणचे दर्शनाची काही स्थळे व त्यांची वैशिष्ट्ये जाणून घेऊया.




## तीर्थक्षेत्र पावस

रत्नागिरीपासून सुमारे २० कि.मी. अंतरावर पावस हे निसर्गरम्य गाव आहे. पावस हे स्वामी स्वरुपानंद यांच्या प्रदीर्घ वास्तव्याने पुनीत झालेले आहे. १५ ऑगस्ट १९७४ रोजी स्वामीजींनी येथे समाधी घेतली. त्यांच्या समाधीजवळच स्मृतीमंदिर बांधण्यात आले आहे. त्यांच्या समाधीशेजारीच स्वामीजींचे अनंत निवास ही इमारत आहे. येथे पर्यटकांची निवास व भोजन व्यवस्था असलेला स्वामी स्वरुपानंद आश्रम आहे.

पावस गावातील गणपतीमंदिर, सोमेश्वर मंदिर, विश्वेश्वर मंदिर पहाण्याजोगे आहे. गुरुपौर्णिमा व स्वामीजींचा निर्वाण दिन मोठ्या उत्साहात साजरा केला जातो.

## जागृत देवस्थान गणपतीपुळे

भावभक्तीच्या शिंपल्याने, डोंगरदऱ्याचा कणखरपणा, कोकणी माणसाच्या मनातील चिवटपणा ही खास वैशिष्ट्ये असणाऱ्या बांधवांनी बुद्धीची देवता असलेल्या गणेशाची पूजा केली नाही, तर नवलच. पर्वताला पाठीशी घालून, सर्व कोकणवासीयांवर कृपादृष्टी असलेला पुळ्याचा स्वयंभू गणेश हा भाविकांचे श्रद्धास्थान आहे. कोकणातील माणसे जीवनात येणाऱ्या अनेक समस्यांना जागृत देवस्थान

गणपतीपुळेमुळे सहज सामोरे जातात. गणपती ही विघ्नहर्ता देवता, कोणत्याही शुभकार्याची सुरुवात ही गणेश वंदनाने केली जाते आणि म्हणूनच महाराष्ट्रामध्ये अष्टविनायक दर्शन महत्त्वाचे मानले जाते. गणपतीपुळे येथील गणपतीचे स्थान स्वयंभू व जागृत म्हणून प्रसिद्ध आहे.

या गणेशाची स्थापना पूर्वी बाळंभटजी भिडे यांनी केली. या गणपतीचे मूळ स्थान येथून जवळच असलेल्या 'गणेश गुळे' ठिकाणी आहे. एका रात्री गणपतीने बाळंभट्टांना स्वप्नामध्ये दृष्टांत देवून सांगितले की, गावावरील संकट दूर करण्यासाठी माझी प्रतिष्ठापना समुद्र किनारी कर. त्याप्रमाणे बाळंभटजींनी प्रतिष्ठापना केली व आज हे कोकणातील एक महत्त्वाचे पर्यटन केंद्र म्हणून प्रसिद्ध आहे.

देवालयाच्या दोन्ही बाजूस चौथरे असून दोन बाजूस तीन तीन त्रिपूर आहेत. देवालयाच्या ईशान्य कोपऱ्यात काळ्या दगडी असून त्यातून नाभी गंगोदक झिरपत असते. त्याच्या जवळच द्वार देवता व तुळशी वृंदावन आहे. मंदिरालगतच असलेल्या धर्मशाळेचा उपयोग पूर्वी स्वयंपाकासाठी करण्यात येत असे. सध्या येथे पर्यटकांची राहण्याची सोय होते. उत्तरेकडील दरवाज्यातून मंदिरामध्ये प्रवेश केला की देवालयाचा मुख्य घुमट आहे. हा घुमट आण्णाजी दत्तो हे शिवाजी महाराजांचे प्रधान सचिव यांनी बांधला आहे. गाभाऱ्यात पूर्वेकडील बाजूस श्रींची मूर्ती असून त्याला लागूनच कुंड आहे. सोन्याचा मुलामा दिलेला कळस मंदिरावर शोभून दिसतो. भाद्रपद शुद्ध प्रतिपदेपासून ते पंचमीपर्यंत व माघ शुद्ध चतुर्थीस मोठे उत्सव भरतात. नोव्हेंबर व फेब्रुवारी महिन्याच्या पहिल्या आठवड्यात सूर्यास्ताच्या वेळी किरणे मूर्तीवर पडतात. हे नैसर्गिक नयनरम्य दृश्य पहाण्यास भक्तगण दूर अंतरावरून येतात.

या मंदिराचा परिसर नारळीच्या बागांनी व वनराईंनी मोहक वाटतोच. त्याशिवाय मंदिराच्या लगतच असलेला समुद्र किनारा हे पर्यटकांचे खास आकर्षण आहे. येथील फेसाळणाऱ्या लाटा व वाळूचे सुंदर पुळण पर्यटकांना कित्येक तास खिळवून ठेवतात.

मुंबई-गोवा महामार्गापासून सुमारे ३५ किमी अंतरावर हे ठिकाण आहे. कोकणातील खलाटी व वलाटी, डोंगररांगातून जाणारा वळणा-वळणांचा रस्ता प्रवासाचा आनंद द्विगुणीत करतो. पुणे, मुंबई, कोल्हापूर, सोलापूर येथून गणपतीपुळे येथे येण्यास खास एस.टी. बसेस आहेत. तसेच रत्नागिरी येथून खाजगी वाहनांनी गणपतीपुळे येथे जाता येते. येथे महाराष्ट्र राज्य पर्यटन महामंडळाचे हॉलिडे होम्स आहेत.

या परिसरामध्ये एक नैसर्गिक गुहा असून या मंदिरापासून जवळच कविवर्य केशवसूत म्हणजे कृष्णाजी केशव दामले यांचे मालगुंड हे गाव असून आता तेथे स्मारक निर्माण करण्यात येत आहे.

## मुरूड

स्त्री शिक्षणाची पताका ज्यांनी महाराष्ट्राच्या भूमीमध्ये रोवली व खऱ्या अर्थाने सुसंस्कृत स्त्री ही मोठी शक्ती आहे, असे जगास दाखवून दिले त्या महान पुरुषाची म्हणजे अण्णासाहेब कर्वे यांची ही जन्मभूमी. येथील प्राथमिक शाळेमध्ये त्यांचे शिक्षण सुरू झाले. १९९१ साली महाराष्ट्र शासनाने यास पर्यटन स्थळ म्हणून मंजुरी दिली आहे. हे वसविलेले गाव असून गावाच्या मध्यभागी दुर्गा देवीचे मंदिर आहे. येथील प्रचंड घंटा प्रवाशांचे आकर्षण केंद्र आहे. गारंबीचा बापू या कादंबरीतील वर्णन याच ठिकाणचे आहे. मुरूडपासून जवळच हर्णे बंदर आहे. कान्होजी आंग्रे यांचा सुवर्णदुर्ग किल्ला आहे. सुवर्णदुर्ग किल्ला समुद्राच्या अंतर्गत भागामध्ये असूनही तेथे गोड पाणी आढळते.

## महाकाली मंदिर

राजापुर तालुक्यातील अडिवरे गावी महाकाली मंदिर आहे. सुमारे १३०० वर्षांपूर्वी आद्य शंकराचार्यांनी महाकाली देवस्थानाची स्थापना केली. हे देवस्थान पंचायतन असून या मंदिरामध्ये महाकाली, महासरस्वती व महालक्ष्मी या तीन बहिणी वेगवेगळ्या दिशांना आसनस्थ आहेत. रवळनाथाचे मंदिर याच मंदिराच्या आवारात आहे. येथील नागेश्वर मंदिरात अतिशय जुने वारुळ छपराच्या वर उंच आहे. परंतु येथून पावसाचा एकही थेंब गळत नाही. हे याचे वैशिष्ट्य आहे. हे आश्चर्य यात्रेकरूंना नेहमी वाटते. मंदिराच्या आतील बाजूस कोरीव कामाचे उत्कृष्ट नमुने आहेत. गुढीपाडवा, नवरात्र, देवदीपावली व पौष पौर्णिमेस येथे मोठी यात्रा भरते. महामार्गावरील राजापूर येथून अडिवरे येथे जाता येते.

## परशुराम

कोकणची भूमी ही परशुरामांची भूमी म्हणून ओळखली जाते. भगवान विष्णुंनी जे सहा अवतार घेतले त्यातील सहावा अवतार म्हणजे परशुराम होय. परशुराम हे चिरंजीवी आहेत. हे जागृत देवस्थान असल्यामुळे भाविक लोक मनातील हेतू पूर्ण होण्यासाठी 'श्री' ना यथाशक्ती नवस बोलतात.

"समुद्र ज्याने दुर घालविला ।
दैत्यास ज्याने बहुमार दिला ।।
महेंद्रस्थानी दिसतो कसारे ।
त्या भार्गवासी भजती सारे ।।

अशी परशुरामांची ख्याती आहे. हे देवस्थान चिपळुणच्या उत्तरेला गोवा-मुंबई महामार्गावर सुमारे तीन कि.मी. अंतरावर आहे. मंदिराच्या मुख्य गाभाऱ्यात काळ्या पाषाणामध्ये मध्यभागी परशुरामांची मूर्ती आहे. त्यांच्या उजवीकडे शक्तीला जिंकणारा ब्रह्मदेवाचा अवतार 'काम' तर डावीकडे मृत्यूला जिंकणारा शंकराचा अवतार 'काळ' आहे. या त्रिमूर्ती म्हणजे ब्रह्मा, विष्णु, महेश यांचे अवतार होय. परशुरामाच्या मूर्तीसमोरील सिंहासनासमोर खालच्या बाजूस स्वयंभू स्थान आहे. त्याची पूजा व अभिषेक करतात. परशुरामांच्या हातात परशु, बाण, धनुष्य अशी आयुधे असून उजवा हात अभय हस्त आहे. शंकराच्या हातात परशु व मृग म्हणजे हरिण आहे.

परशुराम मंदिराच्या मागे माता रेणुका देवीचे मंदिर आहे. रेणुका

ही श्रीदेव भार्गवराम यांची आई व जमदग्नी हे भार्गवरामांचे वडील होत. श्रीदेवी रेणुका मातेची मूर्तीसुद्धा चतुर्भूज आहे. तिच्या हातात शीर, डमरू, गदा व पानपाय अशी आयुधे आहेत. हे शीर सहस्त्रार्जुन दैत्याचे आहे, असे मानतात. या मंदिराची जडण-घडण मोगल पद्धतीची आहे. मंदिराला लागूनच 'बाणगंगा तीर्थ' नावाचा तलाव आहे.

भार्गव मंदिराच्या उत्तरेला लागूनच श्रीगणपती मंदिर आहे. त्यातील गणपतीची मूर्ती पांढऱ्या पाषाणाची आहे व त्याची सोंड उजवीकडे आहे. त्यास सिद्धी विनायक असे म्हणतात.

येथे सदैव चौघडा व प्रार्थना चालते. देवाचा मुख्य उत्सव अक्षयतृतीयेला असतो. याशिवाय दरवर्षी माघ शुद्ध एकादशीस मूर्तीच्या प्रतिष्ठापनेचा वाढदिवस साजरा करतात. येथे महाशिवरात्रीस मोठी यात्रा भरते. येथे पर्यटकांची राहण्याची उत्तम व्यवस्था आहे.

## राजापूरची गंगा

राजापूरची गंगा हे एक आश्चर्य मानले जाते. धुत पापेश्वराच्या आज्ञेने ही गंगा पृथ्वीवर अवतरली. साधारणपणे दर तीन वर्षांनी ही गंगा अवतरते. चंद्र, सूर्य, बाण, यमुना, कृष्णा, अग्नि, नर्मदा, सरस्वती, गोदा, वरुण, हिम, वदिका, काशी एकूण चौदा कुंडांतून ही नदी वाहते. दगडी गोमुख असलेल्या काशी कुंडामध्ये गरम पाणी असते. येथील पाण्यात गंधकाचे प्रमाण जास्त असल्याने त्वचेचे रोग नष्ट होतात. या गंगेचा कालावधी कमीत कमी ११ दिवस व जास्तीत जास्त दोन महिने इतका असतो. येथून जवळच 'उन्हाळे' नावाचे गाव असून तेथे बाराही महिने वाहणारा गरम पाण्याचा झरा आहे. हे पाणीसुद्धा औषधी आहे.

येथे पक्का रस्ता असल्यामुळे वाहतुकीची उत्तम व्यवस्था आहे.

## केळशी

कोकणातील खऱ्या निसर्गाचा आनंद घ्यावयाचा असेल तर केळशीचा निसर्ग पहावयास हवाच. दापोली तालुक्यातील रायगड जिल्ह्याच्या सीमेवरील हे गाव आहे. येथील मंदिर दोन घुमटाचे असून मोगल व पेशवेकालीन वास्तूचा उत्तम नमुना आहे. येथील चैत्र शुद्ध पौर्णिमेस भरणारा उत्सव पाहण्याजोगा असतो.

येथून जवळच याकुब बाबांचा दर्गा प्रसिद्ध आहे. याकुबबाबा हे शिवाजी महाराजांचे गुरू होत. केळशीच्या परिसरामध्ये हरिहरेश्वर मंदिर, आंजर्लेचा गणपती, हर्णेचा सुवर्णदुर्ग, वडवलीचे उष्ण पाण्याचे झरे, वेळास येथील दुर्गामातेचे मंदिर पाहण्याजोगे आहे.

## राजीवडा बंदर

रत्नागिरीला लागूनच असलेल्या भाट्याच्या खाडीवरील राजीवडा बंदर हे पर्यटकांची मातृभूमी मानली जाते. भाट्याची नयनरम्य खाडी, पर्यटकांची नौकानयनाची हौस पुरविण्यास सदैव सज्ज असते. येथून जवळच असलेल्या दत्तमंदिराकडे जाता येते.

भाटे येथे कोकण कृषी विद्यापीठाचे नारळ संशोधन केंद्र आहे. तसेच येथील भंडारी समाजाने बांधलेले सती समाईचे मंदिर आहे. ही देवी नवसाला पावते अशी येथील भक्तगणांची भावना आहे. भाटे येथील समुद्रकिनाऱ्यालगत असलेले सुरुचे बन व सुंदर अथांग निळा समुद्र पर्यटकांना स्वर्गीय आनंद देण्यास सदैव हजर आहे. भाटे येथे महाराष्ट्र पर्यटन महामंडळातर्फे निवासाची व्यवस्था केली जाते.

## रत्नदुर्ग किल्ला

रत्नागिरीच्या समुद्रकिनारी हा किल्ला असून त्याचे क्षेत्र सुमारे १२० एकर आहे. किल्ल्याच्या तीनही बाजूंनी समुद्र असून किल्ल्याचा परिसर नारळी पोफळीच्या बागांनी निसर्गरम्य बनलेला आहे. १६७० साली हा किल्ला आदिलशहाकडून शिवाजी महाराजांनी जिंकला. या किल्ल्याच्या एका बुरुजावर दीपगृह आहे व जवळच श्रीभगवतीचे शिवकालीन मंदिर आहे.

या किल्ल्याच्या पायथ्याशी भागेश्वर मंदिर असून या शिवमंदिराच्या खांबावर पशु-पक्ष्यांची सुंदर चित्रे कोरलेली आहेत व मंदिराच्या छतावर समाधिस्त साधूंचे पुतळे बसविण्यात आलेले आहेत. महाशिवरात्रीस येथे मोठी यात्रा भरविण्यात येते. निसर्गाच्या कुशीतील हे स्थान पर्यटकांचे आकर्षण केंद्र असून येथे जाण्यासाठी रत्नागिरीवरून खाजगी व एस.टी. बसेस उपलब्ध होतात.

## शिवशिल्पांचे डेरवण

चिपळूण तालुक्यात सीतारामबुवा वालावलकर यांचे स्मृतीप्रित्यर्थ हे शिल्प विकसित करण्यात आलेले आहे. येथे शिवाजी महाराजांच्या जीवनातील अनेक प्रसंग शिल्पाद्वारे व चित्रमय रितीने दर्शविण्यात आलेले आहेत. सीतारामबुवा आत्माराम वालावलकर यांच्या प्रेरणेने गणेश पाटकर या शिल्पकाराने आपले कौशल्य पणाला लावून सतत १५ वर्षे कार्य केल्यानंतर या शिवसृष्टीची निर्मिती केली. शिवमंदिरामध्ये शिवाजी महाराजांचा मोठा अश्वारुढ पुतळा आहे. सभामंडपाच्या भिंतीवर छत्रपतींचा नामकरण सोहळा, रोहिडेश्वर येथील प्रतिज्ञा, पावनखिंडीतील लढाई, पारतंत्र्यातील कोंडाणा, अफजलखानाचा वध इत्यादी प्रसंग चित्रित केलेले आहेत. मावळ्यांचे शिल्प, संत नामदेव महाराज व संत तुकाराम महाराज यांचे शिल्प लक्ष वेधून घेते.

मुंबई-गोवा महामार्गावरील सावर्डे गावाजवळून डेरवणकडे जाण्यासाठी फाटा फुटतो. चिपळूणपासून हे अंतर सामान्यपणे १२ किमी इतके आहे.

## प्रचितगड व धबधबा

रत्नागिरी जिल्ह्यात संगमेश्वर तालुक्यात प्रचितगड आहे. या किल्ल्याच्या चारही बाजू तीव्र उताराच्या असून रत्नागिरी जिल्ह्याचे

नयनरम्य दृश्य येथून दिसते. वन्यप्राण्यांचे वास्तव्य व विविध प्रकारच्या वनस्पती या जंगलात आढळतात. येथील पाच जंगलात थंड पाण्याचे झरे असून त्यांना उन्हाळ्यातही भरपूर पाणी असते. धोदवणे नावाने प्रसिद्ध असणारा सुमारे २०० फुटांहून जास्त उंचीवरून कोसळणारा धबधबा येथील निसर्गाचे खास लेणे आहे. उन्हाळ्यातही भरपूर पाणी असणारा हा धबधबा पावसाळ्यात रौद्ररूप धारण करतो.

## गुहागर

चिपळूणच्या पश्चिमेला ४३ कि.मी. अंतरावर गुहागर गावं वसलेले आहे. गुहागर म्हणजे कार्तिकी स्वामींचे वसतिस्थान असा होतो. गुहागर येथील श्रीव्याडेश्वर जागृत देवस्थान आहे. परशुरामांनी आपल्या तपश्चर्येसाठी या ठिकाणची निवड केली. या ठिकाणी परशुरामशिष्य व्याडीमुनीने एका शिवलिंगाची स्थापना केली व तेथे छोटेसे मंदिर बांधले, हेच व्याडेश्वर मंदिर होय. हे मंदिर पेठे यांनी बांधलेले असून ते भव्य आहे. मंदिराच्या चार कोपऱ्यात गणपती, देवी, विष्णु व सूर्य यांची मंदिरे आहेत. गुहागरचा समुद्र किनारा अतिशय सुंदर आहे. मुंबई, पुणे, कोल्हापूर येथून गुहागरला जाण्यासाठी एस.टी. बसेस उपलब्ध आहेत. गुहागरपासून १६ कि.मी. अंतरावर वेळणेश्वराचे मंदिर असून हे मंदिर १२०० वर्षापूर्वी बांधलेले आहे.

कोकणची ही आनंददायी यात्रा सुखद होवो ही सदिच्छा.

**प्रा. लक्ष्मण मालुसरे**
२१, दामोदर व्हिला, कोथरुड, पुणे - २९. फोन : ५४६९४८७



जय माताजी

दि. १७।२।६१
पावस

प्रिय श्री रामभाऊ यांसी हरिस्मरणपूर्वक अनेक आशीर्वाद विशेष. ईशकृपेने इकडील सर्व क्षेम. तुमचें दि. ३१।१।६१ चे व त्यापूर्वीची ही सर्व पत्रे मिळाली प्रकृतिमान यथातथाच आहे, त्यामुळे पत्रोत्तर वेळचेवेळी लिहिणे किंवा लिहवून घेणे होत नाही. श्रवणमननात स्वस्थपणे कालक्रमणा होत आहे.

"स्थिति बाणतां स्वरूपाची ।
चिंता सोडिली देहाची ।
याकारणें होणाराची ।
चिंता नसे ।।१।।"
प्राप्त कर्तव्य ईश्वराचे स्मरण ठेवून यथाशक्ती करीत जावे.
"नाम स्मरे निरंतर । ते जाणावे
पुण्यशरीर । महादेवांचे गिरिवर ।
राम नामें नासती ।।२।।"
सर्वांस आशीर्वाद. कळावे,

[redacted]

आपला
स्वरुपानंद

जय माताजी

दि. १०।९।६०
पावस

प्रिय श्री राम व लक्ष्मण यांसी हरिस्मरणपूर्वक अनेक आशीर्वाद विशेष. ईशकृपेने इकडील सर्व क्षेम. तुमची सर्व पत्रे वेळेवर मिळाली. गेले वर्षभर प्रकृतिमान यथातथाच आहे. यामुळे सविस्तर लिहिता येत नाही.

ईश्वराचे स्मरण ठेवून अखंड उद्योग करीत अडचणींतून धीराने मार्ग काढावा. झाल्यागोष्टी होऊन गेल्या. यापुढे निरहंकारपणे काकांचा विचार घेऊन समजुतीने संसारप्रपंच चालवावा.

"चालता बोलता धंदा करितां ।
खातां जेवितां सुखी होतां ।
नाना उपभोग भोगितां ।
नाम विसरों नये ।।१।।
नामे संकटे नासती ।
नामे विघ्ने निवारती ।
नामस्मरणे पाविजेती । उत्तम पदे।।२।।"
सर्वांस आशीर्वाद. कळावे,

[redacted]

आपला
स्वरुपानंद



# ॥ श्रीस्वामींची वर - प्रार्थना ॥

**श्री. अनंतराव करंदीकर**

*स्वामी स्वरुपानंदांचे अनुग्रहीत भक्त.*

जगद्‌गुरु श्रीज्ञानेश्वर महाराज यांचे पसायदान हे महाराष्ट्रातील व अन्य ठिकाणी रहाणारे मराठी भाषिक यांना ज्ञात आहे नव्हे ते प्रत्येकाला पाठ आहे. प्रत्येक धार्मिक-सांस्कृतिक-साहित्यिक वा अन्य समारंभामध्ये ते म्हटले जातेच. त्या शिवाय सांगता होत नाही, नव्हे होणारच नाही.

पसायदान हे व्यक्तिशः भगवंताजवळ मागितलेले नाही. श्रीज्ञानेश्वर महाराजांचा मोठेपणा यातच आहे. विश्वाच्या कल्याणासाठी सर्व मानवांचे कल्याणासाठी व जगत् शांतीसाठी त्यांनी हे दान मागितले आहे. त्यातील प्रत्येक शब्द न शब्द हा विश्वाला गवसणी घालणारा आहे.

संत नामदेव महाराज यांनीपण भगवंताजवळ मागणी केलेली आहे. ते सर्वांना सुख-शांती-समाधान प्राप्त होवो अशी मागणी करतात पण त्यात त्यांनी अट घातली आहे.

"ज्यां मुखी निघात पांडुरंग" ही संत मंडळी सुखी असोत. नामदेव महाराजांनी जन्म साफल्यासाठी किमानपक्षी पांडुरंगाचे नाम तरी घ्यावे अशी अपेक्षा केली आहे. नाम महात्म्य त्यांनी त्यांचे अभंगातून-कीर्तनातून वर्णियेले आहे व अशा प्रकारे ते वैष्णव आहेत व ज्यांच्या मुखात नाम आहे त्यांचेच त्यांनी क्षेमकुशल मागितले आहे.

श्रीसंत एकनाथ महाराज यांनी 'चिरंजीव पद' रूपी पसायदान मागून यातील प्रत्येक ओवीचा अनुभव घेणारा, त्यानुसार वर्तन करणारा हा संत-साधु-सत्पुरुषच होय नव्हे का? संतांची-स्वामींची बरोबर व्याख्या त्यांनी केली आहे. साधकाने 'सद्‌गुरु' करणेपूर्वी 'चिरंजीव पदाचा' आशय लक्षात घेऊनच सद्‌गुरु करावा असे म्हटल्यास वावगे होणार नाही.

प्रत्येक संत हा त्याचे त्याचे अनुभवानुसार-स्वत्व अनुभवानुसार व लोककल्याण इच्छूनच श्रीजगदीश्वराकडे मागणे-साकडे घालतो व मानवांकडून तसं वर्तन घडो, त्यांचा उद्धार होवो अशी अपेक्षा बाळगतो. नव्हे तशी ईश्वर चरणी मनापासून प्रार्थना करतो. श्रीमद् सच्चिदानंद स्वामी स्वरुपानंदांनी भगवंताजवळ प्रार्थना केली आहे. वर-प्रार्थना वाचताना-म्हणताना व त्याबाबत मनन-चिंतन केले असता प्रार्थना त्यांनी स्वतःसाठी केलेली नाही हे लक्षात येते.

ज्या कोणाला पारमार्थिक क्षेत्रात प्रगती व्हावी असं वाटत असेल, ज्याला खऱ्या अर्थानं साधक-सिद्ध व्हावं असं वाटत असेल त्यांनी वर प्रार्थनेतील प्रत्येक शब्द, प्रत्येक ओळ, प्रत्येक कडवं यांचा खोलवर विचार करून तसं आचरण करण्याकडे सर्व लक्ष केंद्रित करावे व धन्य व्हावे ही अपेक्षा श्रीस्वामींनी केलेली असावी.

कृतार्थ जीवनाचा मूलमंत्रच जणू या वर प्रार्थनेत दिसून येतो. यातील प्रत्येक कडवे हे जणू नाथांचं 'चिरंजीव पद'च आहे असं वाटतं. या वर-प्रार्थनेनुसार आचरणारा 'महापुरुषच' म्हणावा लागेल.

संतांची लक्षणे अनेक ठिकाणी, अनेक संतांचे अभंगातून वर्णियेली आहेत. संतश्रेष्ठ ज्ञानेश्वर महाराज, जगद्‌गुरु श्रीसंत तुकाराम महाराज, श्रीसमर्थ रामदास स्वामी, श्रीसंत एकनाथ महाराज यांनी डोळसपणे, सश्रद्धपणे वर्णन केलेली आहेत. अंधश्रद्धेवर तर घणाघाती हल्ले केले आहेत. 'अंधश्रद्धा' ही घातक आहे. जीवनाचा नाश करणारी आहे, हे पोट तिडकिने सांगितले आहे. पण माणूस हा सुधारत नाही, जोपर्यंत स्वतःच्या बुद्धीचा वापर करणेचे तंत्र समजत नाही. तो साक्षर होत नाही. तोपर्यंत अंधश्रद्धा ही रहाणार आहे. पण ही 'अंधश्रद्धा' काय ? हे ज्यांना समजते आहे त्यांनी जाणीवपूर्वक संतांची भगवंताकडे केलेली प्रार्थना मनापासून वाचावी. रोज ती म्हणावी व त्यातील 'एक तरी ओवी अनुभवावी' ही अपेक्षा सर्व संतांनी अपेक्षिलेली आहे.

श्रीस्वामींची वर-प्रार्थना आपण अवलोकन करावी. त्याचा भावार्थ लक्षात घ्यावा व त्यानुसार साधकाने आपले वागण्यात काही फरक पडतो का ? याचे सिंहावलोकन करावे अशी अपेक्षा श्रीस्वामी स्वरुपानंदांची असावी नव्हे आहेच.

**वर-प्रार्थना**

***उदारा जगदाधारा देई मज असा वर ।***
***स्व-स्वरुपानुसंधानी रमो चित्त निरंतर ॥१॥***

***काम-क्रोधादिकां थारा मिळो नच मनांतरी ।***
***अखंडित वसो मूर्ती तुझी श्रीहरी साजिरी ॥२॥***

***शरीरी ही घरी दारी स्त्रीपुत्रादी परिग्रही ।***
***अनासक्त असो चित्त आसक्त त्वदनुग्रही ॥३॥***

***नको धन नको मान नको लौकिक आगळा ।***
***सोडवी हा परी माझा मोहपाशांतुनी गळा ॥४॥***

*नको भोग नको त्याग नको विद्या नको कळा ।*
*अवीट पदपद्माची अमला भक्ति दे मला ॥५॥*

*नरनारी हरीरूप दिसो बाहेर-अंतरी ।*
*रामकृष्ण हरी मंत्र उच्चारो मम वैखरी ॥६॥*

*मी-माझें मावळो सर्व तूं-तुझे उगवो अतां ।*
*मी तूं पण जगन्नाथा, होवो एक चि तत्त्वतां ॥७॥*

*देव-भक्त असे द्वैत अव्ययत्व न खंडिता ।*
*राखवी देव-देवेशा, प्रार्थना ही तुला आतां ॥८॥*

वरील श्रीस्वामींच्या वर-प्रार्थनेमधील प्रत्येक ओळीतील प्रत्येक शब्दाचा नीट विचार करून व त्याप्रमाणे जो 'जिज्ञासु साधक' वर्तन करील, तो सिद्धच होईल नव्हे तोच 'परमहंस' गणला जाईल, यात तिळमात्र शंका नाही.

**श्री. अनंतराव करंदीकर**
श्रीप्रसाद, सिंहगड रस्ता, विठ्ठल मंदिराजवळ, पुणे.

॥ श्री ॥ पांवस
दि. २४-८-६९

श्री. रामभाऊ गोडबोले यांसी,
स. न. वि. वि.

आपण श्रीस्वामी स्वरुपानंदांकडे पाठविलेले बारा रुपये (म.ऑ.) पोहोचले. श्री स्वामींची प्रकृति गेले पंधरा दिवस बरी नव्हती. आता सुधारत आहे. त्यांनी सांगितल्यावरून मी हे पत्र आपणास लिहीत आहे.

आपले या पूर्वीच अभंग ज्ञानेश्वरी ग्रंथाकरिता २६ रुपये जमा आहेत. ग्रंथ ४-६ महिन्यांत तयार होईल व भेट म्हणून आपणाकडे पाठविला जाईल. आजचे बारा रुपये आपले वडिलांचे नांवे जमा केले असून आणखी एक प्रत पाठवू. त्या करिता आणखी पैसे पाठवावयास नकोत. ग्रंथाची किंमत बारा रुपये राहणार आहे.

श्री स्वामींचे आपणासर्वास आशीर्वाद.

माझी बदली सध्या रत्नागिरीस आहे व मी रजा घेऊन १६/२० दिवस स्वामींकडे येऊन राहिलो आहे. माझा रत्नागिरीचा पत्ता c/o गवाणकर वकील, रत्नागिरी असा आहे.

गुळ्यांस ति. स्व. भाऊ (वि. उ. पटवर्धन) यांचेकडील आणि गोळयेस ती. स्व. अण्णा काळे यांचेकडील सर्व मंडळी खुशाल आहेत—

क. लो. हे. वि.

ब. ल. परांजपे

24228336 देशपांडे

## सुलभ नवरत्नहार

१. स्वयेंचि जगदात्मा आपण ।। सच्चिदानंद सूर्यही आपण
सर्वांचे सर्वे सर्वा आपण ।। श्री सद्गुरुराया ।।११५।।
सगुण गणेश रुपांत ।। केले मज निर्गुणासि ज्ञात ।।
मम सर्वस्वच आहांत ।। श्री सद्गुरुराया ।।११६।।
२. सहजी लीनता आली ।। आपुला कृपाप्रसाद ल्याली ।।
चरनीं लोटांगण घाली ।। श्री सद्गुरुराया ।।११७।।
मम आत्मा आपलेच रुप ।। जाणणे हेच केवळ अप्रूप ।।
उभयतां झालो एकरूप ।। श्री सद्गुरुराया ।।११८।।
३. आपण मज स्वीकारले ।। संसार परमार्थ एकचि जाहले ।।
साधक-बाधकत्व ना उरले ।। श्री सद्गुरु राया ।।११९।।
परमतत्त्व नित्यनवे ।। मनामाजीं स्फुरण पावे ।।
माझे मीच अनुभवे ।। श्रीसद्गुरु राया ।।१२०।।
४. विषय सर्व निमाले ।। माया जीवात्मा अलग झाले ।।
भ्रांतीचे पटल दूर जाहले ।। श्री सद्गुरु राया ।।१२१
भेट होता जिवा-शिवाची ।। भीती गेली जन्ममरणाची ।।
समाप्ती जाहली जीवदशेची ।। श्री सद्गुरु राया ।।१२२।।
५. अहंभाव पुरता गेला ।। समरसता आली मनाला ।।
मृत्यूच मरण पावला ।। श्री सद्गुरु राया ।।१२३।।
द्वैत अद्वैत भावना ।। सोडून गेली मना ।।
अखंड ऐक्य सोडवेना ।। श्री सद्गुरु राया ।।१२४।।
६. कर्तेपणाचा भाव सरला ।। कर्म अकर्म भाव विरला ।।
विवंचना नसे जीवाला ।। श्री सद्गुरु राया ।।१२५।।
साध्य-साधना भाव निमाला ।। आणि मूळ जीवनातला ।।
अकर्तेपणाच उरला ।। श्री सद्गुरु राया ।।१२६।।
७. बोल-बोलता-बोलता ।। सहजासहजी साध्य होता ।।
एरवी ही असाध्यता ।। श्री सद्गुरु राया ।।१२७।।
धन्य जाहलो जगतीं ।। हेच सांगते मती ।।
परम सिद्धीची जाहली प्राप्ती ।। श्री सद्गुरु राया ।।१२८।।
८. मम स्वरुपीं पाहिले ।। तिथें विश्वरूप दिसले
स्वरुपी विश्वरूप एकवटले ।। श्री सद्गुरु राया ।।१२९।।
स्वरूप-विश्वरू पाहून आगळे ।। नित्यतत्त्व असे वेगळे ।।
हे ज्ञात जाहले आपणामुळे ।। श्री सद्गुरु राया ।।१३०।।
९. स्वामींचा सेवक जाहलो ।। चराचर व्यापून राहिलो ।।
माझा मीच आनंदलो ।। श्री सद्गुरु राया ।।१३१।।
कृपा प्रसाद लाभला ।। अक्षयीं जीव लाचावला ।।
सदैव वंदन पदकमला ।। श्री सद्गुरु राया ।।१३२।।
१०. नऊ ओविया रत्नहार ।। अनमोल अपरंपार ।।
केला सहर्ष सादर ।। श्री सद्गुरु राया ।।१३३।।
अर्पिताच नवरलहार ।। व्यक्तविला संतोष अपार ।।
पावलो अक्षय अभयकर ।। श्री सद्गुरु राया ।।

**श्री. नारायणराव करंदीकर**

*दि. १५ ऑगस्ट १९७४ रोजी स्वामी स्वरुपानंदांनी देह ठेवला.*
*ही वार्ता पुण्यात आली आणि मन कळवळून उठलं -*

स्वामी गेले ! स्वामी गेले ! वारे स्फुंदर आले !
कसा कळेना प्रभात काळी अरुणराज मावळे ?
गावोगावी गेली वार्ता
धावत सुटल्या सहस्त्र सरिता
कैलासाहुन सदाशिवाने गंगेला धाडिलें !
अश्रुधारा वाहु लागल्या
स्वर्गधरेच्या सीमा सरल्या
भावभक्तिच्या क्षीरसागरी पावसक्षेत्र बुडालें !
सोऽहं सोऽहं हाक ऐकता
उरी दुभंगे धरती माता
आकाशाहुन वडिल लेकरा तिने कुशिंत घेतलें !
परमहंस त्या परमात्म्याला
जन्ममरण ही अवघी लीला
चिदानंदघन शुद्ध स्वरुपा नव वसने वेढिले !
परी फाकलें तेज चहुकडे
सर्वाभूतीं दिसे रूपडें
ज्ञानेश्वर होऊन अंतरी निरंतर बसले !
अमृत ओवी अभंग झाली
रामकृष्ण हरि धून रंगली
रंगी रंगतां सावळें विरघळलें बिंदुलें !

**मधुकर कुलकर्णी**

